# मुमताज

: लेखक :

डॉ. अ. वा. वर्टी

: प्रस्तावना :

आचार्य प्र. के. अत्रे

बी. ए. बी. टी. टी. डी. ( लंडन )

धरित्री प्रकाशन, मुंबई

किंमत तीन रुपये

# ओळख

डॉ. अ. वा. वर्टी यांच्या लघुकथांचा हा पहिलाच संग्रह आहे. मराठी वाचकांना त्यांची ओळख करून देण्याचें काम त्यांनीं माझ्याकडे सोपविलें. मी आनंदानें मान्य केलें. चागल्या कामाला मी सहसा नाहीं म्हणत नाहीं. हो, नाहीं कां म्हणा? बरें, हें कामही कांहीं तितकेसें अवघड नाहीं. कारण गेलीं एकोणीस वर्षे डॉक्टर वर्टी हे गोष्टी लिहीत आहेत. डॉक्टर होण्याच्या आधींपासून ते मराठी वाचकांना गोष्टीं सांगत आहेत. गोष्टी लिहिण्याचा त्यांना विलक्षण नाद आहे. हा नाद त्यांच्या वडलांपासून त्यांच्या अंगांत आलेला असावा. कारण एकदां मी त्यांच्या वडलांकडे 'शेअर' खपवायला गेलों असतां, दोन तास म्हातान्यानें मला निरनिराळया गंमतीच्या गोष्टी सांगून पोट धरधरून हंसविलें. शेवटीं ज्या कामासाठीं मी त्यांच्याकडे गेलों होतों तें मी अजिबात विसरून गेलों. आणि तसाच मोकळया हातांनीं परत फिरलों! डॉक्टर वर्टींच्यामध्यें वडलांचा हा गुण तितक्या तीव्रतेनें आलेला नाहीं हें खरें. तथापि, त्यांची विनोदाची दृष्टि आणि आवड हीं मात्र त्यांनीं निःसंशय आपल्या वडिलांकडून उचललेली आहे. सदतीस सालीं म्हणजे दशवर्षापूर्वीं 'किर्लोस्कर' मासिकानें त्यांच्या 'टॉमी' या गोष्टीला बक्षिस दिलेलें होतें. तेव्हांपासून डॉक्टर वर्टी याचें नांव मराठी वाचकांना उत्तम परिचयाचें आहे. पुष्कळशा वाचनीय गोष्टी लिहिणारे आज जे अतिशय थोडे लेखक आहेत त्यांत डॉक्टरांची गणना होते. मग त्यांच्या गोष्टींची आतां निराळी ओळख करून देण्याची मला काय जरूरी आहे? पण हा एक उपचार आहे. आणि चांगला आहे तो. लग्नाचा हेतू भटजींवांचून सा- -ऊं शकतो हें खरें; पण चार माणसांच्या डोळयाला बरें दिसावें म्हणून भटजी हा आपला असावा लागतो. माझें हें काम तसलेंच आहे.

सामान्यतः मी मराठी गोष्टी वाचीत नाहीं. कारण त्या मला वाचवत नाहींत. कांहीं कांहीं प्रसिद्ध लेखकांच्या गोष्टी मला तितक्याशा आवडत नाहींत. तरी पण त्या कधीं कधीं मी वाचतों. अर्थात् त्यांच्यावर टीका करण्या-

साठीं. डॉक्टर वर्टीना मी गेलीं सहा वर्षे प्रत्यक्षच ओळखतों. नासिकला आम्ही त्यांचे 'भाडोत्री' होतों. तथापि, त्यांची एकही गोष्ट मी कधीं वाचली नव्हती. हा गृहस्थ सपाटून गोष्टी लिहित असतो आणि मासिकांतून छापत असतो, एवढें मला माहित होतें. पण त्यामुळें त्यांच्याबद्दल आदर वाटण्याऐवजी मला त्यांची दयाच वाटत होती. मी मनांत म्हणत होतों कीं हा गृहस्थ आपला वैद्यकीचा धंदा करावयाचा सोडून हे नसते धंदे कां करतो आहे विनाकारण ? अर्थात समक्ष ते जेव्हां भेटत तेव्हां विशेष कांहीं न बोलतां मी त्यांच्याकडे बघून नुसता कौतुकानें हंसत असे. म्हणजे तेवढेंच त्यांना वाटावें कीं आपण काय लिहितों आहोंत तें या माणसाला एकंदरींत पसंत दिसतें आहे. त्यामुळेंच कीं काय कोणास ठाऊक आपल्या गोष्टींबद्दल माझ्याशीं प्रत्यक्षपणें असे डॉक्टर कधींच बोलले नाहींत ! येवढ्या अवकाशांत मी 'समीक्षक' मासिक चालवायला घेतलें आणि चवेचाळीसच्या मार्चमध्यें गोष्टींची चढाओढ जाहीर केली. त्यांत डॉक्टरांनीं 'मुमताज' ही आपली एक गोष्ट पाठवून दिली. ती पाहिल्यावर मी मनांत म्हणालों, "इतके दिवस चुकवलें, पण आतां मात्र हें संकट अगदीं समोरूनच आलें ! आतां काय करावें ?" तरी ती गोष्ट इतर परीक्षकांकडे पाठवून मी तेवढ्यांत थोडासा वेळ काढलाच ! पुढें परीक्षकांचे शेरे आले. पहातों तों डॉक्टरांच्या त्या गोष्टीला बहुतेकांनीं पहिला 'अंक' दिलेला होता ! मी अगदीं सपशेल चाट झालों. मोठ्या उत्सुकतेनें मीं ती गोष्ट वाचली आणि माझेंही तेच मत पडलें ! समाधानाचा मोठा निश्वास टाकला मीं. म्हटलें, आतांपर्यंत डॉक्टरांची एकही गोष्ट न वाचतां आपण नुसतें हंसून त्यांच्यावर जें वजन मारून होतों तें त्या गोष्टीच्या निकालामुळें तसेंच पुढें कायम राहणार ! त्या दृष्टीनें त्या गोष्टीनें माझी अब्रूच राखली म्हणायला हरकत नाहीं !

'समीक्षका'च्या चढाओढींत डॉक्टरांच्या ज्या गोष्टीला पहिलें बक्षिस मिळालें तीच मी त्यांची वाचलेली अशी पहिली गोष्ट, आणि त्याच गोष्टीचें नांव ह्या संग्राहाला त्यांनीं दिलेलें आहे. या संग्रहांत एकंदर अकरा गोष्टी आहेत. त्या आतां मी बारकाईनें वाचलेल्या आहेत हें सांगायलाच नकोच. एका लेखकाच्या सगळयाच गोष्टी कांहीं सारख्या चांगल्या नसतात. लिखाणांत

डावें-उजवें हें असतेंच; तथापि, या संग्रहांतल्या गोष्टी निवडण्यापूर्वी जर आधीं त्या मला त्यांनीं दर्शविल्या असत्या तर मी त्यांना या संग्रहांत फक्त पांचच गोष्टी घेऊन दिल्या असत्या. कारण त्यांचा गोष्टींचा हा पहिलाच संग्रह आहे म्हणून. त्या पांच गोष्टी गुणानुक्रमानें अशा. सहा मास्तर आणि एक मास्तरीण, अरसिक बायको, मुमताज, एक इंच आणि एकच सेकंद आणि वधू पाहिजे. डॉक्टर वर्टी ह्याच्या ह्या पांच उत्कृष्ट गोष्टी आहेत. त्यांच्या प्रतिभेचें सामर्थ्य आणि तेज ह्या पांच गोष्टींमध्यें फारच उत्तम तऱ्हेनें प्रकट झालेलें आहे. ह्या पांचच गोष्टींचा संग्रह डॉक्टरांनीं प्रसिद्ध केला असता तर तेवढ्या आधारावर पहिल्या दर्जाचे लघुकथाकार अशी मान्यता त्यांनीं मराठी साहित्यांत निःसंशय मिळविली असती, एवढें सांगितलें म्हणजे त्यांत सगळें आलें. या संग्रहांत त्यांनीं इतर सहा गोष्टी ज्या घातल्या आहेत त्यांमुळें कांहीं बिघडलें असें नाहीं. पण डॉक्टर वर्टी यांच्या प्रतिभेची योग्य अटकळ त्या गोष्टींवरून होत नाहीं, उलट झाला तर गैरसमजच होतो, म्हणून मी म्हणतों. पश्चात्ताप आणि बॉंब ह्या गोष्टी बऱ्या आहेत. पण मामुली आहेत. बक्षिसाचा घोडा, भुताटकी, स्टॅनोटीचर, साहेब आणि गाढव ह्या गोष्टी मात्र अतिशय सामान्य आहेत. अगदीं पोरकट आहेत असेंही मी म्हणतों. मला आश्चर्य वाटतें तें हें कीं 'सहा मास्तर आणि एक मास्तरीण' किंवा 'अरसिक बायको' अशा सर्वोत्कृष्ट गोष्टी लिहिणाऱ्या डॉक्टरांना 'साहेब आणि गाढव' असली अत्यंत सामान्य गोष्ट लिहविली तरी कशी? त्यामुळें हा संग्रह वाचतांना डॉक्टरांच्या प्रतिभेंत दोन निरनिराळे भिन्न थर आहेत, असें वाचकांना स्पष्टपणें आढळून येतें. एक थर संगमरवरी तर दुसरा अगदीं मुरुम खडीचा! वास्तविक एकाच लेखकाच्या लिखाणांत इतका फरक क्वचितच आढळून यावा.

'मुमताज'ला आम्हीं पहिले बक्षिस दिलें खरें! पण त्या गोष्टींत डॉक्टरांच्या प्रतिभेचें वैशिष्ट्य इतकें यथार्थपणें प्रकट होत नाहीं, जितकें तें त्यांच्या विनोदी गोष्टींमध्यें उमलून आणि फुलून येतें! विनोद हाच डॉक्टरांच्या प्रतिभेचा अंगभूत गुण आहे. आणि त्यांच्या विनोदाची जातही अतिशय नाजूक आणि हृदयस्पर्शी आहे. आजकालच्या लढाईच्या जमान्यांत मोलकरणी मिळत नाहींत म्हणून बायको आपल्या नवऱ्याला दुसरें लग्न करून कां होईना

पण घरांत मोलकरीण आणावयास संमति देते आणि नवरा 'वधू पाहिजे' अशी जाहिरात द्यायला तयार होतो. ही गोष्ट हसवितां हसवितां आपल्या काळजाला अक्षरशः चिरा पाडते! 'अरसिक बायको' या गोष्टींतही समान अभिरुचीची बायको असावी हें जें पुष्कळांचें आवडतें स्वप्न असतें त्यांतली विफलता मोठ्या कौशल्यानें सुचविलेली आहे. 'एक इंच आणि एकच सेकंद' ह्या गोष्टींत परयातनेंत आनंद मानण्याच्या जनतेच्या प्रवृत्तीचा (Sadism) उपहास फारच बहारीनें केलेला आहे. तथापि 'सहा मास्तर आणि एक मास्तरीण' हा या कथासंग्रहाचा मेरुमणि आहे. मी तर ह्या गोष्टीवर अगदीं बेहद्द खुष आहे! सध्यांच्या पुरुष-प्रधान समाजांत स्त्री आणि पुरुष यांच्यांत शुद्ध आणि अविकारी मैत्री असणें कां अशक्य झालेलें आहे याचें अत्यंत प्रभावी विश्लेषण डॉक्टरांनीं केलेलें आहे. पुरुषांच्या वैषयिक आणि लोभी स्वभावाची इतकी हास्यकारक फजिती मराठींत दुसऱ्या कोणत्याही लेखकानें आजपर्यंत केली नसेल! डॉक्टर वर्टी यांची भाषाशैली आणि वर्णनपद्धतीही अतिशय मार्मिक आणि विनोदी आहे. त्यांचें अवलोकनही फार बारकाव्याचें आहे.

त्या दृष्टीनें त्यांच्या गोष्टींचें इत्थंभूत समीक्षण इथें करावयाचें म्हणजे त्यांच्या शास्त्राच्या भाषेप्रमाणें मला त्या गोष्टींचें विच्छेदन आणि पंचनामाच करावयाला हवा. त्या भानगडींत मी पडत नाहीं. ज्या पांच गोष्टी मी निराळ्या निवडून काढल्या त्या आजच्या साहित्यामधल्या उत्तम लघुकथा आहेत, असें माझें प्रांजळ मत आहे, इतकें सांगितलें म्हणजे पुरे. त्या गोष्टी वाचून मला डॉक्टर वर्टी ह्यांच्या भविष्यकालीन लेखनाबद्दल अतिशय आशा वाटते आहे, असें म्हणावयाला मुळींच भय वाटत नाहीं. मात्र त्यांना एवढाच इषारा द्यावासा वाटतो कीं निर्हेतुक, मामुली आणि सामान्य अशा भराभर गोष्टी लिहिण्याचा मोह त्यांनीं काय वाटेल तें करून आधीं आवरला पाहिजे. मी त्यांच्यापेक्षां तेरा वर्षांनीं वडील आहे, म्हणून त्यांना तसें सांगायचा मला अधिकार आहे. 'सहा मास्तर आणि एक मास्तरीण' ह्या गोष्टीच्या प्रतिभाशाली लेखकाची अब्रू संभाळण्याची जबाबदारी आपल्यावर आहे ही जाणीव एकसारखी त्यांनीं आपल्या मनांत जागृत ठेविली पाहिजे!

मुंबई,<br>२ मार्च १९४७

—प्रल्हाद केशव अत्रे

सरकारी डॉक्टर ह्या नात्यानें, माझे वडील कै. वा. डॉ. वामन अंबाजी वर्टी, ह्यांना निरनिराळ्या प्रांतांतून वास्तव्य करावें लागलें. त्यामुळें त्यांना अनेक भाषा अवगत झाल्या, बहुश्रुतता लाभली, व कित्येक मजेदार प्रसंगहि अनुभवावयास किंवा पहावयास मिळाले. त्यांच्यापाशीं मनोरंजक गोष्टींचें एक भांडारच होतें, व चार मित्रमंडळींच्या बैठकींत ते बसले कीं, त्यांच्यासमोर ते आपलें हें भांडार खुलें करीत. विनोदी रीतीनें गोष्टी खुलवून सांगण्याची त्यांची हातोटी विलक्षण होती. त्यांनीं सांगितलेल्या गोष्टी ऐकतांना श्रोत्यांच्या हंसून हंसून मुरकुंड्या वळत. त्यांच्या गोष्टींतून प्रसंगनिष्ठ, त्याचप्रमाणें स्वभावनिष्ठ विनोदहि दुथडी वाहात असे. ह्या कथासंग्रहांतील ' बक्षिसाचा घोडा ' ' भुताटकी ' ' स्टॅनीटीचर ' व ' साहेब आणि गाढव ' ह्या गोष्टींच्या मध्यवर्ती कल्पना माझे वडील सांगत असलेल्या गोष्टींवरूनच घेतलेल्या आहेत. अर्थातच हा कथासंग्रह त्यांच्या पवित्र स्मृतीला अर्पण करण्यांत औचित्य आहे.

ह्या संग्रहांतील बाकीच्या सर्व गोष्टी संपूर्णपणें स्वतंत्र आणि काल्पनिक आहेत.

ह्या संग्रहांतलि ' वधू पाहिजे ! ' ह्या गोष्टीचें गुजराथींत, व ' मुमताज ' ' बक्षिसाचा घोडा ', व ' साहेब आणि गाढव ' ह्या गोष्टींचीं हिंदींत, भाषांतरें प्रसिद्ध झालीं आहेत.

' किर्लोस्कर ' मासिकांतून प्रसिद्ध झालेल्या ' बक्षिसाचा घोडा ' ' भुताटकी ' ' साहेब आणि गाढव ' ' वधू पाहिजे ' ' एक इंच आणि एकच सेकंद ' ह्या गोष्टी ह्या संग्रहांत प्रसिद्ध करण्याची उदार मनानें परवानगी दिल्याबद्दल मी श्री. शं. वा. किर्लोस्कर, ह्यांचा आभारी आहें.

'समीक्षक' मासिकाच्या लघुकथांच्या चढाओढींत पहिलें बक्षिस मिळालेली 'मुमताज' ही लघुकथा ह्या संग्रहांत प्रसिद्ध करण्याची परवानगी दिल्याबद्दल; व आपल्या कामाच्या प्रचंड व्यापांतून वेळांत वेळ काढून वाचकांना माझी व माझ्या गोष्टींची 'ओळख' करून दिल्याबद्दल आचार्य प्र. के. अत्रे ह्यांचा मी ऋणी आहें.

ही संधि साधून आणखी एका व्यक्तीविषयीं मी कृतज्ञता व्यक्त केली नाहीं, तर माझ्या कर्तव्यपालनांत मी चुकलों, असें होईल. मी जी कांहीं थोडीफार आणि बरीवाईट वाङ्मयसेवा केली आहे, तिला पुष्कळ अशीं 'विविधवृत्ता'चे सहसंपादक श्री. चं. वि. बावडेकर ह्यांचें प्रोत्साहनच कारणीभूत झालेलें आहे. थोडक्यांत सर्व अर्थ व्यक्त करावयाचा झाला, तर श्री. बावडेकरांच्याच शब्दांत सांगतां येईल कीं मी श्री. बावडेकरांचें 'फाईंड' आहे. माझ्या लेखनसंसारांत त्यांनीं वेळोवेळीं मला जें प्रोत्साहन दिलें त्याबद्दल मी कृतज्ञता व्यक्त करतों.

—**अ. वा. वर्टी**



# मुमताज : :

आयुष्याच्या अगदीं अखेरच्या घटकेला, आपणांला मुमताजची आठवण व्हावी, ह्याचें राजाभाऊला त्या तशाहि स्थितींत आश्चर्य वाटलें.

लढाईची धुमश्चक्री चालू होती. त्याच्या सभोंवार तोफांचे गोळे आणि बॉम्ब ह्यांचे स्फोट होत होते. त्याच्या कानांजवळून मशिनगन्सच्या आणि बंदुकींच्या गोळ्या 'सूं सूं' आवाज करीत निघून जात होत्या. धुळीनें, धुरानें आणि जखमी सैनिकांच्या किंकाळ्यांनीं आकाश भरून गेलें होतें.

एल् अलॅमिनच्या लढाईला तोंड लागलें, तेव्हांपासून लढाईचा रागरंग बदले, त्याप्रमाणें आपल्या तुकडीला हुकूम देत तो सारखा फिरत होता. त्याचा गोरापान चेहरा उन्हानें आणि श्रमांनीं लालबुंद झाला होता. त्यावर जमलेल्या धुळीच्या थरांतून, कपाळावरून निथळणाऱ्या घामाच्या धारा वाट काढीत होत्या. भर उन्हांत केलेल्या श्रमांमुळें त्याचें सारें शरीर आंबून गेलें होतें.

कपाळावरचा घाम आंगठ्यानें निपटून काढण्यासाठीं तो क्षणभर थांबला. तेवढ्यांत, एका गोळीचा 'सूं सूं' आवाज त्याला ऐकूं आला, आणि आपणां-जवळ येतांच तो आवाज एकाएकीं थांबल्याचेंहि त्याला समजलें. त्याच क्षणीं छातींत एक विलक्षण प्रकारची वेदनेची कळ निघालेलीहि त्याला जाणवली.

त्या भागावरून आपला धुळीनें माखलेला हात त्यानें जरासा फिरवला, आणि तो परत आपल्या कामाला लागला.

लढाईची धुमश्चक्री चालूंच होती. पण राजाभाऊला लढाईचा कोलाहल आतां अस्पष्ट ऐकूं येऊं लागला होता. बंदुका चालवणारे त्याचे सैनिक त्याला भुरकट दिसूं लागले होते. त्याच्या छातींत वरचेवर कळा निघूं लागल्या होत्या. त्या जागेवरून त्यानें आपला हात फिरवून पाहिला. ती जागा त्याला ओली आणि गारगार लागली. दचकून त्यानें तिकडे दृष्टिक्षेप केला. शर्टचा तो भाग काळसर लालसर रक्तानें माखलेला त्याला दिसून आला.

हळूंहळूं त्याच्या गात्रांतील शक्ति कमी होऊं लागली. नंतर त्याला उभें राहणेंसुद्धां अशक्य वाटूं लागलें. त्याचा तो कसलेला आणि रुबाबदार देह अखेरीस इजिप्तच्या वाळवंटांत कोलमडून पडला. त्याच्या दृष्टिसमोरील दिवस नाहींसा होऊन, तेथें हळूंहळूं अंधार पसरूं लागला, आणि त्या अंधारांत त्याला असंख्य तारका दिसूं लागल्या. त्यातील प्रत्येक तारकेंत प्रेमानें ओथंबलेला एकएक भावपूर्ण डोळा त्याला दिसूं लागला; आणि त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडले, " मुमताज ! मुमताज ! "

आणि ह्याचेंच त्याला आश्चर्य वाटलें. त्याची विचार करण्याची शक्ति आतां जवळ जवळ नष्ट झाली होती. तरी मनाच्या ह्या विचित्र खेळाचें त्याला आश्चर्य वाटलें. अशा वेळीं आपणाला मुमताजचीच आठवण कां व्हावी? मुमताज–गाणारणीची पोर- एक वेश्या–आपला संबंध आलेल्या हजारों वेश्यांपैकींच एक !—

वेश्यांच्या बाबतींत तो स्वतःला मोठा तज्ञ समजे. सैन्यांत दाखल झाल्यापासून–आणि त्यापूर्वींहि–संध्याकाळची जेव्हां जेव्हां त्याला रजा मिळे, तेव्हां तेव्हां ती संध्याकाळ तो एखाद्या वेश्येकडे घालवी. आपल्या तुकडीबरोबर रावळपिंडी, लाहोर, मद्रास, बंगलोर वगैरे निरनिराळ्या शहरीं त्यानें थोडे थोडे दिवस काढले होते. सुटीच्या दिवशीं, संध्याकाळ झाली कीं आपला युनिफॉर्म चढवून तो बाहेर पडे. त्या लढाऊ पोषाखांत त्याची कमा-

वलेली शरीरसंपत्ति फारच खुलून दिसे. त्याची ती भरदार छाती, तिच्यावर तंग बसणारा इस्तरीचा खाकी टयुनिक, खांद्यावरचे स्टार, शिटीची खांद्यावरून गेलेली रंगीत पिळदार दोरी, डोळयांवर सांवली पाडणारी ती फोरेज--कॅप, आणि टोकें पिळून पिळून वर चढविलेल्या त्याच्या त्या लालसरगोऱ्या चेहऱ्याला अधिकच रुबाब आणणाऱ्या त्या अक्कडबाज मिशा, ह्यांकडे पाहिलें कीं आपण एकाद्या लढवय्या आणि रंगेल माणसाकडे पहात आहोंत, असें मनाला खासच वाटे. त्याची ती छाती पुढें काढून, निश्चयानें एकएक पाऊल टाकीत चालण्याची ढब तर फारच आकर्षक होती. प्रथम तो एखाद्या 'बार' मध्यें जाई. तिथें एकाद्या उंची मदिरेचा 'बार' भरून झाला कीं मग मदिराक्षींच्या शोधार्थ तो वेश्यांच्या घरीं जाई. आतांपर्यंत तो हजारों वेश्यांकडे जाऊन आला होता. तरी पण, एकाच वेश्येकडे आपण कधीं दोनदां गेलों नाहीं, असें तो आपल्या मित्रांना मोठ्या प्रौढीनें सांगे.

"साब, ये गुलाबका फूल देखिये." साधारण चारसहा महिन्यांपूर्वी राजाभाऊ दिल्लीला होता. आपल्या सरावाप्रमाणें एके दिवशीं संध्याकाळीं तो जुन्या दिल्लींतील वेश्यांच्या गजबजलेल्या वस्तींतून सिगारेटवर सिगारेट फुंकीत फिरत होता. त्याची रंगेल नजर माड्यांच्या खिडक्या धुंडाळीत होती. मधून मधून आपल्या अक्कडबाज मिशांना तो उगाचाच पीळ भरीत होता. रामप्यारी, बिस्मिल्लाबी, शांती, रोशनआरा वगैरे साधारण नांवाजलेल्या वेश्यांकडे तो ह्यापूर्वीच जाऊन आला होता. आजची संध्याकाळ कुठें काढावी, ह्या विचारांत तो रस्त्यावरून भटकत होता. इतक्यांत एक लांब केसांचा, मळकट कपडे घातलेला, साधारण पंधरासोळा वर्षांचा चुणचुणीत पोऱ्या त्याच्यासमोर सलाम ठोकून उभा राहिला, आणि एक गुलाबाचें गेंदबाज फूल राजाभाऊ-समोर धरून त्यानें मोठ्या आदबीनें वरील प्रश्न केला.

राजाभाऊनें त्या पोऱ्याकडे व त्याच्या हातांतील फुलाकडे एकदां नजर फेकली. तो ह्या बाबतींत तज्ञ होताच. त्या पोऱ्याच्या बोलण्यांतील गर्भितार्थ लक्षांत यावयाला त्याला फारसा वेळ लागला नाहीं. तें फूल आपल्या हातांत घेऊन व तें हुंगून राजाभाऊ अस्सल हिंदींत म्हणाला, "हां हां ! खुष्बू तो बहोतहि दिलचस्प है !"

"पण हें फूल तर निर्जीव आहे." तो पोऱ्या मिस्किलपणें हंसून म्हणाला, "आपणाला एकादें जिवंत रसरशीत फूल पाहिजे का?"

राजाभाऊनें त्याच्याकडे प्रश्नार्थक दृष्टीनें पाहिलें.

"काश्मीरच्या बागेंतील फूल आहे." तो पोऱ्या हंसत हंसत म्हणाला, "फूल कसलं? नुकतीच उमलावयास लागलेली कळी आहे!"

"अच्छा, अच्छा!" त्याच्या पाठीवर थाप मारून राजाभाऊ म्हणाला, "चल तर."

पण एकाद्या जख्खड म्हातारीचें वर्णन देखील तिचा अडत्या ह्याच शद्बांत करीत असतो, हें त्याला माहीत होतें. आपण ह्या कलेंत वाकबगार आहोंत हें दाखविण्यासाठीं, व त्या पोऱ्याची थोडीशी थट्टा करण्यासाठीं म्हणून तो त्या पोऱ्याला म्हणाला, "किती सुरकुत्या आहेत तिच्या तोंडावर?"

"नहीं, नहीं साब!" राजाभाऊच्या बोलण्यानें चमकून तो पोऱ्या म्हणाला, "अगदीं अल्लाची कसम! सोळा वर्षांची कोवळी पोर आहे. आपण पहा तर खरं!"

"बरं, चल!" असें म्हणून राजाभाऊ त्या पोऱ्याच्या मागून चालूं लागला.

राजमार्ग सोडून एकदोन आडव्यातिडव्या गल्ल्या ओलांडून गेल्यावर, राजाभाऊला घेऊन तो पोऱ्या एका अरुंद बोळांत शिरला. अंधार नुकताच पडूं लागला होता. पण माड्यांच्या उघड्या असलेल्या खिडक्यांतून बाहेर पडणाऱ्या प्रकाशामुळें तो तितकासा भासत नव्हता. मधूनच एकाद्या खिडकींतून बाहेर आलेले गाण्याबजावण्याचे स्वर त्याच्या कानांवर येऊन पडत होते. चालतांचालतां तो पोऱ्या अगदीं जुनाट दिसणाऱ्या एका वाड्याच्या काळ्याकुट्ट आणि भक्कम दरवाजाशीं थांबला. मोंगल काळांतली, दरवाजाच्या वरच्या टोकावरून खालीं लोंबकळणारी एक भारदस्त कडी त्या पोऱ्यानें दरवाजावर दोनतीनदां आपटली. थोड्याच वेळांत 'करकर' आवाज करीत, तो दरवाजा उघडला गेला. त्या पोऱ्यानें राजाभाऊकडे 'चलीये' ह्या अर्थाच्या दृष्टीनें पाहिलें. राजाभाऊनें आपल्या हातांतील 'वाईल्ड वुडबाईन'चें जळतें थोटूक आंगठ्याच्या टिचकीनें बोळांत उडवून दिलें, मिशांचे आंकडे एकवार

पिळले, आणि तो त्या पोऱ्याच्या मागून आंत शिरला. वाड्याचा चौक ओलांडल्यावर एक अरुंदसा जिना होता. एका कोनाड्यांत ठेवलेल्या पणतीच्या मंद उजेडानें तो प्रकाशिला होता. तो जिना चढून गेल्यावर ते दोघे एका प्रशस्त दिवाणखान्याच्या दरवाजाशीं येऊन पोहोचले. तिथून राजाभाऊनें दिवाणखान्यांत दृष्टिक्षेप केला.

त्या दिवाणखान्यावर नजर टाकतांच एक वेळच्या तिथल्या मोंगल वैभवाची राजाभाऊला कल्पना आली. छताला हंड्याझुंबरें लावलेलीं होतीं. पण त्यांतील कांहींना तडा गेलेल्या होत्या, आणि कित्येक दिवसांची धूळ त्यांवर साचलेली होती. अनेक भोकें पडलेला आणि काश्मिरच्या प्रदेशाप्रमाणेंच उंचसखल दिसणारा एक काश्मीरी गालीचा जमिनीवर हांतरलेला होता. भिंतींवर मोंगल काळांतील चित्रांच्या शेजारींच, घरमालकीणीबरोबर काढलेले तिच्या मित्रांचे फोटोहि लावलेले होते. वोळाच्या बाजूला एक नक्षीकाम केलेली व लाकडी दरवाजे असलेली काळ्या रंगाची खिडकी होती. देवदाराचें एक पुराणें टेबल, त्या भोंवतीं ठेवलेल्या ओबडधोबड चार खुर्च्या, व भिंतीला लावून ठेवलेला मच्छरदाणीचा एक पलंग, येवढें 'फर्निचर' त्या दिवाणखान्यांत होतें. एका बाजूला लोडतक्क्यांची देशी बैठक होती. एका कोपऱ्यांतील तबला-डग्गा व गवसणींत घालून ठेवलेलीं सारंगी व तंबोरा हीं गायनाचीं हत्यारें घरमालकीणीचा पेशा गाणारणीचा असावा, असें राजाभाऊला सुचवीत होतीं. तक्तपोशीला मध्यभागीं टांगलेला एक चिराग आपला मंद सौम्य प्रकाश दिवाणखान्यांत फेकीत होता. पानपट्टी करीत, भडक रंगाचे कपडे ल्यालेली एक बुढ्ढी बैठकीवर बसलेली होती. तिच्या पुढ्यांत हुक्का होता. मीनाचें काम केलेली आणि तांबड्यालाल पीकानें बरीचशी भरलली एक मोठी पीकदाणीहि तिच्यासमोर होती. राजाभाऊला पाहतांच त्या पीकदाणींत दोन बोटांच्या मधून एक पिचकारी सोडून ती बुढ्ढी म्हणाली, "आयीये बाबूजी, बैठीये."

आपले पाय लांब सोडून आणि डावा हात बैठकीवर टेकून बसतां बसतां राजाभाऊच्या मनांत विचार आला, 'सुंदर वेश्यांच्या घरीं एकादी म्हातारी असणें अपरिहार्यच असतें काय?' हा अनुभवाचा विचार मनांत येऊन तो स्वतःशीच किंचित् हंसला.

खुशालीचीं प्रश्नोत्तरें होऊन बराच वेळ झाला तरी तीं दोघेंच त्या दिवाणखान्यात होतीं. आपला मघांचा अनुभवजन्य अंदाजच खरा ठरतो कीं काय, ह्या विचारानें राजाभाऊना थोडासा विरस झाला, पण तो फार वेळ टिकला नाहीं.

"क्या, गाना सुनोंगे ?" थोड्या वेळानें त्या बुढ्ढीनें प्रश्न केला.

बुढ्ढीकडून दुसऱ्या कशाची अपेक्षा करणार, असा विचार करून राजाभाऊनें संमति दिली. त्याबरोबर आंतल्या दरवाजाकडे वळून त्या बुढ्ढीनें हांक मारली, " मुमताज, एऽऽमुमताज, जरा बाहार आवो. बाबूजी गाना सुनना चाहते हैं."

" आयी, आयी ! " आंतून उत्तर आलें.

मुमताज ! नांवातच किती गोडवा आहे. नी आवाजहि किती मधुर ! आपली संध्याकाळ अगदींच फुकट जाणार नाहीं तर ! ह्या विचारानें राजाभाऊ जरासा खुलला, आणि मुमताजच्या आगमनाची वाट पाहूं लागला.

थोड्याच वेळांत आतील दरवाजाला लावलेला निळया रंगाचा पडदा सळसळला, आणि एका तरुणीची नयनमनोहर मूर्ति राजाभाऊच्या दृष्टीस पडली. पौर्णिमेच्या रात्रीं एकाद्या ढगाच्या आडून चंद्रानें हलकेंच बाहेर पहावें, तसें तिच्याकडे पाहून त्याला वाटलें. त्या भरभक्कम दरवाजाच्या चौकटींत किंचित् काळ ती घुटमळून उभी राहिली. डोक्यावरून घेतलेल्या ओढणीचें एक टोंक आपल्या गोऱ्यापान आणि नाजुक हातांत धरून, त्याचा आपल्या ओठांशीं तिनें चाळा चालविला होता. तिनें पंजाबी पद्धतीचा पोषाख धारण केला होता. हिरव्या रंगाच्या चकचकीत सॅटिनची विजार तिनें घातली होती. तिच्या सुकुमार आणि मेंदीनें रंगविलेल्या पायांत जरीचें काम केलेले इवलेसे चढाव होते. वर तिनें रेशमाचा लांब अंगरखा प्रावरण केला होता, आणि त्यावरून जरीनें भरलेलें, किंचित् जुनें दिसणारें, निळें जाकिट घातलें होतें. पण येवढ्या बंदोबस्तांतून सुद्धां तिच्या उत्फुल्ल वक्षःस्थलातील मदनाची दौलत बाहेर ओसंडूं पाहात आहे असें राजाभाऊला वाटलें. तिच्या सुवासिक तेल लावलेच्या काळ्याभोर केसांची लांबसडक वेणी तिच्या नितंबांवर रुळत होती. एका झिरझिरित वस्त्राची ओढणी तिनें आपल्या धनुष्याकृति भुंवयापर्यंत

ओढून घेतली होती; आणि त्याखालीं तिचा मुखचंद्रमा होता. तिनें आपली मान खालीं वळवली होती, पण आपले काळेभोर टपोरे डोळे ती मधून मधून राजाभाऊकडे लावीत होती. त्या चंचल डोळ्याकडे पाहून राजाभाऊला वाटलें, ह्या फुलावरून त्या फुलावर उडणाऱ्या एकाद्या भुंग्यांच्या जोडीकडेच तर आपण पहात नाहीं ना ? तिचे गाल सफरचंदासारखे होते, आणि ओठ पोवळ्यासारखे लाललाल नि नाजुक होते. आतापर्यंत राजाभाऊ अनेक वेश्यांकडे जाऊन आला होता, पण इतकें सुकुमार सौंदर्य त्यानें क्वचितच पाहिलें होतें, आणि असा मुग्धपणा तर त्याला एकाहि वेश्येंत दिसून आला नव्हता. दिव्याच्या मंद प्रकाशात, त्या काळ्याकुळकुळीत दरवाजांत उभ्या असलेल्या मुमताजकडे पाहून, जुनाट चौकटींत बसविलेल्या सुंदर रमणीच्या एकाद्या चित्राकडेच आपण पहात आहोंत, अशा त्याला भास झाला. मंत्रमुग्धाप्रमाणें तो त्याकडे कितीतरी वेळ पहातच राहिला.

तिनें त्याच्याकडे पाहून एकदा हंसल्यासारखें केलें, आणि नंतर एकाद्या भिऱ्या सशाप्रमाणें ती त्याच्याजवळ बैठकीवर येऊन बसली.

"बाबूजींना एक छानसं गाणं सुनाव." त्या बुढ्ढीच्या तोंडून निघालेल्या शद्बानीं राजाभाऊंच्या तंद्रीचा भंग झाला. आपण एकाद्या वेश्येच्या सान्निध्यांत आहोंत, हें तो इतका वेळ विसरूनच गेला होता. एकादी निष्पाप, निरागस बालिकाच आपणांशेजारीं बसलेली आहे, असा त्याला भास होत होता. पण बुढ्ढीचे ते शद्ब ऐकतांच वस्तुस्थितीची त्याला जाणीव झाली; आणि आपली आजची संध्याकाळ ह्या सुंदर तरुणीच्या सहावासात फारच मजेंत जाणार, ह्या विचारानें त्याला आनंद झाला.

बुढ्ढी निघून गेल्यावर मुमताज कोपऱ्यांतल्या तंबोऱ्याजवळ जाऊन त्याची गवसणी काढूं लागली, तोंच राजाभाऊ म्हणाला,

"राहूं दे, मुमाताज, मी कांहीं गाणं ऐकायला नाहीं आलों !" त्याला वाटलें, हें शद्ब उच्चारतांना आपल्या डोळ्यांतून इतकी कामुकता ओसंडत असावी, कीं त्याचीआपणाला खरोखरीच लाज वाटली पाहिजे ! पण तें क्षणभरच. वेश्यांच्या बाबतींत तो तज्ञ होता. प्रेमाचें आणि निरागसपणाचें नाटक करण्यांत त्या फारच चतुर असतात हें त्याला माहीत होतें. ह्याची आठवण होतांच,

त्याला वाटणारी लज्जा नाहींशी होऊन, मुमताजच्या मुग्धपणाच्या अभिनयावर तो खूष झाला. तिला जवळ घेऊन तिच्या यौवनाचा बहर लुटण्यास तो आतां अगदीं अधीर झाला—

——बऱ्याच वेळानें, मनाचें पूर्ण समाधान झाल्यावर तो परत जावयास उठला. तेव्हां मुमताज म्हणाली, "बाबूजी परत कधीं याल?"

"परत?" राजाभाऊ उद्गारला, "एकाच वेश्येकडे मी कधीं दोनदां जात नसतों."

"पण माझ्याकडे या ना तुम्ही परत एकदां." लाडिक आग्रहाच्या स्वरांत मुमताज म्हणाली.

राजाभाऊनें तिला मोठ्या खुषीनें पंचवीस रुपये दिले होते. पैशाच्या लोभानेंच ती आपणाला परत येण्याचा आग्रह करीत असावी, ह्या विचारानें किंचित् हंसून राजाभाऊ म्हणाला, "कां? माझ्याकडून कमाई चांगली होते म्हणून?"

त्याच्या ह्या प्रश्नानें मुमताज थोडीशी रागावलेली दिसली. ती कांहींच बोलली नाहीं.

"तसं असेल तर हे घे आणखी थोडे पैसे. मी खूष आहे तुझ्यावर." असें म्हणून राजाभाऊनें ऐटींत आणखी एक दहाची नोट तिच्या अंगावर फेकून दिली.

"पैसे!" संतापानें त्यानें दिलेले सर्व पैसे त्याच्या अंगावर भिरकावून मुमताज म्हणाली, "पैशासाठीं नाहीं सांगत तुम्हाला. घेऊन जा तुमचे सारे पैसे."

"पुरे, पुरे हें नाटक." राजाभाऊ हंसून म्हणाला, "वेश्यांचा नाटकीपणा मी चांगलाच ओळखतों."

"वेश्या!" मुमताज म्हणाली, "आम्ही धंदेवाईक वेश्या नाहीं. आम्ही गाणारणी आहोंत."

वेश्यांमध्येंहि उच्चनीच जाती असतात, आणि त्यांतल्या कांहींना आपल्या उच्चपणाचा अभिमान असतो, हे राजाभाऊला माहीत असलें तरी मुमताजचे हे शब्द ऐकून तिच्या अभिमानाचें त्याला हंसू आल्यावांचून राहिलें नाहीं. पण

त्याच्या त्या हंसण्यानें मुमताज अधिकच रागावली. तिचे टपोरे डोळे पाण्यानें भरून आले. काकुळतीच्या स्वरांत ती म्हणाली, "बाबूजी, परिस्थितीनें आम्ही नाडलों आहोंत. आमचा धंदा गाणारणींचा. पण आतां आमच्यासारख्या गाणारणींना विचारतो कोण? लोकाना आतां गाण्याची कदर आहे कुठें? नाईलाजानें हा धंदा आम्हांला आता करावा लागतो आहे—खरंच बाबूजी, याल ना तुम्ही परत?"

राजाभाऊला वाटलें, ही वेश्या आपल्या धंद्यांत फारच पारंगत आहे. आपल्या गिऱ्हाइकाला आपल्या मोहपाशात पुरतें कसें जखडून टाकावें, हें ती फारच उत्तम जाणते. उगाच वाद कशाला घाला, म्हणून तो म्हणाला, "बरं येईन."

"खरंच?" मुमताजनें विचारलें.

"हो. अगदीं खरं!" राजाभाऊ म्हणाला खरा, पण आपल्या स्वरांतला खोटेपणा मुमताजला उमगून तर नाहींना आला, अशी त्याला भीति वाटली.

"कधीं याल?" तिनें उत्सुकतेनें विचारलें.

"येईन उद्यांच!" धडधडीत खोटें सांगून राजाभाऊ जिना उतरूं लागला.

बाहेर बोळांत येऊन पोचल्यावर, अजूनपर्यंत कोणाहि वेश्येकडून कधींहि मिळालें नव्हतें इतकें समाधान आज आपणाला मिळालें आहे, ह्या विचारानें राजाभाऊ खूष झाला. तो खालच्या मोठ्या दरवाजाशीं असतांच दिवाणखान्याची ती जुनाट खिडकी करकरल्याचा आवाज त्याच्या कानावर आला, आणि त्यानें वर पाहिलें. त्या अंधारांत मुमताजची अस्पष्टशी आकृति त्याच्या दृष्टीस पडली. तिच्याकडे हात वर करून त्यानें तो दोनतीनदां हालवला, शांतपणानें एक सिगारेट शिलगावली, आणि मग तो घरचा रस्ता चालूं लागला.

एखाद्या चांगल्याशा हॉटेलांतून चहाभजीं खाऊन आल्यावर, त्याविषयीं आपण जितका विचार करतों, तितकाच विचार त्यानें नंतर मुमताजविषयीं केला, आणि थोड्याच वेळांत तिला तो पूर्णपणें विसरून गेला!

आपल्या नियमाला अनुसरून राजाभाऊ मुमताजकडे फिरून कधींच गेला नसता. तिच्याकडे जाऊन आल्यानंतर आठ दिवस होऊन गेले तरी त्याला तिची आठवणदेखील झाली नव्हती. येवढ्या अवधींत त्याला ज्या दोनचार सुख्या मिळाल्या होत्या, त्या दिवशीं नाविन्याच्या शोधांत निरनिराळ्या गल्ल्या धुंडाळीत तो फिरला होता. मुमताजकडून आल्यानंतर त्याला जें समाधान लाभलें होते, तसें त्याला नंतर परत कधींच मिळालें नव्हतें, हे खरें. त्यालाहि ह्याची जाणीव होती. पण मुमताज ही एक आपल्या धंद्यांत वाकबगार असलेली सुंदर वेश्या आहे, ह्या पलीकडे त्यानें ह्या गोष्टीला महत्त्व दिलें नाहीं.

पण नवव्या दिवशीं त्याच्यावरच्या कॅप्टनशीं त्याचा खटका उडाला. कॅप्टन त्याला नाहीं नाहीं तें बोलला, आणि त्याचें मनःस्वास्थ्य भंग पावले. त्या दिवशीं संध्याकाळीं तो थोडी जास्तच दारू प्याला; आणि एकाच वेश्येकडे दोनदां न जाण्याचा आपला नियम त्यानें त्या दिवशीं मोडला !

आपल्या मनांला रंजविण्यासाठीं त्याला आज भरपूर करमणूक पाहिजे होती. आपल्या गिऱ्हाईकाला संतोष कसा द्यावा, हें ती छोकरी उत्तम प्रकारें जाणते. आजची संध्याकाळ तिच्याकडेच काढल्याशिवाय आपलें मन शांत होणार नाहीं, अशी त्यानें मनाची समजूत घातली, आणि तो मुमताजकडे गेला.

तो येऊन बराच वेळ झाला तरी मुमताज बाहेर आली नाहीं. तिच्या सहवासाची तो अधीरतेनें वाट पहात होता, पण कितीतरी वेळ झाला, तिच्या बुढ्ढ्या आईचाच सहवास त्याच्या नशिबीं आला. ती आपल्या तारुण्यांतील वैभवाच्या गप्पा त्याला मोठ्या रंगवून सांगत होती. राजाभाऊचें मन अर्थातच त्यांत रमणें शक्य नव्हतें. मुमताजला बोलविण्याबद्दल त्यानें दोनतीनदां सांगून पाहिलें. बुढ्ढीनेंहि आत पाहून तिला हांक मारली, पण मुमताज कांहीं बाहेर आली नाहीं. अखेरीस जरासें रागावून राजाभाऊनें विचारलें, "आंत दुसरे कोणी बाबूजी आहेत काय ?"

"छे छे." बुढ्ढी लवकर लवकर म्हणाली, "बाबूजी, आम्हीं कांहीं अशा धंदा करणाऱ्या नायकिणी नाहीं. तुमच्यासारखे कुणी शरीफ आदमी आले तरच आम्हीं त्यांना खूप ठेवतों."

"मग, मुमताज बाहेर कां येत नाहीं तर? मला आणखी किती वेळ ताटकळत ठेवणार?"

त्याबरोबर बुढ्ढी घाईघाईनें आंत गेली. थोड्याच वेळांत ती बाहेर आली, आणि हंसत हंसत म्हणाली, "बाबूजी, पोरगी तुमच्यावर घुस्सा झाली आहे!"

"घुस्सा झाली आहे! तें कां? त्या दिवशीं मी पैसे तर भरपूर दिले होते?" राजाभाऊ जरासा ऐटींत म्हणाला. मुमताज करते तें सर्व पैशासाठींच करते अशी त्याची मनापासून समजूत होती.

"बाबूजी, मेहरबानी करून पैशाविषयीं बोलूं नका," किंचित् कठोर आणि अभिमानाच्या स्वरांत बुढ्ढी म्हणाली, "पोरगी मोठी जहांबाज आहे. तुम्हीं इतके दिवस आलां नाहींत म्हणून रागावली आहे ती तुमच्यावर. रोज तुमची वाट पाहून थकली बिचारी!"

बुढ्ढीचें हें बोलणें ऐकून राजाभाऊ मनांतून थोडासा खूष झाला. दुसरें कोणी गिऱ्हाईक मुमताजबरोबर आंत मजा मारीत असेल, ह्या विचारानें त्याच्या मनाला वाटणारी असूया आणि अपमान ह्या उत्तरानें नाहींसे झाले. तो मनांत म्हणाला, 'वा! प्रेमाचं नाटक करण्यांत हुषार आहे ही छोकरी! शृंगारचेष्टांना रंग कसा भरावा, हें उत्तम जाणते ती. वेश्या असावी तर अशी!'

"माजी, बोलवा तिला बाहेर. समजूत करीन मी तिची!" थोडेसें हंसून, मिशांना पीळ भरीत तो म्हणाला.

थोड्याच वेळात बुढ्ढीनें मुमताजला जवळजवळ ओढीतच बाहेर आणलें. आजचा तिचा फणकारा और होता. तिच्या त्या फणकाऱ्याकडे पाहून राजाभाऊला वाटलें, जणुं आपली फार दिवसांची ओळख आहे, जणुं आपल्या प्रेमाच्या आणाभाका झालेल्या आहेत, आणि म्हणून ती हक्कानें आपणांकडून प्रेमाची अपेक्षा करीत आहे. त्याला मोठी गंमत वाटली तिच्या ह्या वर्तणुकीची.

दोघांना एकांत मिळाल्यावर राजाभाऊनें विचारलें, "मुमताज, आतां पुरे झाला तुझा राग. हंस पाहूं थोडी."

"चला, खोटं बोलतां तुम्ही!" फणकाऱ्यानें मुमताज म्हणाली.

"काय खोटं बोललों मी?"

"त्या दिवशीं 'उद्यां येईन' म्हणून कबूल केलं आणि आज उगवली स्वारी! किती वाट पहावी माणसानं! किती निराशा होई माझी रोज!"

"काय पण बतावणी करतेस!" राजाभाऊ हंसून सहज म्हणाला, "जसं कांहीं माझ्याखेरीज दुसरं कुणी गिऱ्हाइक येतच नाहीं तुझ्याकडे! तुझं बोलणं ऐकून कुणाला वाटेल कीं माझ्याकरतां तूं झुरतेच आहेस!"

"बाबूजी, दुसरींहि कांहीं गिऱ्हाइकं येतात माझ्याकडे, नाहीं कसं म्हणूं? पोटासाठीं करावं लागतं हें." तिच्या आवाजांत लज्जेची छटा होती. ती पुढें म्हणाली, "पण आम्हांलाहि हृदय असतं. इतक्या गिऱ्हाइकापैकीं एखाद्यावरच आम्ही दिल् कुर्बान करतों."

तिचें हें भाषण ऐकतांना राजाभाऊ मनांतल्या मनांत हंसत होता. अगदीं हेंच उत्तर त्यानें आतापर्यंत कैक वेश्यांच्या तोंडून ऐकलें होतें. मात्र तिच्या प्रेमाच्या बतावणीवर तो खूष झाला होता. तसें तो बोलूनहि दाखविणार होता, पण तेवढ्यांत त्यानें विचार केला, "ही प्रेमाचें नाटक करते आहे ना? आपणहि यांत सामील होऊं या. ह्या कलेंत आपणहि कांहीं कमी तरबेज नाहीं! संध्याकाळला तेवढाच अधिक रंग चढेल." असा विचार करून तो गंभीरपणानें तिला म्हणाला, "प्यारी, माफ कर. रोज तुझ्याकडे—माझ्या बुलबुलाकडे यावंसं मला वाटे. पण करणार काय? मी हुकमाचा ताबेदार पडलों ना? अखेरीस वेळ मिळतांच हा बंदा तुझी माफी मागायला आज आला आहे."

त्यानें अशाच आणखी कांहीं गोडगोड थापा तिला मारल्या. तिची कळी हळूंहळूं खुलूं लागली. आपले डोळे प्रेमार्द्र करून त्यानें गोष्टी बोलतांबोलतांच तिला आपल्या बाहुपाशात कवटाळली. ज्या आपल्या शक्तीचा उपयोग रणांगणावर करावयाचा ती शक्ति आलिंगनात आणि चुंबनांत खर्च करून, त्यानें तिची नाजुक देहलता गुदमरून सोडली. तिच्या अधरामृताची अवीट गोडी मनसोक्त चाखून झाल्यावर त्यानें आपले ओठ तिच्या ओठांपासून किंचित् दूर केले, आणि तिच्या मुखाकडें पाहिलें. तिच्या गालांवर तांबडा रंग सांडला होता. कुठल्यातरी अमित सुखाच्या धुंदीनें जड झालेल्या तिच्या पापण्यांनीं तिचे टपोरे डोळे अर्धवट झांकले होते. तिच्या नाकाच्या नाजुक पाकळ्या किंचित् आरक्त आणि विस्फारीत झाल्या होत्या. तिच्या मुखाकडे पाहून राजाभाऊ मनांत म्हणाला, 'प्रथम चुंबनाच्या अनुभवाचा अभिनय किती उत्तम वठवला आहे हिनं!' पण तो असा विचार करतो आहे तों, त्याच्या

मगरमिठींतून नाजुकपणें आपणांला सोडवून घेऊन, ती त्याला म्हणाली, "बाबूजी, आज मी तुम्हांला एक गाणं सुनवतें. माझी तबियत आज फार खूष आहे. पहा तर खरं, आपला बुलबुल कसा गातो तें!"

येवढें बोलून त्याच्या अनुज्ञेची वाटहि न पाहतां एकाद्या अल्लड बालिके-प्रमाणें उड्या मारीत ती तंबोऱ्याजवळ गेली, आणि लवकरच बैठकीवर बसून तिनें गावयास सुरवात केली. तिनें करून दिलेली पानपट्टी चघळीत आणि सिगारेटचे फवारे सोडीत राजाभाऊ तिचें गाणें नाइलाजानें ऐकूं लागला.

मुमताज ब्रिजभाषेंतील एका विरहगीताचे स्वर आळवूं लागली. तिच्या कंठांतून बाहेर पडणारे जोगीयाचे स्वरालाप राजाभाऊच्या हृदयाचा ठाव घेऊं लागले. प्रथम जरी तो अनिच्छेनेंच तिचें गायन ऐकावयास बसला होता, तरी हळूंहळूं स्वतःच्या नकळतच त्याचें मन तिच्या गाण्यांत रमूं लागलें. जणुं काय, आपल्या कंठांतून निघणाऱ्या स्वरमालांनीं ती एक सुंदर जाळेंच विणीत होती, आणि एकाद्या असहाय्य भक्ष्याप्रमाणें राजाभाऊ त्यांत गुरफटला जात होता. संगीताच्या आनंदांत तल्लीन झालेली तिची सुंदर मूर्ति डोळ्यांनीं पाहतांना, आणि तिच्या गळ्यांतून निघणाऱ्या नादमधुर स्वरलहरींना कानांत सांठवून ठेवतांना, तो काळाचें भान विसरला. हातांत तशाच जळत राहिलेल्या सिगारेटनें त्याच्या बोटांना चटका दिला, तेव्हां ती फेंकून देण्यापुरता तो भानावर आला होता तेवढाच. नाहींतर साऱ्या जगाला विसरून तो एकतान होऊन बसला होता. पूर्वी कधींहि न अनुभवलेली प्रसन्नता त्याच्या मनाला ह्यावेळीं वाटत होती.

पण लवकरच त्या प्रसन्नतेची जागा एका विलक्षण प्रकारच्या हुरहुरीनें घेतली. अजूनपर्यंत कोणाहि स्त्रीच्या सहवासांत त्याला अशी संवेदना झाली नव्हती. परंतु ही नवीनच उद्भवलेली संवेदना त्याला सुखकारक वाटली नाहीं. त्या संवेदनेंत त्याला आतुरता, भीति, आर्तता, ह्यांचें विलक्षण मिश्रण आढळून आलें. मुमताजचें संगीत ऐकत असतांना आपणांला अशी विचित्र संवेदना कां व्हावी, हेंच त्याला कळेना; किंवा त्या संवेदनेचें नक्की स्वरूप काय आहे, हेंहि त्याला ओळखतां येईना. पण मुमताजच्या कंठांतून बाहेर पडणारे ते आरोहाव-रोहयुक्त आलाप, अद्यापपर्यंत त्यानें कधींहि उपयोगांत न आणलेल्या त्याच्या हृदयाच्या एका कप्प्याला डिंवचीत होते, हें मात्र खास. त्याची छाती

विनाकारण धडधडूं लागली. त्याला गुदमरल्यासारखें वाटूं लागलें. आपल्या कंठांतून निर्माण होणाऱ्या नादब्रह्मांत मुमताज जसजशी रंगून जाऊं लागली, तसतशी राजाभाऊची मुद्रा अधिकाधिकच व्याकुळ आणि कष्टी दिसूं लागली. जणुं काय त्याच्या हृदयाच्या कुठल्यातरी एका भागावर गंज चढलेला होता, आणि तिच्या संगीताच्या कानशीनें तो घासून काढला जात होता. अखेरीस आपल्या हृदयातील भावनाचा कल्लोळ त्याला असह्य झाला. उजव्या हातानें त्यानें आपली छाती घट्ट दावून धरली, आणि आपला डावा हात वर उगारून तो मोठ्या प्रयत्नानें ओरडला, "नको! नको! पुरें कर तुझं हें गाणं!"

त्याच्या ह्या अनपेक्षित ओरडण्यामुळें मुमताज दचकली. तिच्या कंठांतून बाहेर पडणारा एक आलाप अर्ध्यावरच तुटला. तंबोऱ्याच्या तारांवर तिच्या बोटाचा वेडावाकडा संघर्ष झाला, आणि त्यांतून विचित्र बदसूर बाहेर पडला! थोडाच वेळ तिचा तो आलाप आणि तंबोऱ्याचा तो बदसूर त्या निःस्तब्ध दिवाणखान्यांत घुमला, आणि नंतर सर्वत्र शांत झालें.

तिचें गायन बंद झाल्यावर राजाभाऊ हळूंहळूं भानावर आला. त्याचा श्वासोच्छ्वास मोकळा होऊं लागला. कुणींतरी आपली छाती आवळून धरली आहे असा त्याला मघां भास होत होता, ती आंवळ आतां हलकें हलकें सैल पडूं लागली. एक मोठा निश्वास सोडून आणि आपल्या छातीवर दाबून धरलेला हात काढून घेऊन तो एकदम एका तक्क्याला रेलून बसला.

पण नंतर मात्र तेथें बसण्यांत त्याला मौज वाटेना. साऱ्या संध्याकाळचा बेरंग झाला होता. मुमताजकडे त्यानें आपली दृष्टि वळवली, पण नेहमींप्रमाणें त्याच्या मनांत कामविकार जागृत झाले नाहींत. आपल्या शरीरांतील पौरुष एकाएकी नष्ट झाल्याप्रमाणें त्याला वाटूं लागलें. त्यानें एकदोनदां मुमताजकडे कामुकतेनें पाहण्याचा प्रयत्न केला, पण त्याची ती दृष्टि तिच्या चेहऱ्यावर स्थिर राहीना. मुमताज त्याला सुंदर दिसत होती. अजूनपर्यंत कोणतीहि स्त्री-मुमताज-देखील-त्याला दिसली नव्हती, इतकी सुंदर, पवित्र आणि एक प्रकारच्या सौम्य, दिव्य तेजानें उजळलेली ती त्याला दिसत होती. तिच्याकडे रोखून पाहण्याचें त्याला धैर्य होईना. तिच्या सौंदर्याचा पैस देऊन उपभोग घेण्याची कल्पना

त्याला पापमय वाटूं लागली. त्याच्या मनांत घडून आलेल्या ह्या स्थित्यंतरानें तो पुरता गोंधळून गेला.

आतां तेथें थांबण्यांत त्याला अर्थ वाटेना. जाण्याकरतां तो बैठकीवरचा उठला, आणि मान खालीं घालून तिच्याकडे न पाहतांच तो म्हणाला, "अच्छा, मुमताज, मी जातों आतां."

"इतक्यांत?" मुमताजनें आश्चर्यानें प्रश्न केला. "कां? माझ्या गाण्यावर नाराज का झालांत?"

"अं? नाहीं. तूं छान गातेस! पण मी — मला बरं नाहीं वाटत." आपण काय बोलतों आहोंत, हें त्याला समजत नव्हतें. येवढें बोलून होईतों तो दरवाज्याशीं येऊन पोहोंचला देखील होता. मुमताजच्या अधिऱ्या पावलांचा आवाज त्याला आपल्या पाठीशीं ऐकूं आला, आणि त्याच्या पाठोपाठ तिचें शद्ब त्याला ऐकूं आले,

"मग थांबा ना जरा. मी डॉक्टरला बोलावून आणतें."

"नको, नको." त्रासिक स्वरांत राजाभाऊ म्हणाला, "मी जातों. बाहेरच्या हवेनेंच मला बरं वाटेल!"

त्यानें किंचित् मागें वळून पाहिलें. त्या दिवाणखान्यांतील जुनाट निस्तब्ध वातावरण, त्याच्या कानांवर अजूनहि रेंगाळणारे मघांच्या संगीताचे स्वर, आणि निराळ्याच स्वरुपांत दिसणारी ती मुमताज, ह्या सर्वांचा त्याच्या मनावर होणारा परिणाम त्याला असह्य वाटला. आपली छाती परत धडधडूं लागल्याचा त्याला भास झाला. येथून आपण केव्हां एकदां बाहेर पडतों, असें त्याला होऊन गेलें, आणि एकाद्या भीतिदायक वस्तूपासून पळून जावें, तसा तो एकदम जिना उतरूं लागला.

"बाबूजी, परत कधीं याल?" मुमताजचे शद्ब त्याच्या कानावर आले.

"उद्यां!" मागें वळूनहि न पाहतां, जिन्याच्या शेवटच्या पायरीवरून उडी घेतां घेतां त्यानें उत्तर दिलें.

"खरंच ना पण? नाहींतर त्या दिवशींसारखें—"

पण मुमताजचे पुढचे शद्ब त्याला ऐकूं आले नाहींत. चौक ओलांडीत असतांना मुमताजनें मारलेल्या 'बाबूजी, बाबूजी!' अशा हांका त्याच्या

कानांवर येऊन पडत होत्या. पण त्यांतील आर्तता त्याच्या ध्यानांत आली नाहीं, कीं त्यानें मागें वळूनहि पाहिलें नाहीं. बोळांत आल्यावर त्याच्या मनाला सारखा भास होत होता, वरच्या त्या नक्षीकाम केलेल्या जुनाट खिडकींत कोणी तरी उभें आहे, पण त्यानें आपली नजर वर करून पाहिलें नाहीं. मुमताजपासून केव्हां एकदां दूरदूर जाऊन पोहोंचतों, असें त्याला होऊन गेलें होतें.

जसजसा तो त्या वाड्यापासून दूर जाऊं लागला, तसतसें त्याला मोकळें वाटूं लागलें. आज जो विचित्र अनुभव त्याला आला होता, त्यावर तो आतां शांतपणानें विचार करूं शकत होता. अखेरीस, नेहमींपेक्षां अधिक दारु प्यालाचा व एकाच वेश्येकडे दोनदां न जाण्याचा नियम मोडल्याचा हा परिणाम असावा, असें त्यानें एकंदर प्रकाराचें आपल्या मनाशीं स्पष्टीकरण केलें, आणि मग तो त्याविषयीं सर्व विसरून गेला.

लवकरच त्याच्या तुकडीबरोबर ईजिप्तच्या आघाडीवर त्याची रवानगी झाली. दिल्लीहून मुंबई, एडन, कायरो वगैरे शहरीं त्यानें थोडे थोडे दिवस काढले. रजेच्या दिवशीं संध्याकाळीं तेथेंहि त्यानें आपला क्रम चालूंच ठेवला होता. मुमताजची आठवण ह्या अवधींत त्याला क्वचितच आली होती. कधीं काळीं ती आलीच तर एखाद्या दुष्ट स्वप्नाच्या आठवणीप्रमाणें तिला ताबडतोब दडपून टाकण्याची तो खबरदारी घेई. आपणाशीं संबंध आलेल्या हजारों वेश्यांपैकींच एक,—पण त्यांतल्या त्यांत शृंगारचेष्टांत अत्यंत चतुर व सुंदर अशी एक वेश्या, ह्यापलीकडे तो तिला अधिक किंमत देऊं इच्छीत नव्हता. म्हणूनच आपली ही अशी प्राणांतिक अवस्था झालेली असतांना, आपणांला तिचीच आठवण यावी, ह्याचें त्याला आश्चर्य वाटत होतें.

लढाईची धुमश्चक्री चालूच होती. राजाभाऊच्या छातींतील जखमेंतून रक्तप्रवाहहि चालूंच होता. थोड्याच वेळांत ह्या बाह्य जगांतील कोणतेहि आवाज त्याला ऐकूं येण्याचें बंद झालें. साऱ्या विश्वावर एक भेसूर निःस्तब्धतेची अवकळा पसरल्यासारखी त्याला भासूं लागली. पण त्याच निःस्तब्धतेंतून

स्वर्गीय संगीताचे स्वर हळूंहळूं उमटूं लागले. मागें एका प्रसंगीं ते स्वर ऐकून त्याच्या हृदयाचा थरकांप उडाला होता. पण आतां त्याच स्वरांनीं त्याच्या साऱ्या शरीरांतून एक गोड शिरशिरी निघून गेली. क्षणाक्षणाला निःशक्त होत जाणाऱ्या त्याच्या हृदयाला गोड गुदगुल्या झाल्या. त्याच वेळीं, इतका वेळ त्याच्या डोळ्यांसमोर असलेली तारकायुक्त अमावास्या नाहींशी होऊन, तिची जागा पौर्णिमेनें घेतली. आकाशांत एकटा चंद्रच होता. त्याला भुंग्यासारखे दोन डोळे होते, सफरचंदासारखे गाल होते, आणि त्याचे पोवळ्यासारखे लाललाल दिसणारे ओठ अमृत वितरीत होते. आपल्या शरीरातले सारे स्नायु अखेरचे आखडण्यापूर्वी, जणुं तें अमृत टिपण्यासाठींच राजाभाऊनें आपल्या सुकून गेलेल्या ओठावरून एकदां जीभ फिरवली, आणि मनाच्या असीम प्रसन्नतेनें त्याच्या ओठांतून शेवटचे शद्ब बाहेर पडले, ' मु...म...ता...ज ! मु...म...ता...ज ! "

# वधू पाहिजे !

"हुकुमडर्रर् !"

बोळांतल्या कचऱ्याच्या कुंडींत माझ्या हातांतील टोपली मी रिकामी करणार, इतक्यांत माझ्या तोंडावर 'टॉर्च' चा लख्ख प्रकाश पडला, आणि त्याच्यामागोमाग हे शब्द माझ्या कानांवर येऊन आदळले.

अशा मध्यरात्रीच्या अंधारांत जें कृत्य करावयास मी निघालों होतों, तें कृत्य पोलिसांच्याच काय पण कुठल्याहि मानवी चक्षूंनी पाहूं नये, अशी माझी स्वाभाविकच इच्छा होती. आणि म्हणूनच तर सारा गाव झोपीं गेला आहे अशी खात्री करून घेऊन मी हा असा मध्यरात्रीं लपत छपत बाहेर पडलों होतों. पण विधिघटना काय विचित्र असते पाहा ! एखादा मोठा दरोडा पडत असताना पोलिसांचा कुठं मागमूसहि सांपडणार नाहीं; पण माझ्या-सारख्या समाजाच्या एखाद्या प्रतिष्ठित घटकानं कुठलंहि काम जरा गुप्तपणानं करूं म्हटलं तर तिथं मात्र कायदा आणि सुव्यवस्था ह्यांचा रखवालदार अगदी आमंत्रण दिल्याप्रमाणं बिनचूक हजर व्हायचा, हें जसं कांही नक्कीच !

"मी ? मी आहे." त्याच्या त्या अनपेक्षित 'हुकुमडर्रर्'ला काय उत्तर द्यावं हें न कळून मी म्हणालों व हातांतील टोपली पाठीशीं लपविली. ह्या उत्तरानं त्याचं समाधान झाल्यासारखं दिसलं.

" इथं ह्या वेळीं काय करता ? चांगले संभावित दिसतां ! "—त्यानं विचारलं.

" मग आहेच मी संभावित ! "

" आणि संभावितपणाच्या बुरख्याखालीं हे असले चोरटे उद्योग करतां ! पाहूं पाठीशी काय लपवलं आहे तें ? "

जें माझ्या हातात कुणी पाहूं नये असं मला वाटत होतं, तें आपण होऊन त्याला दाखविणं माझ्या जिवावर आलं. मीं उडवाउडवी करीत म्हटलं, " कांही नाही. टोपली आहे ती. "

" टोपली ? काय आहे टोपलींत ! "

" कांही विशेष नाही. "

" पण काय आहे तें सांगा ना ? "

" आपला...कचरा. "

" कचरा अं ? अस्सं ! आणि तुमच्यासारखा संभावित इसम कुंडींत नुसता कचरा टाकण्याकरता अशा बेरात्रीं आलाय ! साहेब, दुनिया आतां इतकी भोळी राहिली नाही ! " नंतर आपली उपरोधिक नम्रता एकदम झुगारून देऊन ज्याच्या पाठीशीं दोस्त राष्ट्रांचं सारं सामर्थ्य उभं आहे अशा माणसाच्या आत्मविश्वासाच्या आवाजांत त्यानं मला हुकूम केला, " टोपली रखो नीचे. "

त्या टोपलींत घरांतल्या आणि दवाखान्यांतल्या केराखेरीज दुसरं कांहीच नव्हतं. शिवाय दोस्त राष्ट्राच्या शक्तीचा प्रतिकार करण्यांतहि कांहीच अर्थ नव्हता. म्हणून मीं माझ्या हातांतील टोपली त्याच्या पुढयांत ठेवली.

एखाद्या मारून ठेवलेल्या सावजाचा चट्टामट्टा उडवण्यापूर्वीं वाघोबांनी आपल्या मिशांवरून जीभ फिरवावी तसा त्यानं आपल्या मिशाना थोडा पीळ भरला, आणि नंतर मला एकदां न्याहाळून घेऊन आपल्या 'टॉर्च'चा झोत त्यानं टोपलीवर टाकला. हातांतील काठीनं टोपलींतील कचरा जरा ढवळून झाल्यावर त्यानं विचारलं, " हा कचरा काय ? "

" नाही !...आपलं होय ! " त्यानं तो प्रश्न अशा रुबाबांत विचारला होता, की कुणीहि त्याचं उत्तर 'अर्थात् नाही' असंच दिलं असतं. तसं

उत्तर माझ्या तोंडून निघून गेल्यावरच माझी चूक माझ्या लक्षांत आली नि मीं ती लवकर सुधारून घेतली.

" कचऱ्याला रक्ताचे डाग हो कसे ? " माझ्याकडे भेदक नजरेनं रोखून पाहात त्यानं विचारलें, आणि आपल्या छातीवरच्या खिशांतून त्यानं एक छोटीशी वही काढली. नंतर पायाला बांधलेल्या पट्टींत ठेवलेलं एक पेन्सिलीचं थोटुक काढून घेऊन तो लिहिण्याच्या पवित्र्यांत उभा राहिला आणि म्हणाला, " चला, मिस्टर, नांव सांगा तुमचं ! "

" डॉक्टर देशपांडे. " मी डॉक्टर आहे असं समजतांच त्याचं शंकानिरसन होईल, अशा अपेक्षेनं मी जरा छातीठोकपणानंच माझं नांव सांगितलं. पण माझे हे शब्द ऐकतांच त्याला आलेल्या शंकेविषयी आतां तर त्याला मुळीच शंका राहिलेली नसावी असंच उलट दिसून आलं. तो म्हणाला, " डॉक्टर अं ? अस्सं ! आतां आलं ध्यानांत. स्वतः डॉक्टर रात्रीची वेळ साधून रक्तानं माखलेला कचरा कुंडींत टाकायला येतात ! वाऽ रे डॉक्टर ! चला सरकारवाड्यावर ! "

" पण माझा गुन्हा काय आहे हें मला आधीं कळेल का ? " मीं कायद्याचा प्रश्न उपस्थित केला.

" गुन्हाबिन्हा आतां सारं कळेल सरकारवाड्यावर. तुम्ही माझ्याबरोबर चला गुपचुप-आणि मुद्देमालहि घ्या बरोबर. "

स्पष्टीकरणाचा मीं काहींहि प्रयत्न केला की मला निरुत्तर करणारं त्याचं आपलं एकच ठराविक उत्तर होतं-" आतां काय सांगायचं तें सरकारवाड्यांत सांगा ! "

टोपलींतला तो ' मुद्देमाल ' घेऊन मीं त्याच्याबरोबर सरकारवाड्याचा रस्ता चालूं लागलों.

युद्धामुळं वस्तूंचा ( सजीव आणि निर्जीव ) पुरवठा कमी होतो. पुरवठा कमी झाला की स्वाभाविकच वस्तूंची मागणी वाढते. मागणी वाढली की त्यामागोमाग वस्तूंच्या किमतीहि वाढल्याच. शिवाय मध्यवर्ति सरकारच्या

गंगाजळींत युद्धामुळं नाण्यांचा तुटवडा पडूं लागतो. अर्थातच बेसुमार चलन-वाढ करणं सरकारला भाग पडतं आणि चलनवाढ झाली की आधींच वाढलेल्या वस्तूंच्या किमतींत अधिकच वाढ होते. आणि मग ह्या साऱ्यांचा परिणाम वस्तु दुर्मिळ होण्यांत होतो. त्या रात्रीं माझ्यावर जो अनर्थ गुदरला त्याच्या बुडाशीं असलेलं अर्थशास्त्राचं तत्त्व हें असं होतं.

आमच्याकडे बारा वर्षं कामावर असलेली साठ वर्षं वयाची सखू मोल-करीण साधारण चार महिन्यांपूर्वी हातात महिन्याचा पगार पडतांच म्हणाली, " पुढल्या महिन्यापासनं आठ रुपये पगार द्यायची हिंमत असेल तर मी रातुं या. "

" काय ? आठ रुपये ! " मंजु-माझी 'ही' -- म्हणाली. " अग सखू, दोन रुपयांचं काम ! महागाई म्हणून दोनाचे चार केलं. चाराचे सहा केले. आता सहाचे आठ करा म्हणतेस ? वा ऽ ग वा ! वाढतच चाललं तुझं ! "

" पाहिजे असलं तर ठ्यवा. आठ रुपयाखाली मला नाय परवडायचं ! ' आजचा तिचा स्वर जरा निराळाच होता.

ती आमच्याकडे बारा वर्षं होती. ह्या अवधींत अडीअडचणीच्या वेळीं आम्हीं तिला पैशाआडक्याची मदत केली होती. पुष्कळदा फुकट औषधं दिलीं होतीं. असं असून देखील तिनं अशा उर्मटपणानं बोलावं ह्याची मला चीड आली. मी मधेच म्हणालों, " सखूबाई, आठ रुपये देणें आम्हांला परवडणार नाही ! "

" नाय तर राहयलं. माझी बळजोरी थोडीच हाय ! " आपल्या वाकलेल्या कंबरेवर हात ठेवून दरवाज्याकडे जातां जातां सखू म्हणाली, " म्हंगालं, गुदस्तच्या सिंहस्थापासनं काम करतुया इथं, तर आपलं इचारून पाहावं. "

" कांही नकोत येवढे उपकार करायला बरं, सखूबाई ! " मंजू म्हणाली, " गावांत कांही तोटा नाही पडला मोलकरणींना ! "

" हो ! मोलकरणी कांही लढाईवर नाहीं गेल्या ! "—मी.

एक सखू गेली तर तिच्या बदली पन्नास मोलकरणी उभ्या करूं अशी आमची खात्री होती. आणि उलट पगारांत आमची बचत झाली असती ती निराळीच ! तेव्हां सखूला आम्हीं अगदी हसतमुखानं निरोप दिला.

संध्याकाळीं मंजूनं तिच्या मैत्रिणींकडे व मीं मला जो जो भेटेल त्याच्या-कडे-मित्र, पेशंट कुणीहि-एक मोलकरीण पाठवून देण्याविषयी सांगून ठेवलं. आमच्या अदमासाप्रमाणं दुसऱ्या दिवशीं सकाळपासून एक एक उमेदवार येऊं लागले व मंजू त्याच्या मुलाखती घेऊं लागली. पाच सहा उमेदवारांशी कांही ना काही कारणांवरून बोलणीं फिसकटल्यावर सहाव्या उमेदवाराशीं मंजूची पुढीलप्रमाणं मुलाखत झाली:

" ...हा दवाखाना आणि हें घर-एकंदर पांच खोल्या झाडायच्या. धुणीं-भांडीं करायचीं दोन माणसांचीं. आणि तीन लहान मुलं आहेत, त्यांचीं काय-भांडीं पडणार ? केर मागच्या बोळांत कुंडींत नेऊन टाकायचा. गिरणींतून महिन्यांतून दोनदा धान्य दळून आणायचं, घासलेट आणायचं– " मंजू कामाचा पाढा वाचीत होती. पण तिला मधेच अडवून ती उमेदवार म्हणाली, " पगार काय द्याल तें सांगा ! "

तिच्या त्या प्रश्नावरून ती कामाला डरणारी नसावी असं दिसलं. आम्हांला तरी काय ? हेंच पाहिजे होतं. उमेदवारात काम करण्याची उमेद नसली तर ती उमेदवार कसली ?

" पगार आम्ही चार देऊं. "–मंजू.

" चारच ! "

" मग ? काय कमी झाले का ? सारं दोन रुपयाचं तर काम ! "

" पण बाईसाब, ह्यो दिवस तर बघा .. "

" बरं सहा घे. "

" सहानं काय व्हतंय् ? काम कित्ती हाय ! पाच खोल्या झाडायच्या– त्यांत दवाखान्याचं काम !... "

" दवाखान्याचं काम म्हणजे दवाखाना नुसता झाडायचा ! "

" म्हून काय झालं ? तरीबी त्यें दवाखान्याचं काम ! अन् भांडीं घासायचीं, त्यींबी खालीं चौकात नेऊनशाऽऽन--जिन्यांची चढउतर करायचीऽऽ!...केर कुंडींत नेऊन टाकायचाऽऽ! ..उठायचंऽऽ! बसायचंऽऽ!... "

" बरं मग तुला किती हवेत ? "

" ज्यास्त काय नाय सांगत, आठ द्या. "

अखेरीस थोडा वेळ त्याची घासाघीस झाल्यावर माझ्या मध्यस्थीनं त्या उमेदवाराची आठावर नेमणूक झाली, किंवा पुढं जो आम्हांला अनुभव आला त्यावरून तिनंच आपली नेमणूक करून घेतली असं म्हणणंच अधिक समर्पक झालं असतं! आता सखूहि आठच रुपये मागत होती हें खरं; पण तिनं आमच्याकडं बारा वर्षं दोन रुपयावर काम केल्यावर आता तिला आठ रुपये कबूल करणं म्हणजे एक प्रकारानं आम्ही पराभव कबूल करण्यासारखंच नव्हतं का ?

दोनचार दिवस सारं सुरळीत चाललं. एक दिवस अकस्मात् ही नवी मोलकरीण यायची बंद झाली. मग मंजूनं स्वतः धुणींभांडीं केलीं. तिसऱ्या दिवशीं निरोपावर निरोप पाठवून, त्या मोलकरणीला दहा रुपये पगार ठरवून मोठ्या मिनतवारीनं आणलं. महिन्याचा पगार तिच्या हातात पडेपर्यंत परत सारं ठीक चाललं; पण तिच्या हातावर पगार पडतांच ती कायमची अदृश्य झाली !

त्यानंतर दोनतीन महिन्यांच्या अवधींत आमच्या आठदहा मोलकरणी झाल्या. आदलीपेक्षा पुढलीला एकदोन रुपयानी पगार वाढवीत होतों, तरी दोनचार दिवस झाले की मोलकरीण यायची अकल्पितपणानं बंद होई. तपासा अंती कुणाला पगार कमी वाटत असल्याचं, कुणाला काम झेपत नसल्याचं कुणाला वेळ नसल्याचं, कुणाची तब्बेत बिघडल्याचं, तर कुणी मंजूविषयी 'बया लई चिक्कट हाय !' असं मत बनविल्याचं आम्हांला कळून येई. मित्रमंडळांकडे तपास केला तर त्यांच्याहि मोलकरणी एकाएकी अदृश्य होऊ लागल्याचं त्यांच्याकडून कळून आलं. मोलकरणी एकाएकी महाग कां झाल्या आणि त्यांची प्रकृति मोलकरणीचं काम न झेपण्याइतकी नाजुक कां होऊ लागली ह्याचं कारण आम्हांला लवकरच कळून आलं. गांवाबाहेरील लष्करी कँपमध्यें बांधकामाच्या कॉंट्रॅक्टर्सकडे पाट्या वाहण्याच्या कामावर जाऊन युद्धसहकार्य करणाऱ्या बायाना रुपया सव्वा रुपया रोज मिळे, जाण्यायेण्याला मोटारलॉरी मिळे, बाजरी घरपोच मिळे ! मग त्याना इतर कामाची काय जरूर ? जी उठली ती मोलकरीण कँपांत कामावर जाऊन रुबाब करू लागली.

पण मोलकरणींना आमच्या कामाची जरूर नसली तरी मोलकरणीवांचून आमचं कसं चालणार? थोडे दिवस ज्यानीं मोलकरणीवांचून काढले असतील त्यांनाच मोलकरीण नसली म्हणजे गृहयंत्र कसं बिघडून जातं याची कल्पना येईल. जसजशा मोलकरणी दुर्मिळ होऊं लागल्या, तसंतसं मोलकरणींच्या शोधांत राहणं हा आमच्यामागं एक उद्योगच लागला. रस्त्यानं जाणारी कुठलीहि खालच्या वर्गातील स्त्री दिसली की लोकापवादाची पर्वा न करतां, ही आपणाकडे मोलकरीण राहील का, ह्या एकाच प्रश्नार्थक दृष्टीनं तिच्याकडे पाहात राहण्याचं मला वेड लागलं. 'आम्हाला एक मोलकरीण पाहिजे' अशा जाहिराती मी मित्रमंडळींत फडकावल्या. अधूनमधून एखादी मोलकरीण कुणी पाठवून देई आणि मग पुढीलप्रमाणं प्रसंग घडून येई :

दरवाजावरची घंटी वाजल्यामुळं मी किंवा मंजू जाऊन दार उघडी. भट्टींतील पातळ नसलेली आणि केसावर तेल थापून नीट भाग पाडलेली एखादी खालच्या वर्गातील स्त्री दरवाजात उभी असलेली आम्हाला दिसून येई. आम्ही म्हणत असूं, "या, काय काम आहे?"

"कामवाली पाहिजे ना तुम्हास्नी?"— ती स्त्री.

"हो, हो. या, या. अशा बसाना." एक खुर्ची पुढं करून आम्ही म्हणत असूं, व तिच्यापुढं मोठ्या आदबीनं उभे राहात असूं.

ती खुर्चीवर स्थानापन्न होऊन, रुमालनं तिनं आपल्या कपाळावरील तेल व घाम टिपून घेतल्यावर मोलकरणीच्या कामाच्या अटी-प्रतिअटींविषयीं आमच्या साधारण पुढीलप्रमाणं वाटाघाटी होत.

"काम लयी हाये बाई तुमचं! तीन घंटे अन् धा मिन्टं तरी मोडत्याल!" मंजूचा कामाचा पाढा वाचून झाला की 'इचार' करून ती युवती म्हणे, "मास्नी कुठं हाये यितका येळ! फकस्त तीन घंटे फुरसत मिळते मास्नी!"

"दहा मिनिटानीं काय होणार हो बाई?" मंजू विचारी. जसा कांहीं तिचा वेळ म्हणजे अगदीं गव्हर्नरसाहेबांचा वेळ होता.

"पगार काय द्याल?" ती युवती.

"पंधरा देऊं."— मंजू.

"काय पंधरा? ह्यॅऽह्यॅऽह्यॅ!" नंतर आपलं हासूं आवरून ती प्रश्न करी, "दुपारचा नळ कवाशिक येतो?"

" साडेचारला. "

" मग झालंच तर. चार वाजतां मला इज्यांच्या कारखान्यांत लेबलं डकवायास्नी जायाचं असतं. "

" बाई, असं करूं नका. कसंहि करून माझं येवढं काम धराच ! " काकुळतीला येऊन मंजू म्हणे.

" पण बाई, मला येळ नाही त्येला काय करूं ? इज्यांच्या कारखान्यांत मस्नी दीड रुपया रोज मिळतो. " मनगटावरील घड्याळात 'टाईम' पाहून खुर्चीवरून उठतांउठता ती म्हणे, " त्यें काम का मी सोडूं तुमच्या पंधरा रुपड्यांकरतां ? "

" आता 'नाही' म्हणूं नका. कसंहि वेळांत वेळ काढून माझं येवढं काम धराच. पाहिजे तर वीस रुपये घ्या. " तिच्यामागोमाग जात मंजू तिला फक्त पदर पसरण्याचं बाकी ठेवून म्हणे.

मंजूचं हें केविलवाणं बोलणं ऐकून माझं अंतःकरण कळवळून येई. एके काळीं मोलकरणींशीं ताठ्यानं वागणाऱ्या मंजूवर आतां मोलकरणीचेच पाय धरण्याचा प्रसंग यावा हें पाहून ही लढाई सुरू करून मोलकरणींच्या स्वरूपांतले असंख्य हिटलर निर्माण करणाऱ्या हिटलरला मी मनांतल्या मनांत शिव्यांची लाखोली वाही. आणि मग मंजूची समजूत घालण्याकरितां तिला म्हणे, " कशाला येवढी अजीजी करतेस मंजू ? ही नाहीं तर दुसरी मोलकरीण मिळेल ! "

माझं हें वाक्य ऐकून कारुण्यपूर्ण दृष्टीनं मंजू माझ्याकडे पाही. माझ्या वाक्यांतील फोलपणा—दुसरी मोलकरीण मिळण्याविषयींची तिची पूर्ण निराशा—त्या तिच्या दृष्टींतून व्यक्त झालेली असे. तो अर्थ जाणून मी म्हणे, " न मिळाली तर नको मिळूं दे ! लढाई संपेतोंवर दिवस आहेत या लोकांचे. पण आपले हातपाय तर काहीं मोडले नाहीत ना ? ते शाबूत आहेत तोंवर आपणहि स्वावलंबी बनायला शिकलं पाहिजे ! "

मी हें आवेशपूर्ण भाषण करी तें मंजूचं मनोधैर्य खचूं नये म्हणून. पण त्याचा तसा अर्थ न घेतां ती जरा फणकाऱ्यानंच म्हणे, " माहीत आहे तुमचं स्वावलंबन ! आपण दवाखान्यांत औषधं बनवायचीं नाहीतर गोष्टी

खरडत बसायचं ! स्वयंपाक करून, मुलांचं करून, धुणीभांडीं, झाडलोट मीच करतें, तोंवर ठीक आहे तुमचं स्वावलंबन !"

ह्यावर मी गप्प राहीं. तिच्या बोलण्यांत बराच तथ्यांश होता, हें मला कबूल करणं भागच आहे. पण मी तरी काय करणार ? काम करायला माझी पूर्ण तयारी होती. पण मी एवढा एम्. बी. बी. एस्. डॉक्टर, एक प्रतिष्ठित नागरिक, मी काय खालीं चौकांत भांडी घाशीत बसूं कीं धुणीं आपटीत बसूं ? हीं कामं निसर्गाच्या वांटणीप्रमाणें मंजूकडेच येत, त्याला माझा तरी काय इलाज ?

"झाडलोट केलेला हा इतका कचरा साचलाय्. हा कोण कुंडीत नेऊन टाकणार ?" एक दिवस मला मंजूनं विचारलं. आतापर्यंत नोकरांनीहि "चाळीस रुपये पगार द्या, नाहीतर आपला दुसरा माणूस पाहा !" असा निर्वाणीचा खलिता देऊन कँपांत प्रयाण केलं होतं, आणि साऱ्याच कामाच्या बाबतींत आम्हीं स्वावलंबनाचा अवलंब केला होता.

"आँ ?" मी गोंधळून उद्गारलों.

"मी साफ सांगतें, मालकरणीच्याँ सारीं कामं मी करतें; पण कचऱ्याची टोपली डोक्यावर घेऊन गावातून धिंड काढायला माझी मुळींच तयारी नाहीं म्हटलं !" मंजू निक्षून म्हणाली, "आणि आज तुम्हीं तें एका पेशंटाचं गळू कापलंय्, त्याच्या रक्ताचे बोळेहि पडलेत दवाखान्याच्या कचऱ्यांत."

"कोण टाकणार ? पाहलं पाहिजे कुणाला तरी." गोष्ट लिहितांलिहितां वर पाहून मी म्हणालों.

"पाहा लवकर. नाहीतर स्वावलंबन केलं पाहिजे."

"तुला काय वाटतं ? हें काम करायला मला लाज वाटेल ?" तिचा टोमणा माझ्या लक्षांत येऊन मी जरा जोरानंच बोललों, "आपलं काम आपण करायला कसली आली आहे लाज ?"

"छे हो ! त्यांत कसली आलीय् लाज ? मग टाका ना नेऊन तेवढा कचरा. भारीच घाण साचलीय्."

"हो. येवढं लिहून झालं कीं टाकतोंच."

नंतर तिनं मला त्या कामाची हज्जारदा आठवण केली. जसं कांहीं तो कचरा मीं ताबडतोब कुंडींत नेऊन टाकला नसता तर मोठा प्रलयच होणार होता ! पण तिनं आठवण केली की प्रत्येक वेळीं मला कांहीं ना कांहीं निकडीचं काम निघत गेल्यामुळं रात्रीचे बारा वाजेपर्यंत तें काम करायला मला फुरसतच झाली नाही. एकदोनदां हें काम करायला कुणी माणूस मिळतो की काय हें पाहाण्याचाहि मीं प्रयत्न केला; पण तसंहि कुणी मिळालं नाही. अखेरीस 'स्वतःचं काम स्वतः करायला लाज कसली ?' ह्या विषयावर अर्धा तास मंजूला एक प्रवचन सुनावून, कचऱ्याची टोपली घेऊन मी शेजारच्या बोळांतील कुंडीजवळ गेलों आणि सुरवातीस कथन केल्याप्रमाणं सरकारवाड्याच्या अंधार-कोठडींत जाऊन पोंचलों !

सरकारवाड्याच्या अंधारकोठडींत ती सारी रात्र मीं जागून काढली. घरीं मंजू माझ्या काळजीनं चूर होऊन आलोचन जागरण करीत असता इकडे सरकारवाड्याच्या अंधारकोठडींत मी झोपा काढणं योग्यहि दिसलं नसतं. तरीपण अधूनमधून माझ्या जन्मजात खोडीला अनुसरून मला डुलकी लागे आणि बायको घरीं काळजींत असतां मी इकडे डाराडूर झोपा काढण्याच्या लज्जास्पद स्थितींत सांपडतों कीं काय अशी मला भीति वाटे. परंतु कुणीहि अशा लज्जास्पद स्थितींत सापडूं नये म्हणून दूरदर्शीपणानं केलेल्या व्यवस्थे-बद्दल मी सरकारचे आभार मानले ! मी असा कर्तव्यापासून च्युत होतों आहे असं जरासंहि चिन्ह दिसलं की मच्छरं, पिसवा आणि ढेकूण हीं अनुक्रमें सरकारचीं वैमानिक, चिलखती व पादचारी दलं माझ्यावर हल्ले चढवीत. माझी पंचमस्तंभी सदसद्विवेकबुद्धीहि माझे चावे घेऊन त्यांना कुमक करी आणि मग माझ्या पापण्या एकदम सताड उघडत.

सकाळ झाल्यावर फौजदार दादासाहेब सरकारवाड्यावर आले. त्यांना पाहून मला जरा आनंद झाला. कारण त्यांच्याशीं माझी पूर्वीची थोडी ओळख होती, आणि एक अतिशय सज्जन माणूस अशी गावात त्यांची ख्याति होती.

पोलिसानं मला त्यांच्यासमोर नेऊन उभं करतांच ते म्हणाले, " ओहोहो ! डॉक्टर ? सकाळींच इकडे कुठं ? काही केसबीस आहे की काय ? "

" माझीच केस आहे." मी म्हणालों.

त्यांनी माझ्याकडे प्रश्नार्थक दृष्टींनं पाहिलं. मला पकडून आणणाऱ्या शिपयाकडे मींहि त्याच प्रश्नार्थक दृष्टींनं पाहिलं.

" साहेब, गुन्हा करताना त्यांना पकडलं आहे मी." शिपाई जरा छाती फुगवून म्हणाला.

" गुन्हा ! काय गुन्हा ? " आश्चर्यानं दादासाहेब उद्गारले नंतर लगेच सौजन्यपूर्वक ते म्हणाले, " बसा डॉक्टर. असे उभे कां ? "

मी स्थानापन्न झाल्यावर सारी हकीकत सांगण्याविषयीं त्यांनी पोलिसाला हुकूम दिला. तें कृत्य करीत असतांना मी कसा अचानक त्याच्या दृष्टीस पडलों, मीं लपवाछपवीचा आणि उडवाउडवीचीं उत्तरं देण्याचा प्रयत्न कसा केला वगैरे रात्रीच्या प्रकाराचं साद्यंत वर्णन करून तो शेवटीं म्हणाला, " परवाच कुंडींत जो एक गर्भ सापडला होता, त्याबद्दल सर्व दवाखान्यावर पाळत ठेवण्याचा आम्हाला हुकूम मिळाला होता. टोपलींतील रक्तानं माखलेले बोळे संशय उत्पन्न करण्यास पुरेसे असल्यामुळं मी डॉक्टरांना वाड्यावर घेऊन आलों. "

त्याची हकीकत शांतपणानं ऐकून घेतल्यावर माझं म्हणणं काय आहे, अशी दादासाहेबानी पृच्छा केली.

" छे ! हा सारा गैरसमजाचा प्रकार आहे ! " मी जीव तोडून खरा प्रकार सांगूं लागलों. गर्भपाताच्या आरोपाखालीं मला पकडण्यांत आलं आहे, हें कळतांच मीच गर्भगळीत होण्याची पाळी आली होती ! " दादासाहेब, काय करावं ? मोलकरणींचा हा असा त्रास झालाय् ! मोलकरणीचं घरचं काम सारं आमची मंडळी करते, ( इथं 'आमच्या मंडळी'च्या आठवणीनं माझा कंठ थोडासा दाटून आला. ) कुंडींत कचरा नेऊन टाकण्याची कामगिरी

माझ्यावर आली. आता तुम्हीच सांगा, माझ्यासारखा डॉक्टर कचऱ्याची टोपली हातांत नाहीतर डोक्यावर घेऊन काय भरदिवसा रस्त्यानं जाईल ? म्हणून मी ह्या कामाकरता रात्रीची वेळ काढली. आता ह्या रक्ताच्या बोळ्यां-विषयी म्हणाल तर कालच एक गळु फोडलं, त्याच्या रक्ताचे आहेत ते..."

"कायरे गद्धया !" दादासाहेब एकदम त्या शिपायावर गरजले, "उगाच कशाला त्रास दिलास डॉक्टरसाहेबांना ? पाहा पाहूं हे बोळे नीट एकदा ! हे काय गर्भपाताचे आहेत ? का गळूचे आहेत ? येवढं समजत नाही तुला ? आणि पोलिस झालाय् ! चल, नीघ ! गाढव कुठचा ! उगाच एखाद्या सज्जन माणसाचा छळ करायचा म्हणजे काय ?"

दादासाहेबांनी त्या शिपायाची बरीच खरडपट्टी काढली आणि त्याला हाकलून दिलं. त्यांच्या बोलण्यांतील तर्कशुद्धता मला कळली नाही, तरी त्यामुळं माझ्यावरील एक भयंकर आरोप टळला म्हणून मी एक समाधानाचा सुस्कारा सोडला. दादासाहेबांचे मला मोठेच उपकार वाटले. किती सरळ माणूस ! बिनसंशयी–अगदी भोळा सांब ! मी आपली बाजू मांडतांच त्यांनी त्यावर अगदी डोळे मिटून विश्वास ठेवला. इतक्या निष्पाप मनाचा माणूस पोलिस-खात्यांत सापडावा आणि हरघडीं त्याचा बेरड–बदमाषांशीं संबंध यावा, ह्याबद्दल मला त्यांची थोडीशी कीवदेखील आली.

"बरंय्. थँक्स ! मी जातों आता." उठतांउठतां मी म्हणालों. घरीं काळजी करीत असलेल्या मंजूला केव्हा जाऊन भेटेन असं मला झालं होतं.

"वा ! आता चहा घेतल्याशिवाय थोडंच जातां येईल तुम्हाला ?" दादासाहेब आग्रहाच्या स्वरांत म्हणाले. काय हें सौजन्य ! आणि लोक उगाच पोलिसखात्याच्या अरेरावीविषयी ओरड करतात !

"नको, घरीं माझी वाट पाहात असतील."—मी

"मी निरोप पाठवतों ना ! शिपाय, अरे, हें पाहा, आधी दोन चहा सांग. मग डॉक्टरांच्या घरीं जाऊन बाईसाहेबांना सलाम सांग आणि म्हणावं, डॉक्टरसाहेब इथं आहेत–अगदी खुशाल आहेत–आत्ता थोड्या वेळांत येतील. अगदी मुळीसुद्धा काळजी करूं नका. आणि ही टोपलीहि पोचती कर डॉक्टरांच्या घरीं."

आमचा दोघांचा चहा चालला असतां मी कृतज्ञतापूर्ण स्वरांत म्हणालों, "बाकी दादासाहेब, आज तुम्ही होतांत म्हणूनच मी बचावलों. तुमच्या जागीं दुसरा कोणी असता आणि त्याला माझी हकीकत खरी वाटली नसती, तर काय भयंकर प्रसंग गुदरला असता माझ्यावर !"

"बाकी तुम्हीहि छान बनवून सांगितली हं गोष्ट !" दादासाहेब सहज म्हणाले, "हो. तुम्ही कांहीं गोष्टीबिष्टीहि लिहितां म्हणे, नाही का? मग कांहींच आश्चर्य नाही ! माझ्या जागीं दुसरा कुणी अननुभवी पोऱ्या असता, तर खात्रीनं फसला असता तुमच्या ह्या कपोलकल्पित गोष्टीला !"

दादासाहेबांचं हें बोलणं ऐकून मी तर चाटच झालों. माझ्या हातून चहाचा कप गळूनच पडत होता, पण तो कप हॉटेलांतील आहे ह्याची ऐन वेळीं आठवण झाल्यामुळं मी तो मोठ्या शिकस्तीनं सावरून धरला. मी त्यांची समजूत करण्याच्या उद्देशानं म्हणालों, "छे छे ! दादासाहेब मीं अगदी खरं तेंच सांगितलं. त्यांतलं एक अक्षरदेखील खोटं नाही..."

"पण राहूं द्या ना तो विषय." दादासाहेब मला मधेच अडवून म्हणाले, "मी कुठं काय म्हणतोंय् ?"

नंतर आम्हीं सिगारेटस् पेटवल्या. सिगारेट साधारण अर्धी जळाल्यावर दादासाहेब हितचिंतकाच्या स्वरांत म्हणाले, "हें पहा डॉक्टरसाहेब, मी एक आपलं तुम्हाला सांगून ठेवतों. अहो, अयोग्य मार्गांनी पैसा करीत नाही कोण? पण त्यालाहि एक पद्धत असते. आता तुमच्यासारखा सुशिक्षित माणूस, चांगला प्रतिष्ठित डॉक्टर—पुरावा नाहीसा कसा करावा हें तुम्हाला कळूं नये म्हणजे मोठं आश्चर्य आहे ! माझं एक सांगणं आहे तुम्हाला. अहो, अयोग्य मार्गांनी पैसा करीत नाही कोण? पण तो जरा सांभाळून, अक्कलहुषारीनं मिळवावा लागतो."

अखेरीस 'अयोग्य मार्गानं पण सांभाळून अक्कलहुषारीनं पैसा कसा करावा ?' हा धडा तिथल्या तिथं शिकवण्याबद्दल एका 'हिरव्या नोटे'ची फी मी घरी जातांच पाठवून देईन असा कबुलीजबाब माझ्याकडून घेतल्यानंतरच दादासाहेबांनीं मला घरीं जाऊं दिलं !

"मग काय ? पाठवूं का ही जाहिरात 'किर्लोस्कर' कडे ?" जाहिरातीचा कागद मंजूपुढें धरून मी विचारलं.

"वाचा पाहूं काय लिहिलंय् तें ?" ती उदास स्वरांत म्हणाली.

दिवसामागून दिवस चालले होते, आणि मोलकरणीचा प्रश्न बिकटतर होत चालला होता. पत्नी, सैपाकीण, आया व मोलकरीण ह्या चतुर्विध भूमिका पार पाडतांना मंजू वैतागून गेली होती, आणि त्याचा अनिष्ट परिणाम तिच्या शारीरिक व मानसिक आरोग्यावर स्पष्टपणानं दृग्गोचर होऊं लागला होता. गृहशांति नष्ट झाली होती, तरी माझी ही जाहिरातीची कल्पना पुढें मांडली की मंजू ती हेकटपणानं धुडकावून लावीत होती.

परंतु आता हा सारा त्रास तिलाहि दुस्सह होऊं लागला होता. कितीहि पगार देऊन नवीन मोलकरीण किंवा नोकर ठेवला तरी दोनच दिवसांत ते अदृश्य होत. मोलकरणीची सारीं कामं कशीबशी पार पडत असलीं तरी कुंडींत केर नेऊन टाकण्याचं काम मात्र त्या रात्रीच्या प्रसंगानंतर स्थगित झालं होतं. दिवसाच्या आठ प्रहरांपैकीं कुठल्याहि प्रहराला केर नेऊन टाकण्याची माझी तयारी नव्हती; आणि मधूनमधून माझ्या स्वावलंबनावर टोमणे मारले तरी मंजूचाहि ह्या बाबतींत विशेषसा आग्रह नव्हता. त्यामुळें सध्यां घरांत केर तर इतका साचला होता, की आमच्या घराला उकिरडा समजून शेजाऱ्या-पाजाऱ्यांनीं आपला केर आणून टाकण्याचं तेवढं शिल्लक राहिलं होतं ! ह्या साऱ्या परिस्थितीला मंजूहि आतां कंटाळलेली दिसत होती. आणि म्हणूनच माझ्या योजनेचा विचार करावयास ती आतां तयार झालेली दिसत होती.

ह्या योजनेच्या मौलिकतेचं श्रेय मी स्वतःकडे मुळीच घेत नाहीं. ह्या योजनेची 'मध्यवर्ति कल्पना' मीं नारायण पाटलापासून उचललेली आहे, हें ऋण मी प्रांजलपणानं कबूल करतों.

त्या दिवशीं नारायण पाटील आजारी असल्यामुळं मी त्याला पाहावयास गेलों होतों. त्याला तपासून झाल्यावर तो म्हणाला, "डॉक्टरसाहेब, कितीबी

दिडक्या लागल्या तरी चालल, पन चार दिवसांत तब्यत दगडावानी झाली पाहिजे !"

"का रे बाबा, इतकी घाई कां ?" मी विचारलं.

"लगिन काढलंय् नव्हं का !"

"कुणाचं ? मुलाचं का ?"

"न्हाई, न्हाई ! माझंच !"

"तुझंच ?" मीं आश्चर्यानं विचारलं. त्याला चार बायका असलेल्या मला ठाऊक होतं. पोरंहि भरपूर होतीं. मग आता हें पांचवं लग्न कशाला ? एखाद्या हिंदी संस्थानिकाचं रेकॉर्ड मोडण्याचा तर त्यानं बेत केलेला नव्हता ना?

"आता कशाला आणखी लग्न करतोस ?" मीं विचारलं.

"म्यां आणखीन् दोन म्हशी घेतल्या नव्हं का !" तो म्हणाला, "म्हशींचं कराया मानूस तर व्हावं ना ? दिवस ह्यो असले. दिडक्या मोजून-शानबी मानूस मिळायचं नांव न्हाई. मग आपलं हक्काचं मानूस आनावं ह्यो ब्येस न्हवं का ? दूध-दुभत्याची चंगळ हाय घरीं. पोर खाईलपिईल, राहील मजेंत !"

तेव्हापासूनच आमच्या घरचा मोलकरणीचा प्रश्न असं एखादं 'हक्काचं मानूस' आणून सोडवावा ही कल्पना माझ्या मनांत प्रादुर्भूत झाली होती; आणि मोलकरीण मिळण्याविषयींच्या दारुण निराशेनं ती माझ्या पचनीं पाडली होती. त्याप्रमाणं मीं एक जाहिरातहि लिहून ठेवली होती. आणि आता ती ऐकून घेण्याच्या मनःस्थितींत मंजू आहे असं पाहून मीं ती तिला वाचून दाखवली;

## वधू पाहिजे !

**वर**—बिजवर, वय ३३, गोरा, देखणा, उंची पांच फूट सात इंच, उच्च कुलोत्पन्न दक्षिणी ब्राह्मण; धंदा डॉक्टर, आपकमाई–मासिक रु. २०० ते रु. ३००. बापकमाई–रु. ४० हजारांची स्थावर मिळकत. **वधू**–कुठल्याहि ब्राह्मण पोटशाखेची चालेल. कुमारिका, अव्यंग, सुस्वरूप, गोरी, शिकलेली असावी. वय १७ ते २४ च्या दरम्यान. फोटोसहित पत्रव्यवहार त्वरित करावा. पत्रव्यवहार गुप्त ठेवला जाईल.

कुठल्याहि वर्तमानपत्रांत ' वधू पाहिजे ' ह्या सदराखालीं जी जाहिरात दृष्टीस पडते, तिचंच अनुकरण करून मीं ही जाहिरात लिहून काढली होती. पण मंजूला ती पसंत नसावीसं दिसलं. थोडा वेळ ती विचार करीत राहिली आणि मग म्हणाली, " तुमच्या ह्या जाहिरातीमुळं जी बायको तुम्हाला मिळेल, ती कांही मोलकरीण होईलसं वाटत नाही. उलट मीच मात्र मोलकरीण व्हायची ! मी सांगतें ते फेरफार करायची तयारी असली, तरच छापतां येईल तुम्हाला ही जाहिरात ! "

नंतर मग तिनं पुढं आणलेल्या सर्व उपसूचना मंजूर करून मी एक नवी जाहिरात लिहून काढली, व तिची संमति घेऊन तीच आता प्रसिद्ध्यर्थ पाठवून देत आहे.

## वधू पाहिजे !

**वर**—बिजवर, प्रथम पत्नी व तिचीं तीन मुलं हयात. प्रथम पत्नीवर मनापासून प्रेम. केवळ विशिष्ट परिस्थितीनं नाडल्यामुळंच द्वितीय संबंधास तयार. **वधू**—कुठल्याहि जातीची, धर्माची, कुमारिका अथवा विधवा चालेल. अव्यंग, सुस्वरूप, गोरी, सुशिक्षित नसावी. व्यंग असलं तरी हातापायांनी मात्र धडधाकट असावी. काळी, कुरूप, पन्नाशीच्या आसपासची व काबाडकष्ट करण्याची हौस असलेली विशेष पसंत केली जाईल. ताबडतोब लिहा. — ' क्ष. '

# बक्षिसाचा घोडा : :

उन्हाळ्याच्या सुट्टींत मी थोडे दिवस इरसालपूरला दादासाहेबांकडे राहावयास गेलों होतों. एक दिवस संध्याकाळीं आम्ही दोघे गांवाबाहेर फिरावयास गेलों असतां पांढरा रंग फासलेलें एक भलेमोठें थडगें माझ्या दृष्टीस पडलें. त्याकडे पाहून आश्चर्यानें मीं म्हटलें. "दादासाहेब, तुमच्या इरसाल-पूरचीं माणसं बरीच उंच नी धिप्पाड दिसतात की हो!"

"कशावरून?"

"हें थडगंच पाहा की किती लांबरुंद आहे तें!"

"या थडग्याच्या आकारावरून म्हणतां होय?" असें म्हणून दादासाहेब थोडेसे हसले आणि म्हणाले, "तुमचा तर्क सपशेल चुकला! कारण हें थडगं माणसाचं नाहीच मुळीं! हें थडगं आहे एका घोड्याचं."

"घोड्याचं? घोड्याचं थडगं तें कां बांधलं बुवा! कुठल्या लढाईत पराक्रम करून त्यानं तुमच्या नबाबसाहेबांचा जीव वाचवला होता?"

"लढाईबिढाई कांही नाही मारली त्यानं. पण शरीरसौष्ठवाच्या चढा-ओढींत शंभर घोड्यांत तो पहिला आला, म्हणून नबाबसाहेबांनी तो मेल्यावर त्याचं थडगं बांधलं."

"अस्सं अस्सं!" मी म्हणालों, आणि माझ्या शंकांचें समाधान झाल्यामुळें मी गप्प राहिलों. पण दादासाहेबांनी मला विचारलें, "तुमची त्या घोड्या-विषयीं काय कल्पना असेल सांगा पाहूं?"

"काय कल्पना असणार? शंभर घोड्यांत जो सर्वोत्तम घोडा होता, तो चांगला पुष्ट नी तय्यार असलाच पाहिजे!"

"छट्! साफ चूक. अहो, हा जो घोडा इथं पुरला आहे, तो दिसायाला अगदी मरतुकडा असूनहि सर्वांत उत्तम ठरला!"

"छे! हें कसं शक्य आहे?"

"तुम्हाला हें अशक्य वाटणं अगदी साहाजिक आहे. पण ही गोष्ट सत्य आहे एवढं मात्र खरं! इतकं कशाला? पहिलं बक्षीस मिळाल्याच्या दिवशीं रात्रींच तो घोडा उपासमारीनं तडफडून मेला!"

दादासाहेबाच्या ह्या बोलण्यावर माझा विश्वास बसेना. 'काय उगाच बाता मारतां!' असा अर्थ व्यक्त करणाऱ्या नजरेनें मी त्यांच्याकडे पाहूं लागलों. तो अर्थ जाणून दादासाहेब म्हणाले, "अहो, असं गोंधळल्यासारखं काय करतां? मी सांगतों ती एक अगदी शंभर टक्के सत्यकथा आहे. ही सर्व त्या टरबुज्या पैलवानाची कारवाई. त्याच्या लबाडीच्या पुष्कळ मनोरंजक गोष्टी आमच्या संस्थानांतील लोक तुम्हाला अजूनहि सांगतील. चला, आपण त्या हिरवळीवर बसूं, मग सांगतों तुम्हाला ती गोष्ट."

हिरवळीवर बसल्यावर दादासाहेब सांगूं लागले—

**सा**धारण वीस-पंचवीस वर्षांपूर्वीची गोष्ट. त्या वेळीं इरसालपूरच्या गादीवर मरहूम समशेरजंगबहादुर मेजर सर शिरसलामत-उल्-मुल्क हे नवाब होते. आमच्या सध्याच्या नबाबाचे ते वडील. त्यांना घोड्यांचा भारी षोक. त्यांना पोलो खेळण्याची आवड इतकी होती, की खास आपणासाठी त्यांनी एक पोलो-ग्राउंड इरसालपूरला तयार करवून घेतलं. आपण सध्या ज्यावर बसलों आहोंत, हेंच तें पोलो-ग्राउंड. साऱ्या हिंदुस्थानांतच काय, पण सुवेझच्या पूर्वेला ह्याच्या इतकं उत्कृष्ट पोलो-ग्राउंड नाही असं तज्ञांचं मत होतं. खास पोलो

खेळण्यासाठी म्हणून इंग्लंड-अमेरिकेहून मोठमोठे लॉर्ड आणि कोट्याधीश इथं येत. अश्वविद्येंत तर आमच्या नवाबांचा हात धरणारा कुणीच नव्हता. घोडयांवर त्यांचं इतकं प्रेम होतं आणि त्यांच्या पागांतल्या घोड्यांची इतकी बडदास्त ठेवण्यांत येई, की आमच्या संस्थानांतले लोक अर्धवट थट्टेनं म्हणत, "इरलासपूर संस्थानांत पुन्हा जन्म घ्यायचा असेल तर तो घोडयाचा घ्यावा—माणसाचा नको!" आणि तेंहि एका अर्थी खरंच होतं. संस्थानची बहुसंख्य प्रजा अर्धपोटीं असे; पण त्या घोडयांना मात्र चणे आणि विलायती घास खाऊन अजीर्ण होई. गुरांच्या दवाखान्यांतलीं अजीर्णावरचीं औषधं टनावारी खपत. मुंबई, कलकत्ता वगैरे मोठमोठ्या शहरांतल्या शर्यतींतून आमच्या संस्थानचे घोडे पळत आणि त्यांनी एखादी शर्यत जिंकली की आमच्या संस्थानांत एखादा शहाजादा जन्मल्यासारखे उत्सव होत असत.

आमच्या संस्थानांतल्या घोड्यांचा दर्जा वाढत राहावा आणि संस्थानची ह्या बाबतींतली कीर्ति सारखी वृद्धिंगत होत राहावी म्हणून नबाबासाहेब व त्यांची सरदारदरकदार मंडळी अहर्निश झटत असत. देशोदेशींहून उत्तमोत्तम घोडे विकत आणून त्यांची अगदी अद्यावत् शास्त्रीय पद्धतीनं जोपासना करण्यांत येई. त्याच उद्देशानं नबाबासाहेबांनी एकदा एक अभिनव चढाओढ लावली. एक खास दरबार भरवून, संस्थानांतल्या ज्या लोकांची घोडे सांभाळण्याची तयारी असेल अशा शंभर लोकांना त्यांनीं शंभर घोडे दिले; आणि प्रत्येक घोडयाबरोबर त्याची निगा राखण्यासाठीं शंभर मोहोरांची एकएक थैलीहि दिली. बरोबर एक महिन्यानंतर सर्वांनी आपापले घोडे आणावयाचे होते व त्या वेळीं ज्याचा घोडा सर्वोत्कृष्ट ठरेल त्याला पांचशे मोहोरांची एक थैली बक्षीस देण्यांत यायची होती. स्वतः नबाबसाहेब, वझीर, आणि काजीसाहेब असं तिघांचं एक परीक्षक मंडळ ह्या कामासाठी नेमण्यांत आलं होतं.

ह्या चढाओढीनं आमच्या संस्थानांत खूपच खळबळ उडून गेली. घोडा नेणारा प्रत्येकजण आपल्या घोड्यावर प्राणापलीकडे मेहनत घेऊं लागला. कुणीं तज्ञाच्या देखरेखीखालीं आपल्या घोड्याचे दिवसाचे कार्यक्रम आखून टाकले; कुणी घोड्याला तूप खाऊं घालूं लागले; कुणीकुणी सारा दिवस आपल्या घोड्याला खरारा आणि मालिश करण्यांत घालवूं लागले. महिन्याची

मुदत जसजशी संपायला आली, तसतसा एकएक घोडा 'तय्यार' होऊं लागला. निरनिराळे घोडे पाहून आलेले लोक म्हणूं लागले, "छे! घोडे एकापेक्षा एक वरचढ आहेत. ह्यांतला सर्वोत्कृष्ट घोडा कोणता हें ठरवणं परीक्षक-मंडळाला बरंच जड जाईल!" आणि तेंहि खरंच होतं. घोडे एकापेक्षा एक पुष्ट आणि मस्त झाले होते. त्यांच्याकडे पाहाणाऱ्याला वाटलं असतं, की शरीरात हाडं नसलेल्या घोड्यांची ही एक नवीनच जात इरसालपुरांत निर्माण झाली आहे की काय!

आपापले घोडे पुष्ट करण्याचे प्रयत्न सर्वजण करीत होते; पण टरबुज्या पैलवानाचा खाक्या मात्र ह्याच्या अगदी उलट होता! आपल्या घोड्याची घरीं आणल्याच्या अगदी पहिल्या दिवसापासून त्यानं पद्धतशीर उपासमार सुरू केली. ह्या थडग्याखालीं ज्याच्या हाडांचा सांगाडा आता अगदी स्वस्थ-पणानं विश्रांति घेत पडलेला आहे, तोच तो बिचारा दुर्दैवी घोडा टरबुज्या पैलवानाच्या वांट्याला आला होता!

अखेरीस चढाओढीचा निकाल लागण्याचा दिवस येऊन ठेपला. ह्याच पोलोग्राऊंडवर त्यानिमित्त एक मोठा दरबार भरवण्यांत आला. त्यासाठी त्या पलीकडल्या बाजूला एक मोठा शामियाना उभारण्यात आला होता. संस्थानचे सर्व लहानमोठे अमीर-उमराव आपल्या दरबारी पोषाखात हजर होऊं लागले. लोकांची तर इतकी गर्दी जमली की, जवळजवळ इरसालपूरची निम्मी लोकसंख्या इथं जमल्याचा भास होत होता. चढाओढींत भाग घेणारे आपापले घोडे शृंगारून ग्राऊंडवर घेऊन येऊं लागले. काय पण होता एकएक घोडा! किती मस्त आणि ऐटबाज! एकेका घोड्याला धरून ठेवायला चारचार माणसं लागत. त्यांच्या पाठी तर इतक्या मासल आणि सपाट होत्या, की त्यांवर लिंबूसुद्धा राहूं शकलं असतं. त्याच्या खिंकाळण्यानं आणि त्यांनी आपल्या खुरांनी उडवलेल्या धुळीनं जणूं दशदिशा भरून गेल्या होत्या!

इतक्यात बाहेर संस्थानचा बँड वाजूं लागला. तुताऱ्या-ललकाऱ्यांच्या आवाजांत सरकारस्वारीचं आगमन झालं. त्याबरोबर सर्व दरबारनं उठून त्यांचं

स्वागत केलं. नबाबसाहेब एका उच्चासनावर विराजमान झाल्यावर सर्वजण आपापल्या इतमामाप्रमाणं ठरलेल्या जागांवर बसले. नबाबसाहेबांच्या उजव्या हाताला वझीर बसले होते, तर डाव्या हाताला संस्थानचे राजगुरु, धर्मगुरु, सरन्यायाधीश आणि शिक्षणमंत्रि हे सर्व एकसमयावच्छेदेंकरून असलेले काजीसाहेब बसले होते. त्यांनी आपल्या विद्वान् डोक्याभोवती एक सफेत फेटा गुंडाळला होता, अंगांत एक झगेवजा वेलबुट्टीचा लांब अंगरखा घातला होता आणि पायांत घोट्यांवर तंग असलेली एक विजार घातली होती. त्यांच्याकडे पाहातांच प्रथम जरी त्यांची बुटकी तुंदिलतनु पाहणाऱ्याच्या नजरेंत भरे, तरी नंतर पाहाणाऱ्याची दृष्टि 'मिया मूठभर आणि दाढी हातभर' ह्या म्हणीची आठवण करून देणाऱ्या त्यांच्या भुरकट पांढऱ्या रंगाच्या दाढीवर खिळून बसे. आपल्या हनुवटीवर उगम पावून निम्न दिशेनं वाहत जाऊन, भव्य पोटाच्या पठारावर बागडणाऱ्या त्या दाढीला काजीसाहेब मोठ्या प्रेमानं कुरवाळीत बसले होते. त्यांच्या मनाच्या साम्राज्यांत सर्वत्र आबादीआबाद असल्याचं तें लक्षण होतं.

सर्व स्थिरस्थावर झाल्यावर एका कोपऱ्यांत उभ्या असलेल्या कोतवालाला नबाबसाहेबांनी प्रश्न केला, "क्यौं कोतवल, आ गये सब घोडे?"

"जी हुजूर! लेकिन..."

"लेकिन! लेकिन क्या?"

"सब घोडे आगये, लेकिन सिर्फ एक घोडा नहि आया. नव्याण्णव घोडे हजर आहेत."

"काय? नव्याण्णव घोडेच हजर आहेत? मग शंभरावा घोडा कुठें आहे? कां नाही आला तो?" नबाबसाहेबांच्या आवाजांत राग प्रतीत होत होता. "कोणी नेला आहे तो घोडा? धरून आणा त्याला माझ्यासमोर!"

"जी हुजूर!" असं म्हणून कोतवाल तीनदा कुर्निसात करून शामियान्याच्या बाहेर पडला.

ह्या अनपेक्षित घटनेनं सर्व शामियान्यांत कुजबूज सुरू झाली. घोडा घेऊन जाऊन त्याला आज न आणणारा कोण हा वेडा असावा? की त्या घोड्याचं कांही बरं वाईट झालं? तें कांहीहि असलं तरी नबाबसाहेबांचा त्याच्यावर घुस्सा होणारच! मग त्याला कोणती शिक्षा मिळेल? इत्यादि प्रश्न प्रत्येकजण आपल्या शेजारी बसलेल्याला विचारीत होता.

थोड्याच वेळांत पुढं कोतवाल, त्याच्यामागं पकडून आणलेला एक गलेलठ्ठ मनुष्य आणि शेवटीं नंग्या तलवारी खांद्यावर धरलेले दोन क्रूर दिसणारे शिपाई अशी एक लहानशी मिरवणूक दरवाज्यांतून आंत शिरली. तो मनुष्य कोण असावा हें पाहाण्यासाठीं सर्वांनी मोठ्या उत्सुकतेनं आपल्या माना फिरवल्या. त्या माणसाकडे नजर जातांच सर्वजण एकदम आश्चर्यचकित झाले, आणि दबलेल्या आवाजांत सर्वांच्या तोंडून एकच उद्गार बाहेर पडला, " टरबुज्या पैलवान ! "

टरबुज्या पैलवानाला त्याच्या लठ्ठपणामुळं ' टरबुज्या ' हें विशेषण इरसालपूरकरांनी बहाल केलं होतं. त्याचं खरं नांव कुणालाच माहीत नव्हतं, तरी ' टरबुज्या पैलवान ' हा साऱ्या संस्थानाला पाहून नाहीं तरी ऐकून माहीत होता. तो पैलवान असला तरी अलीकडे कुस्त्या मारण्यांतल्या त्याच्या कौशल्यापेक्षा लबाडीबद्दलच तो अधिक प्रसिद्ध होता. त्याच्याइतका लबाड आणि बदमाश मनुष्य आमच्या संस्थानांत दुसरा कुणी नसेल अशी सर्वांची खात्री होती. त्यानं हजारोंनी चोऱ्या केल्या असतील, खिसे कापले असतील आणि इतर गुन्हे केले असतील; पण ते तो इतक्या सफाईनं करीत असे, की पोलिसांच्या तावडींत तो क्वचितच सापडे. ' टरबुज्या पैलवान ' आणि भानगड ह्या दोन गोष्टी आमच्या संस्थानांत समानार्थींच समजल्या जात. त्यामुळं आता पुढं प्रसंग कसा रंगतो हें पाहण्यासाठीं सर्व दरबार आपलं सारं अवधान एकवटून बसला.

सर्व दरबारची मनःस्थिती जरी अशा प्रकारची होती तरी त्यांतली एक व्यक्ति ह्याला अपवाद होती. टरबुज्याच्या दर्शनानं त्या व्यक्तीच्या कपाळावर एकदम आठ्यांचं जाळं पसरलं. ती व्यक्ति म्हणजे काजीसाहेब. संस्थानांतल्या त्यांच्या निरनिराळ्या प्रकारच्या हुद्द्यांमुळं टरबुज्याशीं त्याचा संबंध पुष्कळ वेळां आला होता. शिक्षणमंत्री या नात्यानं त्याचा टरबुज्याशी संबंध येणं शक्यच नव्हतं; पण धर्मगुरू ह्या नात्यानं त्यांचा त्याच्याशीं पुष्कळदा संबंध आला होता. टरबुज्या नमाज पडत नसे आणि रोज संध्याकाळीं शराब पिई. ह्या त्याच्या धर्मबाह्य वर्तनाबद्दल काजीसाहेबांनीं त्याला पुष्कळदा उपदेश करून पाहिला होता. पण सर्व पालथ्या घड्यावर पाणी ! टरबुज्या कोरडा तो

कोरडाच राहिला ! पण काजीसाहेबांच्या उपदेशानुसार तो निराळ्या अर्थानं मात्र 'कोरडा' झाला नव्हता. मरन्यायाधीश ह्या नात्यानं त्यांनीं एकदा त्याचा फैसला केला होता. शेजाऱ्याच्या कोंबड्या चोरल्याच्या आरोपावरून टरबुज्याला त्यांच्यासमोर उभं करण्यांत आलं होतं. तेव्हा त्यांनी त्याला फटक्यांची शिक्षा सुनावली होती. टरबुज्या कधी कुणावर कसा सूड उगवील ह्याचा नेम नव्हता, आणि म्हणून पोलिसहि त्याला वचकून होते. ह्या त्याच्या सवयीमुळं त्याला कडक शिक्षा न देण्याविषयी काजीसाहेबाना पुष्कळांनी सल्ला दिला होता. परंतु दुसऱ्या कुठल्याहि आगंतुक कारणाचा न्यायदानाच्या कामांत विचार न करता, टरबुज्याला चांगलीच अद्दल घडावी अशी दहा फटक्याची शिक्षा काजीसाहेबानी त्याला सुनावली होती. तेव्हां चिडून टरबुज्यानं प्रतिज्ञा केली होती, "काजीसाब, संभाळून राहा ! हा टरबुज्या पैलवान एक दिवस तुमची दाढी उपटल्याशिवाय राहणार नाही !"

इन्शा अल्लाह ! काजीसाहेबांच्या दाढीचा अपमान ! इरसालपूर संस्थानच्या हायकोर्टाच्या दाढीचा अपमान ! ज्या दाढीला संस्थानातील लोक लाचारीनं हात लावीत, त्या दाढीचा अपमान ! त्याचे ते शब्द ऐकतांच काजीसाहेबाचा राग अनावर झाला होता आणि कोर्टाचा अपमान केल्याबद्दल त्यांनी टरबुज्याला आणखी पाच फटक्यांची शिक्षा दिली होती.

त्यावेळीं टरबुज्याला इतकी कडक शिक्षा करूनहि काजीसाहेबांच्या मनाचं समाधान झालेलं नव्हतं. त्या गोष्टीला आज बरींच वर्षं होऊन गेलीं होतीं. त्यानंतरच्या काळांत काजीसाहेबांच्या शरीरावर त्वचेच्या खालीं कितीतरी शेर अनवश्यक चरबी जमा झालेली होती. त्याची ती अपमानित लाडकी दाढी आता काळ्याची पांढरी झाली होती. काजीसाहेबांपासून तिची फारकत करण्याची टरबुज्याची दुष्ट सूडाची कल्पना अल्लाच्या कृपेनं अजून तरी सत्यसृष्टींत उतरलेली नव्हती; आणि आता ह्यापुढं तें शक्यहि दिसत नव्हतं. तरीपण त्या दिवशीं टरबुज्यानं फेकलेले ते शब्द काजीसाहेबांच्या दिलांत बाणाप्रमाणं खोल जाऊन रुतून बसलेले होते. आपल्या सहचारिणीच्या अपमानाचा तो प्रसंग विसरणं काजीसाहेबांना अखेरच्या न्यायदानाचा दिवस उजाडला तरी शक्य नव्हतं.

टरबुज्या दृष्टीस पडतांच आताहि त्याच प्रसंगाची आठवण होऊन त्यांना संताप आला होता. त्या भरांत आपल्या दाढीवरून ते जोरजोरानं हात फिरवूं लागले. इतक्या जोरानं, की दोनतीन केससुद्धां तुटून त्यांच्या हातांत आले ! त्यांतल्या त्यांत नबाबसाहेबाच्या हातांत आतां टरबुज्या बरा सापडला आहे एवढंच त्यांना समाधान होतं !

नबाबसाहेबांसमोर येतांच टरबुज्यानं अगदी जमिनीपर्यंत लवून मोठ्या आदबीनं तीनदा कुर्निसात केला, आणि तोंडावर लाचारीचा भाव दर्शवीत दोन्ही हात जोडून तो उभा राहिला.

"कायरे बेवकूफ ! तूं घोडा नेला आहेस ना ?" कठोरपणानं नबाबसाहेबांनी त्याला प्रश्न केला.

"जी सरकार !"

"मग आज चढाओढीसाठी कां आणला नाहीस त्याला ?"

"आणला असता; पण काय सागू सरकार ? खाऊनखाऊन आणि रगडूनरगडून घोडा इतका बदमाष झाला आहे, की त्याला तबेल्यांतून बाहेर काढणंसुद्धा मुश्कील झालं आहे !"

"असं म्हणतोस ?" जरा खुषीच्या स्वरांत नबाबसाहेबांनी विचारलं.

"जी सरकार ! घोडा एवढा तय्यार झाला आहे, की बाहेर बांधलेले हे घोडे त्याच्यापुढं उंदराप्रमाणं दिसतील."

"असं ?"

"हाँ हाँ शहेनशहा ! मग मी काय झूट बोलतों ? मघाशी मी त्याला इथं सरकारस्वारीच्या पायाशीं आणण्यासाठीं तबेल्यांतून बाहेर काढूं लागलों, तर त्यानं मला अशी एक लाथ दिली, की मी वीसपंचवीस कदमांवर जाऊन पडलों. अरे मेरी माऽऽ !" असं म्हणून पाठींत कळ निघाल्याप्रमाणं त्यानं आपले दोन्ही हात एकदम कंबरेवर ठेवले आणि तोंड वेडंवाकडं करीत तो पाठीमागं वाकला.

"हूं !" विचार करीत नबाबसाहेब म्हणाले, "पण तूं सांगतोस हें खरं कशावरून ?"

नबाबसाहेबांच्या ह्या प्रश्नाला टरबुज्या कांहींतरी उत्तर देणार इतक्यांत आपल्या आसनावरून एकदम उठून काजीसाहेब मधेंच म्हणाले " सरकार, हा टरबुज्या एक नंबरचा लबाड आणि बदमाश आहे. मी ह्याला चांगलाच ओळखतों. हा सांगतो ह्यांत कांहींतरी लबाडी असली पाहिजे."

" नाही नाही, सरकार ! बंदा कधी झूट बात करणार नाही." हात जोडून टरबुज्या म्हणाला, " पाहिजे असल्यास कुणाला तरी घोडा पाहण्यास पाठवून घोडा किती तेज आहे ह्याची आपण खात्री करून घ्यावी."

" हो. असंच करूं या." नबाबसाहेब हनुवटी चोळीत म्हणाले. " कोण जातो याच्याबरोबर ?"

परंतु तसं कुणी तयार होण्यापूर्वीच काजीसाहेबांकडे भीति दर्शविणारा एक कटाक्ष घाईघाईनं टाकून टरबुज्या नबाबसाहेबांना म्हणाला, " वझीर-साहेबांना पाठवा नाहीतर कोतवालसाहेबांना पाठवा."

परंतु काजीसाहेबांना टाळण्याची त्याची ही युक्ति ध्यानांत न येण्याइतके काजीसाहेब कांहीं दुधखुळे नव्हते. त्यांच्याकडे टरबुज्यानं टाकलेल्या त्या कटाक्षाचा अर्थ चटकन् त्यांच्या ध्यानांत येऊन चुकला होता. ' कुणालाहि पाठवा; पण काजीसाहेबांना पाठवूं नका ' असाच त्याच्या त्या एकंदर गडबड-गुंड्याचा अर्थ होता. त्यानं काजीसाहेबांना कां टाळावं हें उघडच होतं. त्यानं घोड्याच्या बाबतीत जी लबाडी केलेली असेल ती आपणासारख्या विद्वान् आणि चाणाक्ष माणसाच्या दृष्टींतून निसटणं शक्य नाही, अशी त्याला भीति वाटत असावी हें काजीसाहेबांनी क्षणार्धात ताडलं, आणि टरबुज्याचा तो डाव हाणून पाडण्यासाठीं ते एकदम म्हणाले, " सरकार, मी तयार आहे जायला."

आपलं हें वाक्य ऐकतांच टरबुज्या एकदम चपापलेला काजीसाहेबांनी स्पष्ट पाहिलं, आणि आपला तर्क बरोबर असल्याचा त्यांना पुरावा मिळाला.

काजीसाहेबांच्या बोलण्यानं टरबुज्या क्षणभर गोंधळून गेल्यासारखा दिसला असला, तरी लगेच सावरून तो काजीसाहेबांना म्हणाला, " काजीसाब, आपण कशाला उगीच तसदी घेतां ? माझं घर खूप लांब आहे. तिथपर्यंत चालून तुम्ही थकून जाल." नंतर तो नबाबसाहेबांकडे वळून म्हणाला, "सरकार, दुसऱ्या कुणाला पाठवलं तरी चालेल."

टरबुज्या आपणाला टाळण्याचा मुद्दाम प्रयत्न करीत आहे ह्याची तर काजीसाहेबांना आता खात्रीच पटली. दुसरा कुणीतरी माणूस बरोबर नेऊन, त्याला लाचलुचपत चारून वश करून घ्यायचा टरबुज्याचा डाव असावा असं त्यांना वाटलं आणि टरबुज्याची लबाडी उघडकीस आणण्यासाठीं, त्यांच्या येण्याला टरबुज्या जसजसा विरोध करूं लागला तसतसा त्याच्याबरोबर आपणच जाणार असा त्यांनीहि नबाबसाहेबांकडे हट्ट धरला.

अखेरीस नबाबसाहेबहि त्याला कबूल झाले; आणि तोंडावर गरीब भाव दर्शविणारा टरबुज्या पुढं नी आपल्या तुंदिल पोटाच्या पुढं छाती काढण्याचा प्रयत्न करीत विजयोन्मादानं चालणारे काजीसाहेब मागं, असे ते दोघे शामियान्याच्या बाहेर पडले. इकडे नबाबसाहेब आणि इतर मंडळी बाकीचे नव्याण्णव घोडे पाहायला निघून गेली.

शामियान्यापासून जरासं दूर गेल्यावर टरबुज्या काजीसाहेबांना म्हणाला, “काजीसाब, माझा घोडा अगदी बदमाश आहे! तुम्ही कशाला येतां उगाच? तुम्हाला तो एखादी लाथबिथ मारील!”

“बरं बरं.” काजीसाहेब कुत्र्यांत म्हणाले, “तुझा घोडा बदमाश आहे की नाही हें नंतर पाहूं. तूं मात्र बदमाश आहेस खरा!”

“काजीसाब, तुम्ही आलां नसतां तर बरं झालं असतं!”

“आता उगाच बकवा करूं नकोस. टरबुज्या, तुला मी पुरा ओळखून आहे. तूं फार लबाड आणि बेपाक आहेस! तुझी लबाडी मी ओळखून काढीन म्हणून मघापासून मला टाळण्याचा तूं प्रयत्न करीत आहेस हें माझ्या ध्यानांत आलं आहे. पण मी तुला आता एकदाच सांगून ठेवतों- तुझ्या गमज्या माझ्यापुढं चालायच्या नाहीत. समजलं? हं! त्या दिवशीं माझ्या दाढीचा अपमान केला होतास काय? चल. आता गुपचूप रस्ता चालूं लाग.” कठोर स्वरांत काजीसाहेब म्हणाले.

“बरं बुवा! जशी आपली मर्जी!” असं म्हणून आणि एक सुस्कारा टाकून टरबुज्या आपल्या घराचा रस्ता कांही न बोलतां चालूं लागला. त्याला छान चापला ह्या विचारानं खूष होऊन काजीसाहेब त्याच्यामागून चालत होते. त्याची लबाडी उघडकीस आली म्हणजे त्याला कोणती शिक्षा ठोठवायची

ाणि आपल्या अपमानाची भरपूर भरपाई कशी करून घ्यायची ह्याविषयीचे िचार टरबुज्याच्या घरचा रस्ता चालतांना त्यांच्या मनांत गर्दी करीत होते.

अेक महिन्यापूर्वी टरबुज्यानं दरबारांतून चढाओढीसाठीं एक घोडा नेला ता. पण एका हातांत घोड्याचा लगाम आणि दुसऱ्या हातांत शंभर मोहरांची ली धरून तो जेव्हा घराचा रस्ता चालूं लागला होता तेव्हाच त्याचा तल्लख मेंदू ार जोरानं काम करूं लागला होता. त्याला तें पांचशे मोहरांचं बक्षीस तर पटायचं होतंच; पण त्यावेळीं हातांत असलेल्या त्या शंभर मोहराहि त्याला ापल्याच खिशांत घालावयाच्या होत्या. पण त्यासाठीं त्याला घोड्याची ासमार करावी लागणार होती. मग त्याला पहिलं बक्षीस मिळण्याचा संभव ाय राहणार? विचार करतांकरता त्यानं कुठला तरी एक विचार ठाम केला ाणि त्याच्या मुद्रेवर मिस्किलपणा खेळूं लागला.

घरीं येतांच बाजूच्या एका लहानशा खोलींत त्यानं त्या घोड्याला बांधून ाले, तें संध्याकाळपर्यंत त्यानं त्याच्याकडे परत ढुंकूनहि पाहिलं नाही. त्या ोलीच्या एका भिंतींत जमिनीपासून सुमारें पांच फुटांवर एक लहानशी ाडकी होती. त्या खिडकींतून टरबुज्यानं संध्याकाळीं एक वाळलेल्या गवताची ी आंत ढकलली. चढाओढींत भाग घेणारे इतर लोक आपापल्या घोड्यांची ाद्या राजाप्रमाणं बडदास्त ठेवीत होते; त्या घोड्यांची सर्व दृष्टींनीं चंगळ ती. पण टरबुज्यानं नेलेल्या घोड्याची स्थिती मात्र ह्याच्या अगदी उलट ती! त्या लहानशा खिडकींतून रोज, सकाळची एक आणि संध्याकाळची एक, शा गवताच्या सुकलेल्या दोन पेंढ्या टरबुज्या त्या घोड्याला देत असे. त्या स्सल अरबकुलोत्पन्न घोड्यानं पहिल्या पहिल्यानं त्या पेंढ्यांकडे दुलक्षच केलं. असलं गवत घोड्याच्या जातींत कोणी खात असतील हें त्याला खरंसुद्धा टत नव्हतं! पण पोटातली आग माणसाचासुद्धा स्वाभिमान जाळून टाकते, थं बिचाऱ्या घोड्याची कथा काय? दोनतीन दिवस चंदीची निरर्थक वाट हून थकल्यावर बिचारा चोवीस तासांतून मिळणाऱ्या त्या दोन पेंढ्या खाऊन टांतली आग विझवण्याचा प्रयत्न करूं लागला. बस्स! एवढाच त्याचा राक! खुराकाची ही गोष्ट, मग मालिश आणि खरारा यांची गोष्टच कशाला!

दिवसामागून दिवस जात होते आणि त्या कोठडीच्या तुरुंगवासां
बिचारा घोडा आपल्या दुर्दैवाला दोष देत एकएक दिवस काढीत होता. त्याल
कधी बाहेरची हवा मिळाली नाही की कांही व्यायाम मिळाला नाही. अंगाव
बसलेल्या माशा आपल्या लांब शेपटीनं हाकलणं हाच त्याचा व्यायाम! आणि
सकाळीं उठल्याबरोबर एकदा आणि संध्याकाळीं पांचाच्या सुमारास एकद
टरबुज्यानं त्या खिडकींतून ढकलून दिलेल्या पेंढ्यांची वाट पाहात बसणं हा
त्याचा उद्योग! आपली ही ग्रहदशा संपणार तरी कधीं, यावर विचा
करूनकरून त्याला वेड लागण्याची पाळी येई. जसजसे दिवस जाऊं लाग
तसतसं त्याचं तें पहिलं राजबिंडं रूप नाहीसं होत जाऊन त्याचं एकएक हा
बाहेर दिसूं लागलं. शेवटीं महिना संपण्याच्या सुमारास तर हाडांचा ए
सांगाडा आणि त्यावर सुरकुतलेली चामडी, एवढंच काय तें त्याच्या त्य
पूर्वीच्या रुबाबदार रूपांतलं शिल्लक राहिलं!

चढओढीच्या निकालाच्या दिवशीं तर त्याच्या कमनशिबानं कमाल
केली! रोजच्याप्रमाणं सकाळ झाल्यावर खिडकींतून येणाऱ्या त्या सकाळच्य
पेंढीची वाट पाहात तो उभा राहिला. पण नेहमीची वेळ टळून गेली, सू
डोक्यावर आला तरी आज ती सकाळची पेंढीहि आली नाहीं! आज हें अ
काय झालं? आपला मालक आज आपणाला अजिबात विसरला काय? व
तो कुठं गावाला निघून गेला? की आजारी पडला? का इतके दिव
आपणाला रोजच्या दोन पेंढ्या मिळत त्याबदली आतां रोजची एकच पेंढ
देण्याचं मालकानं ठरवलं आहे? जसजसा दिवस वर येऊं लागला तसतस
त्याच्या पोटांतला भुकेचा वणवा अधिकाधिक भडकूं लागला. भुकेच्या वेदन
त्याला असह्य होऊं लागल्या. संतापानं, उरलेसुरले सर्व प्राण एकवटून त
भिंतीवर लाथा झाडूं लागला आणि मोठमोठ्यानं खिंकाळूं लागला.

ह्याच सुमारास दरबारांतून निघालेले टरबुज्या व काजीसाहेब त्य
कोठडीजवळ येऊन पोचले होते. कोठडींतली ती गडबड ऐकून टरबुज्य
काजीसाहेबांना म्हणाला, "ऐकलं काजीसाहेब, किती मस्ती करतोय् तो घोडा
त्याला सांभाळतां सांभाळतां पुरे होतं. मी तर अगदी कंटाळून गेलोंय् बुवा!"

आंतली ती गडबड ऐकून आणि टरबुज्याचं बोलणं ऐकून काजीसाहेब
मनांतून जरासे चरकलेच! घोडा अतिशय मस्त आहे, ह्या टरबुज्याच्य

सांगण्यांत बराच तथ्यांश दिसतोय, संभाळूनच राहिलं पाहिजे जरा, असा विचार करून ते म्हणाले, "करतोय् खरा मस्ती ! बरं, पण कोठडीचा दरवाजा कुठं आहे ?" हा प्रश्न विचारतांना त्यांच्या चेहऱ्यावर जराशी चिंतेची छटा दिसून येत होती.

"छे छे छे !" त्यांचं बोलणं ऐकून टरबुज्या एकदम म्हणाला, "दरवाजा उघडून काय आंत जाणार म्हणता ? नको ! माझ्याखेरीज दुसरा कुणीहि खोलींत गेला की तो थैमान घालतो."

"मग त्याला पाहणार कसं ?"

"हं. असं करा. त्या कोठडीला ही एक लहानशी खिडकी आहे. त्यांतून तुम्ही आधी डोकावून पाहा."

काजीसाहेबांनाहि सुरक्षिततेच्या दृष्टीनं ही कल्पना पटली. हो ! करतां काय ? टरबुज्याच्या म्हणण्याप्रमाणं तो घोडा खरोखरच बदमाश असला— आणि आंतल्या धिंगाण्यावरून तो तसा असावा— तर उगाच आपली फजिती व्हायची ! असा विचार करून धडधडत्या छातीनं ते त्या खिडकीकडे चालूं लागले.

कुणातरी माणसाच्या पावलांचा आवाज कानावर येतांच त्याचं लक्ष आकर्षून घेण्याकरिता तो घोडा जास्तच खिंकाळूं लागला. पावलांचा आवाज जसजसा खिडकीजवळ येऊं लागला तसतसा तो एकदम आपले कान टवकारून उभा राहिला. एकूण आपल्या धन्याला अखेरीस आपली आठवण झाली तर ! आता त्या खिडकींतून केव्हां एकदां ती पेंढी आंत येते आणि आपण तिच्यावर झडप घालतो असं त्याला होऊन गेलं होतं.

पावलांचा आवाज आता अगदी जवळ होऊं लागला होता. डोळ्यांत सर्व प्राण उभे करून, त्या खिडकीवर आपली नजर रोखून पेंढीवर झडप घालण्याच्या तयारीनं तो उभा राहिला. हळूहळू त्या खिडकीवर रोजच्याप्रमाणं एक सावलीहि पडलेली त्याला दिसूं लागली आणि तिच्या मागोमाग... ओहो ! आली पेंढी ! भुरकट पांढऱ्या रंगाची एक गवताची पेंढी खिडकींतून आंत येतांना त्याला दिसली ! आणि कशाचाहि विचार न करतां एकदम ती आपल्या तोंडांत धरून तो तिला हिसके देऊं लागला. दोनतीन हिसके दिले तरी पेंढी

आंत येत नाही असं पाहून तो जरासा आश्चर्य करूं लागला ! धन्यानं पेंढी खिडकीशीं आणून नंतर ती कां सोडूं नये हेंच त्याला समजेना ! रागामुळं तो आणखीनच जोरजोरानं हिसके देऊं लागला.

दहापांच क्षणच कोठडींतल्या घोड्यानं अशी हिसकाहिसकी केली असेल, त्याला पाहावयास म्हणून खिडकीशीं उभ्या असलेल्या काजीसाहेबांनी एकच किंकाळी फोडली !

"टरबुज्या ! धाव, धाव ! घोड्यानं माझी दाढी पकडली ! ओयोय्ऽऽ ! अरे, ये घोडा है या सैतान !"

धनी पेंढी अजूनपर्यंत कां सोडीत नाहीं, ह्या विचारानं क्षणाक्षणाला जास्त रागावणारा घोडा जोरजोरानं हिसके देतच होता. आणि प्रत्येक हिसक्याबरोबर काजीसाहेबांचं तोंड त्या खिडकीवर आपटत होतं. त्यामुळं होणाऱ्या वेदनांनीं त्यांच्या तोंडून किंकाळ्या बाहेर पडत होत्या. त्या किंकाळ्या घोड्यालाहि ऐकूं गेल्या. पण त्यानं जणू निश्चयच केला होता, की कांहीं झालं तरी ओठांशी आलेली ही पेंढी सोडायची म्हणून नाहीं. बराच वेळ घोड्याची आणि काजीसाहेबांची ही रस्सीखेच चालू होती. दोघांपैकीं कोणीहि हरण्याचं चिन्ह दिसेना. ओरडूनओरडून काजीसाहेबांचा घसा बसायला आला होता. त्यांच्या सर्वांगाला दरदरून घाम सुटला होता ! आणि दाढी जसजशी उपटली जात होती तसतसा त्यांचा तो गुलगुलीत चेहरा रक्तबंबाळ होत होता.

हा सर्व प्रकार पाहात टरबुज्या एका बाजूला स्वस्थ उभा होता. काजीसाहेबांची फजिती पाहून, त्याला मनांतून आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या. त्याच्याकडे पाहून संतापानं काजीसाहेब म्हणाले, "अबे टरबुज्या, देखता क्या ? मला सोडव ना ! ओय्ऽ ..."

काजीसाहेबांचं हें बोलणं ऐकून जणूं टरबुज्या भानावर आला, व काजीसाहेबांना सोडविण्यासाठी त्यांच्या विस्तृत कंबरेला आपल्या हातांचा विळखा घालून तो त्यांना मागं ओढूं लागला. चारपांच मिनिटं घोडा एका बाजूला आणि काजीसाहेब नी टरबुज्या दुसऱ्या बाजूला अशी ती अभूतपूर्व दाढीखेच चालली. पण त्याचा परिणाम इतकाच झाला, की काजीसाहेबांना दुप्पट वेदना मात्र झाल्या !

अखेरीला कंटाळून टरबुज्यानं काजीसाहेबांना सोडून दिलं, आणि कपाळावरचा घाम पुशीत तो म्हणाला, "छट्! हें नाहीं जमायचं—आतां ह्याला एकच उपाय आहे."

"काय वाटेल तें कर; पण मला ह्या सैतानाच्या तावडींतून एकदाचा सोडव!"

"तुमची दाढी कापली तरच तुमची सुटका होईल असं वाटतं!"

"अरे काप ना मग! देखता क्या? जा एक कात्री आण लवकर आणि कापून टाक माझी दाढी!" काजीसाहेबांनी विनवणी केली.

"छे छे! काजीसाब, असं कधी झालंय्? असलं पाप मी करणार नाहीं!"

"अरे, तेरे पांव पडता! पण माझी दाढी कापून टाक! अरे मेरी मा! या अल्ला! छे छे. माझ्याच्यानं नाही रे आता हें सहन करवत!"

"काजीसाब, तुमची दाढी मी कापली असती; पण मागं एकदा 'तुमची दाढी मी उपटीन,' एवढंच मी म्हणालों असतां, तुम्ही मला पांच फटक्यांची शिक्षा सुनावली होती. हो ना? मग आंता जर मीं तुमची दाढी खरोखरीच कापली, तर तुम्ही मला फासावरच चढवाल!"

घोड्याकडून हिसके बसून दाढी उपटली जात असतां काजीसाहेबांना ज्या वेदना होत होत्या, त्याच्या दसपट वेदना टरबुज्याचं हें मानभावी भाषण ऐकून त्यांना झाल्या. त्यांच्या अंगाचा नुसता तिळपापड उडाला. पण करतात काय बिचारे! टरबुज्याचे पाय धरण्यावांचून त्यांना आता गत्यंतरच नव्हतं!

"टरबुज्या, ह्या वेळीं थट्टा करूं नकोस! माझा प्राण चालला आहे! या अल्ला! या परवरदिगार! टरबुज्या, माझी दाढी कापण्याचे उपकार तूं माझ्यावर करच!" असं म्हणून त्यांनी टरबुज्यापुढं खरोखरीच हात जोडले.

"पण घोडा झाला का नीट पाहून? नबाबसाहेबांना काय सांगाल घोड्याबद्दल?" टरबुज्यानं विचारलं.

"या अल्ला! क्या शैतान है ये घोडा! हें बघ पैलवान! पांचशें मोहरांचं तें बक्षीस मीं तुलाच देववितों; पण माझी इथून सुटका कर."

"खरं?"

"अगदीं अल्लाची कसम! ओयोय्ऽ!"

आतां काजीसाहेबांचा आणखी अंत पाहण्यांत अर्थ नाहीं असा विचार करून टरबुज्यानं एक कातर आणली आणि त्यांची दाढी साफ कातरून काढली. त्या घोड्याच्या तावडींतून एकदाची सुटका होताच काजीसाहेबांना एकदम हायसं वाटलं आणि त्यानीं एक सुस्कारा सोडला. दाढी नसलेल्या काजीसाहेबांच्या चेहऱ्याकडे पाहून टरबुज्याला तर हसूं आवरेना ! दाढी असतांना त्याचा चेहरा किती गंभीर, ऐटबाज आणि उग्र दिसत होता...आणि आतां तोच किती पोरकट दिसत होता !

दाढी कापलेला आपला चेहरा लोकांना कसा दाखवावा ह्याची काजीसाहेबांना पंचाईत पडली. तोंडावरून आपला फेटा गुंडाळून घेऊन असंच्या असंच घरीं जाऊन लपून बसावं असं त्यांना वाटूं लागलं. पण करणार काय ? दरबारात जाऊन नबाबसाहेबांना घोड्याची माहिती देणं अवश्य होतं. अखेरीस आपला सफेत फेटा रक्त ओघळणाऱ्या आपल्या चेहऱ्यावरून त्यांनीं लपेटून घेतला आणि खालीं मानं घालून टरबुज्याच्या मागून ते दरबारचा रस्ता चालूं लागले.

दरबारांत पोचल्याबरोबर टरबुज्यानं नबाबसाहेबांना मोठ्या ऐटींत तीन कुर्निसात् केले. त्याला पाहातांच नबाबसाहेबांनीं त्याला विचारलं, " काय रे, काजीसाहेब कुठं आहेत ? "

" हे काय इथंच आहेत ! " आपल्या पाठीशीं उभ्या असलेल्या काजीसाहेबांकडे बोट दाखवून टरबुज्या म्हणाला.

काजीसाहेबांची दाढी नसल्यामुळं आणि आपला चेहरा त्यांनी फेट्यांत लपविलेला असल्यामुळं त्यांना प्रथम कोणी ओळखूंच शकलं नाहीं. त्यांच्या त्या विद्रुप चेहऱ्याकडे पाहून हसावं की त्यांची कींव करावी हेंच कोणाला समजेना !

" क्या काजीसाब, ये क्या हुवा ? " नबाबसाहेबांनीं प्रश्न केला.

पण त्यावर काजीसाहेबांनीं कांहीच उत्तर दिलं नाहीं ! ते सांगणार तरी काय कपाळ ?

" आणि ह्या टरबुज्याचा घोडा पाहिला का ! काय निकाल आहे तुमचा ? " नबाबांनीं विचारलं.

" अरे बापरे ! वो घोडा का नाम मत निकालो ! वो घोडा नही, हैवान है !... अहूहूहू ऽ ऽ ! " घोड्याच्या आठवणीनं काजीसाहेबांना अेकदम हूडहुडी भरून आली. " फारच मस्त आणि बदमाष आहे तो घोडा ! अिथं जमलेले घोडे त्याच्या पासंगालाहि पुरणार नाहींत. बक्षिस उसकोहि दिजीये !" येवढं कसंबसं बोलून ते एका खुर्चीवर मट्कन् बसले.

ह्याप्रमाणें शंभर मोहरा तर टरबुज्यानं पचनीं पाडल्याच; पण पांचशें मोहरांचं बक्षिसहि त्यानं उपटलं.

दादासाहेबांची गोष्ट सांगून झाली होती. थोड्या वेळानं मीं त्यांना विचारलें, " पण नंतर मग तो घोडा कोणी पाहिला नाहीं का ?"

" पाहतात कसचा ! त्या रात्रींच तो बिचारा भुकेनें तडफडून मेला. आणि टरबुज्यानं रातोरात त्याला पुरूनहि टाकलं. "

" मग नबाबसाहेबांनीं त्याला नाहीं का विचारलं, कीं अेवढा मस्त घोडा अेकाअेकी कसा मेला म्हणून ? " मीं विचारलें.

" विचारलं तर ! पण टरबुज्या कसचा वस्ताद ! तो म्हणाला, 'सरकार, त्या घोड्यानं काजीसाहेबांसारख्या पाक पुरुषाची दाढी खाण्यासारखं बेपाक कृत्य केलं, त्याबद्दल परवरदिगार अल्लानं त्याला ताबडतोब मृत्यूची सजा दिली !' आणि मग नबाबसाहेब त्याच्यावर रागावले तर नाहींतच; पण उलट त्यांनीं त्या घोड्याचं थडगं बांधायला या पोलो-ग्राउंडवर जागेचा अेक तुकडा दिला आणि त्यासाठीं वर पैसेहि दिले. "

" वा ! खूपच होता कीं तुमचा टरबुज्या पैलवान ! त्यानं सहाशे मोहरा तर गिळंकृत केल्याच, पण काजीसाहेबांवरचा आपला सूडहि मोठ्या युक्तीनें उगवून घेतला ! " मीं कौतुकानें म्हटलें.

" हो. महालबाड होता तो. ह्या सर्व कृतींत काजीसाहेबांवरचा सूड उगवून घेण्याचा उद्देशहि त्याच्या मनांत अगदीं प्रथमपासून असावा असं वाटतं. हातोहात बनवलं त्यानं काजीसाहेबांना ! बिचारे काजीसाहेब ! त्यांना मात्र परत दाढी चांगली वाढेपर्यंत साधारण वर्षभर तरी घराबाहेर तोंड काढायची कांहीं सोय राहिली नव्हती ! "

## पश्चात्ताप : :

"दरवाजा उघडा ! दरवाजा उघडा !" दरवाज्यावरून लोंबकळणारी कडी दरवाज्यावर खडखडावून कुणी तरी ओरडत होतं.

अमावास्येची रात्र होती. मध्यरात्रीचा सुमार होता. १९४२ च्या आंदोलनांत भूमिगत झालेले माधवराव पोलिसांची नजर चुकवून आज आपल्या पत्नीला भेटण्याकरतां आले होते. पोलिसांची नजर चुकवून रात्रीच्या रात्रींच त्यांना आपल्या गुप्त निवासस्थानीं प्रयाण करायचं होतं. आणखी पांचच मिनिटांनीं ते घराबाहेर पडले असते; पण मध्येंच हें विघ्न उभं राहिलं होतं !

"कुणाचा आवाज आहे ग ?" माधवरावांनीं शारदाबाईना–आपल्या पत्नीला हलक्या आवाजांत प्रश्न केला.

"काय की बाई !" शारदाबाई उद्गारल्या. त्यांची छाती धडधडत होती. त्यांचा चेहरा एकदम काळवंडून गेला होता.

"पोलिस तर नाहींत !" माधवराव उद्गारले. शारदाबाई कांहींच बोलल्या नाहींत. त्यांनाहि हीच शंका होती.

"दरवाजा उघडा ! दरवाजा उघडा !" बाहेरील दरवाजावर कडीचा खडखडाट चालूच होता, आणि त्या अनोळखी आवाजांत मधूनमधून मारलेल्या हांका ऐकूं येतच होत्या.

"घाबरूं नकोस !" आपल्या पत्नीला धीर देत माधवराव म्हणाले, "दिवा जरा लहान कर. मी खिडकींतून हळूंच डोकावून पाहतों !"

थरथरत्या हातानं शारदाबाईंनीं दिव्याची वात लहान केली. आपलीं पावलं न वाजवितां माधवराव खिडकीशीं गेले, बिलकुल आवाज होऊं न देतां त्यांनीं खिडकी किंचित् किलकिली केली, आणि त्या फटींतून बाहेर दृष्टि टाकली.

बाहेर काजळाच्या राशी पडल्या होत्या. त्यांच्या घरासमोरच एक म्युनिसिपालिटीचा दिवा मिणमिणत होता. त्याच्या प्रकाशनं मात्र त्या काळ्या समुद्रांत एक वाटोळी पोकळी झाल्यासारखी दिसत होती. त्या पोकळीच्या एका कडेला दरवाजाशीं एक उंच धिप्पाड आकृति उभी होती. तिचा चेहरा माधवरावांनीं पाहिला मात्र, पटकन् ते मागंच सरले. शारदाबाईंनीं अधीरतेनं विचारलं, "कोण आहे ?"

"दादासाहेब—"

"दादासाहेब ?"

"दादासाहेब–इथले फौजदार ! काँग्रेसचा मोठा शत्रु आहे तो. त्या दिवशीं मिरवणुकीवर गोळीबार केला, तोच हा फौजदार ! आपल्या काँग्रेसचीं पाळंमुळं खणून टाकणार आहे म्हणे तो !"

"मग आतां ?"

"तूं सांग त्यांना, घरांत कुणी पुरुष माणूस नाहीं, म्हणून !"

"तुम्ही मागच्या दारानं निघून जातां ?"

"हो...पण छे ! तेंहि शक्य दिसत नाहीं. मी आज इथं येणार ह्याचा बरोबर सुगावा लागलेला दिसतोय् ह्यांना. घराला पोलिसांनीं वेढा दिलेलाच असणार !"

"अगबाई ! मग आतां काय करायचं ?"

"तूं आपलं सांगून पहा त्यांना. जमलं तर ठीकच ! नाहीं तर..."

"कोण आहे ?" शारदाबाईंनीं मोठ्यानं ओरडून प्रश्न केला.

"जरा दार उघडा पाहूं." बाहेरून आवाज आला.

"नांव काय तुमचं ?"

"माझं नांव—पण तुम्ही मला ओळखत नाहीं. जरा दार उघडा ना. फारच महत्त्वाचं काम आहे !"

"घरांत कुणी पुरुष माणूस नाहीं. मी दार उघडीत नाहीं !"

"पण घरांत माधवराव तर आहेत ना ? उघडा दार !" दादासाहेबांनीं अगदी शांतपणानं उच्चारलेले हे शब्द ऐकतांच शारदाबाई गलितधैर्य झाल्या. पण माधवरावांच्या मनावरील ताण मात्र त्या शब्दामुळं कमी झाला. त्यांना आतां पळून जातां येणं अशक्य होतं.

"जाऊं दे ! उघडतों मी दार. आतां लपवाछपवी करण्यांत अर्थ नाहीं !" दरवाज्याकडे जातां जातां माधवराव म्हणाले, "आमचं कार्य अडकून पडेल ह्याचंच वाईट वाटतं. आमचे किती तरी कार्यकर्ते अलिकडेच भराभर पकडले गेले आहेत. चंद्रकांतासारखे तरुण सहकारी मृत्यू पावले आहेत..."

स्वतःशींच पुटपुटत माधवरावांनीं दरवाजा उघडला, आणि हंसतमुखानं दादासाहेबांचं स्वागत करीत ते म्हणाले, "या दादासाहेब, आपणाला अशा मध्यरात्रीं त्रास दिला ह्याबद्दल क्षमा असावी !"

"छे, छे ! आपल्या एकातांत व्यत्यय आणला म्हणून मीच आपली क्षमा मागतों !" दोन्ही हात जोडून दादासाहेब म्हणाले.

माधवरावांना त्यांचं हें बोलणं उपरोधिक वाटलं. दादासाहेब आंत आले आणि त्यांनीं दरवाजा बंद करून त्याला आतून कडी घातली.

"हें काय ? तुम्ही एकटेच !" माधवरावांनीं आश्चर्यानं प्रश्न केला. "तुमचे शिपाई कुठं आहेत ? तुमचं पिस्तुल कुठं आहे ? तुमच्या स्वाधीन व्हायला माझी पूर्ण तयारी आहे."

"नाहीं. माधवराव, मी तुम्हाला अटक करण्याकरतां नाहीं आलों." दादासाहेब गंभीरपणानं म्हणाले, "उलट मीच तुमच्या स्वाधीन होण्याकरतां आलों आहे !"

माधवराव आणि शारदाबाई, दादासाहेबांचे हे शब्द ऐकून आश्चर्यचकित झाले. त्यांवर त्यांचा विश्वास बसेना. दादासाहेबांसारखा कॉंग्रेसचा शत्रू—तालुक्यांतील चळवळ दडपून टाकण्याकरितां वाटेल ते अघोरी उपाय अमलांत आणण्यास न कचरणारा फौजदार--त्याच्या ह्या शद्वावर कोण विश्वास ठेवणार ! खात्रीनं ह्यांत त्यांचा कांहीं तरी कुटिल डाव असला पाहिजे !

"मी नोकरीचा राजिनामा देणार आहे." दादासाहेब म्हणाले, "मला काँग्रेसचं कार्य करायचं आहे."

"दादासाहेब, तुमच्या अशा बतावण्यांना फसण्याइतके आम्ही भोळे नाहीं." माधवराव निक्षून म्हणाले, "मला अटक करायची असल्यास खुशाल करा. पण अशा गोड भुलथापा देऊन आमच्या अंतस्थ बातम्या तुम्हाला मिळतील, अशी जर तुमची कल्पना असेल तर ती चुकीची आहे. गुप्त चळवळ दडपून टाकण्यांत चंद्रकांताचा मृत्यु झाल्यापासून तुम्हाला यश मिळूं लागलं आहे. त्यामुळं तुमची नुकतीच बढतीदेखील झाली आहे, असं कळतं. आणि तुम्ही म्हणे राजिनामा देणार! आणखी बढती मिळवण्याकरतांच ही थाप दिसतेय!"

माधवरावांचे हे शब्द ऐकून दादासाहेबांचा चेहरा खिन्न झाला. ते म्हणाले, "तेंहि खरंच! मी कितीहि जीव तोडून सांगितलं, तरी त्यावर कुणाचा विश्वास बसणार नाहीं! माधवराव, मला बढतीचा हुकूम आला आहे, हें खरं आहे. पण मनाला जर स्वस्थता नसेल, संसारांत जर स्वारस्य नसेल, तर आणखी बढत्या मिळून तरी काय उपयोग?"

बोलतां बोलतां त्यांनीं आजूबाजूला पाहिलं. त्यांचं संभाषण ऐकत शारदाबाई चिंताक्रांत मुद्रेनं उभ्या होत्या. तें दादासाहेबांच्या लक्षांत आल्यावर ते शारदाबाईंना म्हणाले, "वहिनी, तुम्ही स्वस्थ झोपा आतां. माधवरावांना कांहींहि दगाफटका नाहीं, तुमच्या पायाची शपथ! जा, झोपा आतां स्वस्थ. मला माधवरावांशीं खूपच बोलायचं आहे!"

शारदाबाई आंत गेल्यावर दादासाहेब माधवरावांना गद्गद स्वरांत म्हणाले, "माधवराव, मीं एक भयंकर पाप केलं आहे. त्या पापाचं क्षालन अंशतः तरी व्हावं, म्हणून मला तुमच्या नेतृत्वाखालीं देशसेवा करायची आहे. मी तुमच्या अंतस्थ बातम्या फोडीन, अशी भीति तुम्हाला वाटण्याचं कांहींच कारण नाहीं. तुम्ही फक्त मला हुकूम सोडायचे आणि ते मी पार पाडायचे, बस्स! मग घ्याल का मला तुमच्या चळवळींत?"

त्यांच्या शेवटच्या प्रश्नांतील आर्तता माधवरावांना जाणवली. त्यांना वाटलं, किती विचित्र प्रसंग आहे हा! जो फौजदार आपणाला अटक करण्या-

करतां आला आहे, अशी आपणाला भीति वाटत होती, तो उलट आपणालाच शरण आलेला आहे. जो कर्दनकाळ समजला जाई, तो गोगलगायीइतका नरम आला आहे. ज्यानं सरकारी हुकुमांची अंमलबजावणी करण्यांत कसलाहि विधिनिषेध बाळगला नाहीं, तो पापपुण्याच्या गोष्टी करतो आहे! सारंच विचित्र!

"कसलं पाप घडलं तुमच्या हातून? सांगण्यास हरकत नसेल तर सांगा." कुतुहल अनावर होऊन, असला खाजगी प्रश्न विचारणं औचित्याला सोडून होईल हें समजत असूनहि, माधवरावांनीं प्रश्न केला.

"मी खुनी आहे!" चांचरत चांचरत दादासाहेब म्हणाले, "मी चंद्रकांताचा खून केला आहे!"

"चंद्रकांताचा तुम्ही खून केला आहे!" आश्चर्यानं माधवराव उद्गारले, "पण...पण चंद्रकांत तर..."

"सांगतोंच मी तुम्हांला सारी हकीकत." दादासाहेब म्हणाले, "चला, बसूं या आपण. मग निवांतपणानं सांगतों सारं तुम्हाला. माधवराव, माझी हकीकत ऐकून मला तुम्ही आपल्या कार्यांत घ्या किंवा घेऊं नका. पाहिजे तर माझा तिरस्कार करा. पण एकदां सारं खरं खरं कुणाला तरी सांगून टाकल्याशिवाय माझ्या हृदयावरचा भार हलका होणार नाहीं..."

दोघेहि बैठकीवर बसल्यावर थोडा वेळ विचार करून दादासाहेब सांगूं लागले :

"स्वतःला कॉंग्रेस आटोपत नाहीं, नि शिव्या मात्र आम्हांला!"

"अरे, कॉंग्रेसचं तर सोडा, पण स्वतःची बायको तरी ताब्यांत ठेव म्हणावं!"

हे शब्द ऐकतांच माझा संताप अनावर झाला.

साधारण सहा महिन्यांपूर्वीची गोष्ट. १९४२ च्या ऑगस्टमध्यें कॉंग्रेस पुढाऱ्यांना पकडल्यानंतर इथेंहि गडबड सुरू झाली, आणि ती दडपून टाकण्या-विषयींचे आम्हाला हुकूम मिळाले. कुठल्या तरी एका भूमिगत कार्यकर्त्याला

पकडण्याची आमची मोहिम सुरू झाली होती. तो इसम अमुक एका वेळेला अमुक एका ठिकाणीं नक्की येणार अशी आम्हांला बातमी मिळाली होती, व त्याप्रमाणं त्या ठिकाणावर छापा घालण्याकरतां आठ पोलिसांची एक तुकडी मी पाठविली होती. ह्या कार्यकर्त्यानं-आणि इतरांनीहि-आमच्या हातावर आतांपर्यंत तुरीच ठेवल्या होत्या. सारी माहिती काढून मोठ्या गुप्तपणानं आम्हीं जाळं पसरून ठेवावं; पण सावज जाळ्यांत सांपडूं नये असाच प्रकार नेहमीं होई. आजहि तसंच झालं. पोलिसपार्टी गेली आणि त्या ठिकाणाचा झाडा घेऊन परत आली. पण फरारी इसम नेहमींप्रमाणंच सांपडला नाहीं. पोलिसपार्टी हात हालवीत परत आलेली पाहून, मला संताप आला. हे असले प्रकार वरचेवर घडूं लागल्यामुळं माझ्यावर वरून नालायकीचे ठपके बसूं लागले होते; व असा एक एक प्रसंग घडून आला कीं मी संतापानं अगदीं बेभान होऊन जात असे.

" ...नालायक गद्धे ! कुठं विड्या फुंकीत बसला होतां ? फरारी इसम त्या ठिकाणीं आज येणार अशी खात्रीलायक बातमी होती मला. काय तुम्हीं येणार म्हणून नगारे वाजवीत गेलां होतां ? ... मग, निसटलं कसं सावज हातांतून ? चला, निघा इथून ! बेवकूफ—नालायक ! ... मला इथली कॉंग्रेस दडपून टाकायची आहे, आणि तुमच्यासारखे गद्धे हाताखालीं मिळालेत ! ..."

संतापाच्या भरांत मी त्या शिपायांना नाहीं नाहीं तें बोललों, आणि त्यांना ऑफिसांतून बाहेर हांकलून दिलं. आणि ते दरवाजांतून बाहेर पडतात न पडतात तोंच तो संवाद मला ऐकूं आलाः

"अरे, कॉंग्रेसचं तर सोडा, पण स्वतःची बायको तरी ताब्यांत ठेव म्हणावं ! " मला उद्देशून उच्चारलेले हे शद्ब ऐकतांच माझ्या संतापांत आणखी भर पडली. वाटलं, बाहेर जावं, आणि हे शद्ब उच्चारणाऱ्या शिपायाला बुटांच्या लाथांखालीं तुडवावं. टेबलाला धरून मी उठलों देखील; पण माझं पाऊल पुढं पडलं नाहीं. मी परत खुर्चीवर अंग टाकलं.

ते शब्द माझ्या जिव्हारीं बसले होते. मला स्वतःची बायको सांभाळतां येत नाहीं ? म्हणजे तिनं दुसऱ्या कुणाबरोबर चोरटा संबंध ठेवला आहे कीं काय ! आणि तें या शिपायाच्यांहि लक्ष्यांत येऊन चुकलं आहे कीं काय !..."

ही शंका माझ्या मनात येतांच तिनं मोठ्या झपाट्यानं आक्राळविक्राळ स्वरूप धारण केलं, आणि तिच्या भाराखालीं त्या शिपायावरचा माझा राग कुठल्या कुठं चिरडून गेला.

माधवराव, एक बायको वारल्यावर पोक्तपणीं दुसरं लग्न करणं फार वाईट. आपणांपेक्षां वीस एक वर्षांनीं लहान असणाऱ्या आपल्या बायकोला तिच्याच वयाचा एखादा तरणाबांड पोर आवडत असेल, असा संशय मनांत सदोदित घर करून असतो. पिकूं लागलेल्या केसांना कलप लावावा, निरनिराळीं याकुतीचीं औषधं खावीं, तरी पण आपल्या बायकोबरोबर वागतांना मनाला एक प्रकारचा विचित्र न्यूनगंड सारखा वाटत असतो. त्यांतून गिरिजा दिसायला सुंदर, कॉलेजचं शिक्षण घेतलेली आणि स्वभावानं धीट अशीच होती. लग्न केल्यापासून तिच्याविषयीं असा संशय माझ्या मनांत मधूनमधून डोकावे. पतिपत्नींत व्हावी तशी दिलजमाई आमच्यात अजून झाली नव्हती. आमच्यांत आवडीनिवडीचे आणि मतांचे भेदहि पुष्कळ होते; तरी पण पातिव्रत्याला सोडून तिनं कुठलंहि कृत्य केल्याचं मला कधींहि दिसून आलं नव्हतं.

मग शिपायांच्या त्या बोलण्याचा अर्थ काय? गिरिजा आपणांला चोरून कांहीं करते कीं काय? उगाच कुणी कशाला बोलेल? जसजसा मी ह्या प्रश्नांवर विचार करूं लागलों, तसतसे ते शब्द माझ्या हृदयांत अधिकाधिकच खोल जाऊन रुतून बसूं लागले. त्या विषारी शब्दांना आणि त्या संशयाला हांकून देण्याचे मी खूप प्रयत्न केले; पण त्यांत मला यश आलं नाहीं. खरं म्हणजे, लग्न केल्यापासूनच हा संशय माझ्या मनात सुप्तावस्थेंत होता. त्या शिपायाच्या शब्दांनीं त्याला खडबडून जागं केलं इतकंच. आणि तसं होतांच माझ्या मनावर त्याची इतकी विलक्षण पकड बसली कीं, त्या शिपायाला मी कांहींहि शासन करूं शकलों नाहीं.

त्यानंतरचे दिवस मी फारच वाईट स्थितींत काढले. इकडे कॉंग्रेसशीं लढा चालला होता, आणि गुप्त कार्यकर्त्यांना पकडण्याच्या बाबतींत मी एकामागून एक अपयशाचा धनी मात्र होत होतों. मनांत हा लढा चालला होता. गिरिजेवर पाळत ठेवायला मी सुरवात केली होती. कचेरींतून 'डोकं दुखतं आहे,' ह्या सबबीवर मी अवेळीं घरीं येई. बाहेरगांवीं जातांना आठ एक

दिवसांकरतां जातों असं सांगून मध्येंच केव्हां तरी अचानक परत येई. बरेच दिवस माझे हे श्रम फुकट गेले. मला वाटूं लागलं, गिरिजेविषयीं उगाच लोकांनीं कंड्या पिकविल्या आहेत. पण असं कुठलं व्हायला !

"सिनेमाला येतां का आज ?" एक दिवस मी गिरिजेला विचारलं. सिनेमा मला फुकटांत पाहावयास मिळत असल्यामुळं कामाचा शीण घालविण्याकरतां मी वरचेवर सिनेमांना जात असें. बहुधा गिरिजाहि माझ्याबरोबर असे.

"कुठला सिनेमा आहे ?" तिनं विचारलं. सिनेमाचं नांव 'चाबुकवाली' कीं असंच कांहीं तरी होतं. तें मीं तिला सांगितलं.

"मला नाहीं आवडत असले सिनेमा !" गिरिजा म्हणाली.

"अहो. आपली उगाच करमणूक म्हणून जायचं. मला तरी कुठं आवडताहेत असले सिनेमा ?"

"मला कंटाळा आला बाई !"

"असं काय करतां ? चलाना–माझ्याकरतां !" मी अजीजीनं म्हणालों.

"मी नाहीं येणार !" ती निक्षून म्हणाली.

"कां ?"

"देशाला आग लागली असतांना तुम्हांला सिनेमाबिनेमा सुचतात तरी कसे ?"

"अहो पण देशाच्या आगीचा आणि सिनेमाचा संबंध तरी काय ?" मी जरा थट्टेनंच विचारलं.

"तुमच्यासारख्यांना तें नाहीं कळायचं !"

"तुमच्यासारख्यांना—म्हणजे ?"

"म्हणजे तुमच्यासारख्या फौजदारसाहेबांना !" माझ्या फौजदारी पेशावर ती अशी टीका नेहमींच करी.

"तें असूं द्या हो; पण आजचा एक दिवस चला ना !" माझा राग गिळून मी म्हणालों.

"कां ? आजच काय विशेष आहे ?"

"वा ! आज एक बडी शिकार मिळाली आहे ना आम्हांला ! आज केळेवाडीला गेलों होतों. तिथं कॉंग्रेसमधलं एक बडं धेंड सांपडलं आम्हाला !"

"म्हणूनच खुषींत आहे वाटतं स्वारी !"

"तर...मग काय येतां ना ?"

"नाहीं ! मी येणार नाहीं !" आतांचा तिचा स्वर तर फारच हट्टी होता.

"तुम्हाला यायला पाहिजे !" मीहि हट्टाला पेटलों.

"तुमची फौजदारी इथं चालणार नाहीं !"

"उठल्यासुटल्या माझी फौजदारी काढूं नका. नवऱ्याला असं बोलण्याकरतांच कां इतकं शिक्षण घेतलं ?...तुम्हाला आज आलंच पाहिजे !"

"माझी खुषी !"

अखेरीला मी बराच आरडाओरडा केला, आणि संतापानं एकटाच सिनेमाला निघून गेलों. सिनेमा सुरू झाला, पण माझं लक्ष सिनेमाकडे लागेना. गिरिजेनं माझा अपमान केला होता. तिला माझ्याविषयीं कांहींच का वाटत नव्हतं ? मी वयानं पोक्त होतों म्हणून का तिला मी आवडत नव्हतों? पडद्यावरचीं पात्रं बोलत होतीं; पण माझ्या कानांत शद्ब घुमत होते, ते गिरिजेचे ! सिनेमागृहांत मला गुदमरल्यासारखं होऊं लागलं. मी उठलों, आणि घरीं परतलों.

घरीं येऊन दरवाजा ठोठावला, पण गिरिजेनं लगेच दार उघडलं नाहीं. अखेरीस दरवाजावर मी मोठमोठ्यानं धक्के दिले तेव्हां तिनं दार उघडलं. माझ्याप्रमाणंच तिलाहि राग आला असावा, आणि म्हणून तिनं दार उघडण्यास उशीर केला असावा, असं तेव्हां मला वाटलं.

गिरिजा आपल्या खोलींत जाऊन वाचीत पडली. मी दिवाणखान्यांत येरझाऱ्या घालीत होतों. इतक्यांत एका कोपऱ्यांत एक नवीनच छत्री माझ्या दृष्टीस पडली—

ती छत्री पाहतांच माझ्या मनाचा वारू मोकाट सुटला. थरथरत्या हातांनीं त्या छत्रीची मी तपासणी केली. तिच्यावर नांव लिहिलं होतं—'चंद्रकांत जोशी'

एकूण असं होतं काय? चंद्रकांताला भेटण्याचं गिरिजेनं ठरवून ठेवलं होतं; म्हणूनच ती सिनेमाला आली नाहीं. आपण अनपेक्षितपणें लवकर आलों, त्याबरोबर तो मागील दारानं पळून गेला. तें करण्याकरतां त्याला वेळ मिळावा, म्हणून दरवाजा उघडायला गिरिजेनं उशीर केला!...चांडाळीण!

गुपचुप छत्री होती तिथं मी ठेवून दिली, आणि बिछान्यावर जाऊन पडलों. ह्यापुढं गिरिजेवर चांगलीच पाळत ठेवावी असं मी ठरवलं.

"हे काय, तुम्ही खेड्यावर गेलां होतां ना?" गिरिजेनं विचारलं.

"हो, निघालों होतों; पण पाऊस खूप झालाय् नि वाटेंतल्या ओढ्याचं पाणी चढतंय् अशी बातमी आली, म्हणून नाहीं गेलों!" मी म्हणालों.

माझ्या आकस्मिक लवकर येण्याविषयीचं मनांत आधींच ठरवून ठेवलेलं कारण मी बोलून दाखवीत होतों खरा; पण माझं लक्ष होतं गिरिजेच्या चेहऱ्याकडे. पण तिच्या चेहऱ्यावरून तसा कांहींच थांग लागला नाहीं. अगदी निर्विकार चेहऱ्यानं तिनं टेबलावरचं एक पुस्तक उचललं, आणि पलंगावर लोळून ती तें वाचूं लागली.

अभिनय करण्यांत आणि पुरुषांना फसवण्यांत बायका किती पटाईत असतात, असा विचार माझ्या मनात आला. तिची ती सहज वागण्याची तऱ्हा पाहून कुणाला वाटलं असतं, माझ्यापासून लपवून ठेवण्यासारखं तिनं अलीकडे कांहींच केलेलं नसावं. पण तिनं अशी कितीहि बतावणी केली, तरी माझ्याच डोळ्यांवर आणि कानांवर मी कसा अविश्वास दाखवूं?

खेड्यावर न जातां मी घरीं परत आलों तो पावलांचा आवाज होऊं न देतां. घराच्या दिवाणखान्याची खिडकी उघडी होती, आणि तिच्यांतून गिरिजेचा आणि तिच्या समोरच्या खुर्चीवर बसलेल्या चंद्रकांताचा विपुल केशसंभार मला दिसून आला. लगेच आडोशा आडोशानं जाऊन, मी त्या खिडकीजवळ भिंतीशीं खेटून उभा राहिलों, नि आंतील संवाद ऐकूं लागलों. त्यांच्या संभाषणातले जेवढे शब्द मला स्पष्ट ऐकूं आले, तेवढेच माझ्या क्रोधाग्नीचा भडका उडविण्यास पुरेसे होते.

"दादासाहेब गेलेत ना खेड्यावर ?"—चंद्रकांत.

"हो, मघांच गेलेत. - मी सांगितलं होतं ना तुम्हांला परवां ?"–गिरिजा.

"हो, आणि त्याप्रमाणं मारी व्यवस्था करूनच आणि ते आज घरीं नसणार असं पाहूनच मी तुमच्याकडे आलोंय् !"

त्यावर थोडंसं थांबून गिरिजा म्हणाली,

"खरंच, पुष्कळदा मला वाटतं आपण करतों तें योग्य आहे का ? हा पतिद्रोह तर होत नाहीं ना ?"

"पतिद्रोह ! आतां काळ बदलला आहे, नि पातिव्रत्याच्या कल्पनाहि बदलल्या आहेत. तुमच्या जागीं मी असतों तर मनाला जें पटतं तें करताना मी नवऱ्याची पर्वा केली नसती !"—चंद्रकांत बोलत होता.

"अजून त्यांना आपल्या ह्या भेटींचा सुगावा लागलेला दिसत नाहीं. खरंच चंद्रकांत, तुम्हीं गुप्तपणानं कृत्यं करण्यात फारच तरबेज दिसतां. हे मारे साऱ्या तालुक्यांतल्या काँग्रेसच्या गुप्त बातम्या काढण्याची धडपड करताहेत. पण स्वतःच्या घरांतच आपल्या पाठीमागं कोण येतो, काय चालतं, याचा मात्र त्यांना पत्ताहि नाहीं !"—गिरिजा हंसून म्हणाली. "काहो, तुम्हांला त्याची भीति नाहीं वाटत ?"

"हं ! तुमच्यासारख्या स्त्रीला जर त्यांची भीति वाटत नाहीं, तर ती मला कां वाटणार ? बाकी खरंच, जर का दादासाहेबांना आपला संशय आला, तर तुम्हांला फार त्रास होईल, नाहीं ?"—चंद्रकातानं प्रश्न केला.

"हं ! झाला तर झाला...प्रेमाकरतां वाटेल त्या हालअपेष्टा सोसायला तयारी आहे माझी !" गिरिजेनं उत्तर् दिलं.

त्यांचं हें येवढं संभाषण होत आहे तों, समोरून माझ्याकडे दोन पोलिस येतांना मला दिसले. त्यांच्यासमोर त्या तशा स्थितींत मी उभं राहणं विचित्र दिसलं असतं. डोक्यांत विचारांचं काहूर उठलं असतांनाच मी दरवाजा ठोठावला.

चंद्रकांत मागच्या दारानं पळून जाईपर्यंत गिरिजेनं दरवाजा उघडला नाहीं. मी आंत गेल्यावर मघां सांगितल्याप्रमाणं, जसं कांहीं, कांहीं झालंच नाहीं, असं करून, गिरिजा पलंगावर पुस्तक वाचीत पडली.

मी दिवाणखान्यांत येरझाऱ्या घालीत होतों. ह्या प्रकरणाचा मला आतां एकदां काय तो सोक्षमोक्ष लावून टाकायचा होता. ह्या बाबतींत गिरिजेशीं आतां स्पष्टच बोलायचं मीं ठरवलं.

" काय वाचतांहात ? " मी विचारलं.

" कादंबरी ! "

" असल्या चटोर कादंबऱ्या कशाला वाचतां ? असल्या कादंबऱ्या वाचूनच बायका बिघडतात ! " विषयाची प्रस्तावना तर ठीक झाली होती.

" तें कादंबरीवर अवलंबून आहे. चांगल्या कादंबऱ्या वाचल्या तर माणूस सुधारतोहि ! "

" मग तुम्ही वाचतां त्या कादंबऱ्या चटोरच असल्या पाहिजेत ! "

" म्हणजे ! मला नाहीं समजला ह्याचा अर्थ ! "

" हें पाहा, आतां वेड पांघरून पेडगांवला जाण्यांत कांहीं अर्थ नाहीं. माझ्या पाठीमागं चंद्रकांताबरोबर तुमचे काय उद्योग चालतात, हें मला कळलं आहे ! "

माझे हे शब्द ऐकतांच ती एकदम चपापलेली दिसली मी पुढं म्हणालों, " चंद्रकांताचा आणि तुमचा संबंध ह्यापुढं तुटला पाहिजे. एक बदफैली स्त्री म्हणून माझ्या बायकोचं नांव मला व्हायला नको आहे ! "

" बदफैली ! इतके का संशयी आहांत तुम्ही ! मी तुम्हांला सांगतें कीं चंद्रकांत मला माझ्या भावासारखे आहेत... "

" मग त्या 'भावाला' आतां परत कधीं येऊं नको म्हणून सांगा. भावावांचून कांहीं बहिणीचं अडून राहात नाहीं. भाऊ ! हूः ! " नुकतंच ऐकलेलं त्यांचं संभाषण आठवून जरा रागानंच मी म्हणालों, " हें पाहा, माझ्याशीं लपवाछपवी चालणार नाहीं. मला डोळे आहेत आणि कानहि आहेत—चंद्रकांतानं ह्या घराची पायरी पुन्हां कधीं चढतां कामा नये ! "

त्या दिवशीं मी येवढं निक्षून सांगितलं, नंतरहि पुष्कळदां स्पष्ट सूचना दिल्या, पण गिरिजेनं चंद्रकांताशीं असलेला आपला संबंध तोडला नाहीं.

आतां चंद्रकांत फारच गुप्तपणानं तिच्या गांठी घेऊं लागला. भेटहि घेतां येणं शक्य नसल्यास, त्यांच्यात चिठ्याचपाठ्या जाऊं लागल्या. अखेरीस नुसतं सांगून सवरून कांहीं होणार नाहीं, आतां ह्यावर कांहीं तरी जालीम उपाययोजना केली पाहिजे, असं मी ठरवलं.

तालुक्यांतला कॉंग्रेसचा लढा जोरांत चालू होता. तारा कापणें, जाळपोळ, लुटालूट, मधूनमधून चालूंच होती. तरी पण एकहि नांव घेण्यासारखा गुप्त कार्यकर्ता माझ्या हातीं सांपडत नव्हता. सारी काळजी घेऊन मोठ्या अचानकपणें छापा घालावा; पण पक्षी आधींच उडून गेलेला असावा. ह्याच रागानं कुणी कॉंग्रेसवाला माझ्या तडाक्यांत सांपडला, किंवा गांवांत कांहीं गडबड झाली तर मी मोठ्या निर्दयतेनं वागूं लागलों. इकडे अशी स्थिति होती, नि घरांत हा प्रकार होता! मी अगदीं कावून गेलों होतों. माझ्या मनाचा संताप झाला होता. माझा क्रोधाग्नि इतका भडकला होता कीं, कुणाचा तरी बळी त्यांत पडल्याखेरीज तो आतां शांत होणार नव्हता,–काय करूं! आत्महत्या करूं? छे! माझ्यासारखा मर्द गडी असलं कृत्य कधीं करणार नाहीं!— मग--मग गिरिजेचा खून करूं?...छे! एका स्त्रीचा खून! –मग--मग राहिला चंद्रकांत—

देशांतल्या गडबडीमुळं आम्हां पोलिसांचे अधिकार पुष्कळच वाढले होते. कांहीं तरी तोहमत आणून चंद्रकांताला तुरुंगांत डांबणं मला फारसं अवघड नव्हतं. काय युक्ति करून त्याला अटक करावी ह्याच विचारांत मी होतों. इतक्यांत त्याचा कांटा काढण्याची संधि मला दैवानंच आणून दिली.

९ ऑगस्ट १९४३. चळवळ सुरू होऊन बरोबर एक वर्ष झालं होतं. अजूनहि चळवळीविषयींचा गांवांतला उत्साह टिकून होता. हरताळ पाडून व प्रभातफेऱ्या, मिरवणुकी वगैरे काढून चळवळीचा वर्षदिन साजरा करण्यांत येणार होता. गांवांत हरताळ तर कडक पडला होता. सकाळीं ल्हान पोरापोरींनीं काढलेल्या प्रभातफेऱ्या आम्ही सहज उधळून दिल्या होत्या. आतां मोठी मिरवणूक केव्हां निघते इकडेच आमचं लक्ष्य लागून राहिलं होतं.

गांवांतल्या चौकाचौकांतून लाठीवाल्या पोलिसांच्या तुकड्या ठेवण्यांत आल्या होत्या. कचेरींत हत्यारबंद पोलिसांची एक तुकडी जय्यत ठेवली होती. माझा गणवेश चढवून आणि कमरेला पिस्तूल लावून मी साऱ्या गांवांतून चकरा मारीत होतों.

संध्याकाळच्या सुमारास नेहरू चौकापाशीं एक मोठी मिरवणूक पोलिसांनीं अडवून धरल्याची मला वर्दी आली. हत्यारी पोलिसांना घेऊन मी ताबडतोब तिथें हजर झालों.

हजार दीड हजार माणसांचा तो समुदाय होता. त्यांच्या जयघोषानं सारं वातावरण दुमदुमून गेलं होतं. सारा समाज अहिंसात्मक पद्धतीनं वागत असला तरी त्या लोकसागराच्या लाटा थोपवून धरणं पोलिसपार्टीला हळूंहळूं अशक्य होऊं लागलं होतं. लाठीचं कडं धरून उभे असलेले पोलिस पावलापावलानं मागं सरूं लागले होते. पोलिसांनीं माघार घेतली कीं जनसंमर्दातून एकच जयघोष उठे. मिरवणुकींतील पोरंसोरं पोलिसांची थट्टा करूं लागलीं. एक पोऱ्या मला उद्देशून म्हणाला, “ यू मोत्या, यू--यू ! ” आमची कुचेष्टा चाललेली पाहून मला राग आला. मी त्या जनसमुदायाला ओरडून सांगितलं, “ ही मिरवणूक बेकायदा आहे. सर्वजण आपापल्या घरीं जा ! ”

“ हा देश आमचा आहे. हा गांव आमचा आहे. हे रस्ते आमचे आहेत. त्यावरून वाटेल तेव्हां मिरवणूक नेण्याचा आमचा हक्क आहे ! ” गर्दीतून एक आवाज आला, आणि त्यापाठोपाठ गर्जना उठली, “ महात्मा गांधी कीं जय ! ”

ते शब्द उच्चारणाऱ्या त्या तरुणाकडे मीं पाहिलं. गर्दीतून वाट काढीत तो माझ्याच दिशेनं येत होता. मी त्याला निमिषार्धात ओळखलं. तो चंद्रकांतच होता.

त्याच्याकडे दुर्लक्ष करून मी पुन्हां एकदां ओरडलों, “ पुनः एकदां सांगतों ! मागं हटा-आपापल्या घरीं जा ! ”

“ आम्हीं जाणार नाहीं ! ” हातवारे करीत चंद्रकांत म्हणाला. “ तुमचे हुकूम आम्हीं मानणार नाहीं. ”

"मी फौजदार म्हणून हुकूम करतों, तुम्ही इथून निघून जा!" मी ओरडलों.

"आम्हीं स्वतंत्र हिंदुस्थानचे नागरिक आहोंत. इंग्रजांच्या कुत्र्यांचे हुकूम आम्ही मानणार नाहीं. पाहिजे तर लाठी चालवा, पण आम्ही इथून तसूभरहि मागं सरणार नाहीं. बोला, माहात्मा गांधी की जय!" हात उंचावून चंद्रकांत ओरडला.

"महात्मा गांधी की जय!" मेघगर्जनंप्रमाणं जनसंमर्दांतून प्रतिध्वनि उमटला.

जनसागराच्या लाटा पोलिसांना परत लोटूं लागल्या. चंद्रकांताच्या भाषणानं लोकांचा उत्साह द्विगुणित झाला होता. आणखी थोडावेळ असाच गेल्यास थकलेल्या पोलिसांचं कडं फोडून मिरवणूक निघून गेली असती, आणि माझ्या नाचक्कीला पारावार उरला नसता. माझ्यासमोर चंद्रकांत उभा होता. त्याची कमावलेली शरीरयष्टि, डोक्यावरील काळा कुळकुळीत विपुल केशसंभार, आणि सळसळणारं तारुण्य पाहून मला एकदम गिरिजेची आठवण झाली. माझ्या मनांत मत्सराग्नीनं भडका घेतला. चंद्रकांत माझ्याकडे बेदरकार-पणानं पाहात उभा होता. माझा हात पिस्तुलाकडे गेला.

पण ह्या अहिंसक जमावावर गोळीबार कसा करायचा? मी क्षणभर विचार केला. त्या एका क्षणांतच माझ्या मनानं किती विचार केला! साध्या पोषाखांतील दोन तीन पोलिसांना मी जवळ बोलावून घेऊन त्यांच्या कानांत कांहीं तरीं पुटपुटलों आणि दोनच मिनिटांत गर्दींतून पोलिसांवर दगड येऊं लागले.

लवकरच पोलिसांवर दगडांचा अविरत वर्षाव होऊं लागला. "शांत व्हा, शांत व्हा!" म्हणून ओरडून ओरडून चंद्रकांताचा घसा बसला; पण दगडांचा पाऊस तसाच चालू राहिला. एका शिपायाच्या डोक्याला मार बसला व त्यांतून रक्त भळभळां वाहूं लागलं. दुसरे दोन चार शिपाईहि जायबंदी झाले. आतां जमावावर गोळीबार करण्यास मला सबळ कारण मिळालं होतं. माझं पिस्तुल काढून मी तें चंद्रकांतावर रोखलं, आणि हत्यारबंद पोलिसांना हुकूम दिला, "फायर!"

शिपायांनीं एक फैर झाडली. वावटळीनं पालापाचोळा उडून जावा तसा तो चौक क्षणार्धांत रिकामा झाला. कित्येक जखमी झालेले लोकसुद्धां जीव घेऊन पळून गेले.

फक्त छातीवर गोळी लागलेला चंद्रकांत तेवढा गतप्राण होऊन चौकाच्या मध्यभागीं पडला होता.

त्याच्याकडे पाहून मला हर्ष झाला. त्याच्या छातींत घुसलेली गोळी माझ्याच पिस्तुलांतून सुटली होती. गिरिजेच्या जाराला मी यमसदनास पाठविलं होतं!

चंद्रकांतासारख्या विवाहित स्त्रीशीं व्यभिचार करणाऱ्याला योग्य तेंच शासन केलं, व माझ्या संसारसुखांत रुतणारा कांटा काढून टाकला, ह्याचा मला आनंदच होत होता. सुदैवानं ह्यानंतर भूमिगत कार्यकर्त्यांना पकडण्यांतहि मला चांगलंच यश मिळूं लागलं. आतां फक्त तुम्ही आणि दुसरे एकदोघेजणच तेव्हढे फरारी आहेत. तुम्हाला तर आजच मी अटक करूं शकलों असतों, व बाकीच्यांनाहि महिना दीड महिना बस्स होता. पांचच दिवसांपूर्वी बढतीचा हुकूम माझ्या हातीं पडला. माझा आनंद गगनांत मावेनासा झाला. पण हा आनंद फार काळ टिकून राहिला नाहीं.

"हें पाह्यलंत का!" बढतीचा हुकूम गिरिजेसमोर धरून मी विचारलं.

"काय?"

"माझी बढती झाली आहे, त्याचा हुकूम आहे हा!"

गिरिजेनं आपलं तोंड दुसरीकडे फिरवलं. ती म्हणाली, "नका, माझ्या डोळ्यांसमोर तो कागद धरूं नका. त्यावर देशभक्तांच्या रक्ताचे डाग मला दिसत आहेत!"

"देशक्तांच्या रक्ताचे, कीं जाराच्या रक्ताचे?"

"जार! काय बोलतां हें तुम्ही!" कष्टी मुद्रेनं ती उद्गारली, "कितीदां मी तुम्हाला सांगितलं कीं चंद्रकांताला मी भावाप्रमाणं मानीत होतें म्हणून!"

"अजूनहि मला बनविण्याचा तुम्ही प्रयत्न करावा अं? तो तुमचा भाऊ होता तर चोरूनच तुमच्या गांठीभेटी घेण्याची काय जरूर होती त्याला?"

गिरिजा गप्पच राहिली. तें पाहून तिच्या पापाचं पुरं माप तिच्या पदरांत घालावं, ह्या उद्देशानं मी म्हणालों, "भाऊ-बहिण कधीं प्रेमाच्या गुलगुल गोष्टी करीत बसत नाहींत!"

"प्रेमाच्या गुलगुल गोष्टी ? कुणी सांगितलं तुम्हाला हें ? "

" सांगायला कशाला पाहिजे ? मी स्वतः ह्या कानांनीं ऐकलं आहे सारं. त्या दिवशीं मी खेड्यावर जायला निघालों. पण वाटेंत ओढ्याला पूर आला म्हणून तसाच परत आलों. तो दिवस आठवतो का तुम्हाला ? त्याच दिवशीं तुमच्या प्रेमाच्या गोष्टी चाललेल्या मी ऐकल्यात. ' प्रेमाकरतां मी वाटेल ते हाल सोसीन ' असं तुम्हीं त्याला सांगत होतात. ' पातिव्रत्याच्या कल्पना बदलल्या आहेत ' असं म्हणून तो तुम्हांला फूस देत होता !..."

" काविळ झालेल्या माणसाला सारंच पिवळं दिसतं, तसं झालंय् तुमचं. संशयानं पछाडल्यामुळं मी देशप्रेमाविषयीं बोलल्यें तें तुम्हांला प्रेमाच्या गुलगुल गोष्टींप्रमाणं वाटलं ! आतां चंद्रकांत तर बिचारा गेलाच आहे, तर सारं स्पष्टच सांगतें तुम्हाला मी, म्हणजे तुमच्या मनांतला माझ्याविषयींचा घाणेरडा संशय तरी जाईल. चंद्रकांत हा एक कॉंग्रेसचा कार्यकर्ता होता. सरकारी गोटां-तल्या बातम्या काढण्याचं काम त्याच्याकडे होतं. तुम्हीं घरीं आणलेलीं कागदपत्रं चोरून वाचून आणि तुम्ही शिपायांना घरीं बोलावून दिलेले महत्वाचे हुकूम ऐकून मी ते चंद्रकांताला सागत असे, आणि त्याप्रमाणं तो भूमिगत कार्य-कर्त्यांना सावध करीत असे. चंद्रकांत गेल्यापासून पहा ना एक एक गुप्त कार्यकर्ता तुम्हांला कसा सांपडूं लागला आहे तें ! "

" माधवराव, गिरिजेचे हे शब्द ऐकल्यापासून माझ्या मनाची शांती पार नष्ट झाली आहे. चंद्रकांताला मारण्यांत त्याला योग्य तेंच शासन केलं, असं मला जें वाटत होतं, तें आतां तसं वाटेनासं झालं आहे. त्या ऐवजीं आतां माझ्या मनाला सारखी पापाची टोचणी लागून राहिली आहे, " तूं खुनी आहेस ! तूं चंद्रकांताचा अधमपणानं खून केला आहेस ! " माधवराव माझ्यावर दया करा. ज्या चंद्रकांताचा मी खून केला आहे, त्याचं देशकार्य पुढं चालविण्याकरतां, आणि कुठल्याहि पतिव्रतेला अतिभयंकर वाटतील असे आरोप गिरिजेवर करून तिला जें दुःख मी दिलं आहे, त्याची भरपाई करण्याकरतां तरी तुम्ही मला आपणांत घ्या... ! "

## बॉंब : :

" किती जड आहे हा बॉंब ! " धांपा टाकीत ज्यूल्स म्हणाला.

" अतिशयच जड आहे बुवा ! " गिलिसनें त्याला साथ दिली, " पण आतां थोडंच अंतर राह्यलंय्. तें टेकाड दिसतंय् ना, त्याच्या जरा पलीकडे गेलं, कीं आलीच रेल्वेलाइन. "

" ती टेकडी ओलांडतांना मात्र अतिशयच काळजी घेतली पाहिजे. " दबलेल्या आवाजांत जीन म्हणाला, " नाहीं तर जरा कोणाचा पाय घसरला, किंवा कोणाला ठेंच लागून बॉंबला धक्का बसला, तर मग आटोपलाच सारा कारभार .. "

" फारच भयंकर आहे हा बॉंब ! " खड्ड्यांत गेलेला आपला एक पाय सांवरीत गिलिस म्हणाला, " काय अंधार पडला आहे ! चार हातांवरचंसुद्धां दिसत नाहीं... .. "

" भयंकर म्हणजे ! ते राक्षस विमानांतून इंग्लंडवर फेकण्यासाठीं ह्या बॉंब्सचा उपयोग करतात ना ! " जीन म्हणाला, " जिथं हा बॉंब पडतो, त्याच्या आसपास दोन फर्लांगांत तरी एकहि भिंत उभी राहात नाहीं म्हणतात."

" बाप रे ! इतका का भयंकर आहे हा बॉंब ! " ज्यूल्स उद्गारला, " म्हणजे आपण खरोखरच भाग्यवान् म्हणायचे ! "

" कां ? "

" मघां मला ठेंच लागली तेव्हां केवढयानं धक्का बसला होता बॉंबला ! " ज्यूल्स म्हणाला.

" हो, नशीबच म्हणायचं आपलं ! " जीन म्हणाला " मीं तर डोळेच मिटून घेतले होते त्या वेळीं. म्हटलं, आपले शंभर तुकडे होऊन ते आतां अंतराळांत उडणार... ! "

त्याच्या स्वरावरून ह्या कल्पनेनें त्याच्या अंगावर शहारे आलेले दिसून येत होते.

" खरंच ! परमेश्वरानं खैरच केली म्हणायची ! " गिलिस म्हणाला.

" हो. आपल्या हातून आज एक मोठंच देशकार्य घडून येणार आहे ना ! म्हणूनच परमेश्वरानं त्या वेळीं बॉंबचा स्फोट होऊं दिला नसावा ! " एक समाधानाचा सुस्कारा टाकून ज्यूल्स म्हणाला.

त्यानंतर रेल्वेलाइन जवळ येईपर्यंत कोणी कांहींच बोललें नाहीं. त्या बॉंबचें अवजड धूड घेऊन, काळ्याकुट्ट अंधारांतून ते तिघे रेल्वेलाइनचा मार्ग आक्रमीत होते. आकाशांत तारे, आणि दूरवर स्टेशनवरचे पिवळे तांबडे दिवे लुकलुकत होते. तेवढाच प्रकाश जणूं सर्व विश्वांत होता ! त्या तिघांच्या श्वासोच्छ्वासाचा आवाज मोठमोठ्यानें होत होता. ठेंच लागून ज्यूल्सच्या पायाच्या आंगठ्यांतून रक्त वाहात होतें एकाच तऱ्हेनें तो बॉंब सारखा धरून तिघांच्याहि हातांना कळ लागली होती. पण म्हणूनच बॉंबवरची आपल्या हाताची पकड ते अधिकच घट्ट करीत होते. हो ! कळ लागलेल्या हातांतून बॉंब निसटून खालीं पडला तर ! —

थोड्याच वेळांत त्यानीं तें टेकाड ओलांडलें. चालतांना ते अतिशय जपून पावलें टाकीत होते, आणि कसल्याहि प्रकारचा आवाज होऊं नये म्हणून कमालीची काळजी घेत होते. अंधाराचा भेद करण्याचा प्रयत्न करीत त्यांची दृष्टि चहुं बाजूंना भिरिभिरी फिरत होती. हो ! जर्मनांची एखादी पाहाऱ्याची गाडी आली तर किंवा कोठें एखादा जर्मन पहारेकरी दडी मारून बसलेला असला तर, ! कारण अलीकडे क्रांतिकारकांच्या चळवळीमुळें जर्मनव्याप्त फ्रान्समधील आगगाड्याना वरचेवर अपघात होऊं लागले होते. त्यामुळें जर्मन

सैन्याच्या आणि शस्त्रास्त्रांच्या वाहतुकीची बरीच कुचंबणा होऊं लागली होती. म्हणून अलीकडे जर्मन्सहि रेल्वेलाईनवर कडक पहारा ठेवूं लागले होते.

स्ळांपासून ते तिघे फर्लांगभर अंतरावर आले असतील; एकदम कुठून तरी आलेल्या एन्जिनवरच्या दिव्याच्या प्रखर प्रकाशानें सर्व रेल्वेलाईन व त्याच्या आजूबाजूचा बराचसा प्रदेश उजाळला गेला. तिघांनींहि घाईघाईनें बाँब खालीं ठेवून दिला, आणि जवळच एक खड्डा होता त्यात उड्या मारल्या.

ती गाडी जर्मनांची पाहाऱ्याची गाडी होती. एन्जिनला फक्त एकच डबा जोडलेला होता. गाडी एखाद्या विजेसारखी चमकून गेली. पण तेवढ्या वेळांत आंत बसलेले राक्षसासारखे दिसणारे उंच धिप्पाड आणि क्रूर जर्मन शिपाई त्यांना दिसले. अनेक देशभक्त किंवा निरपराध फ्रेंचांचे जिनें बळी घेतले असतील, अशी खिडकीशीं ठेवलेली एक मशिनगनहि त्यांना ओझरती दिसली. एक शिपाई दारूचा ग्लास आपल्या ओठाना लावीत होता. फ्रान्समधील प्रसिद्ध शँपेन असावी ती ! —

हें दृश्य त्यां तिघांनीं क्षणभरच पाहिलें असेल. पण त्यामुळें त्यांना त्वेष चढला. ज्यूल्सनें तर आपला खालचा ओंठ इतक्या जोरानें चावला कीं, त्यांतून खात्रीनें रक्त निघाले असेल. गाडी निघून गेल्यावर तिघेहि थोडा वेळ एकमेकांकडे पहात राहिले. एकाच्या दृष्टींतील खूण दुसऱ्याला पटली; जगूं प्रत्येकाचे डोळे दुसऱ्याला सांगत होते, " पाहिलंस हें जेरीचं–आपल्या शत्रुचं सामर्थ्य ? घाबरलास तूं ? नाहीं ना ?–शाबास ! फ्रान्सचा-आपल्या उज्ज्वल पितृदेशाचा वीरपुत्र आहेस तूं ! हें दृश्य पाहून आपल्या क्रांतीच्या कार्याला आपण दुप्पट उत्साहानं सुरुवात करूं या, आणि आपल्या पवित्र भूमीवरून हुणांची हक्कालपट्टी करूं या ! "

गाडी दूर निघून गेल्यावर तिघेहि खड्ड्यांतून बाहेर आले. आपला बाँब त्यांनीं अलगद उचलून घेतला, आणि लवकरच ते रेल्वेलाईनपाशीं येऊन पोहोंचलें.

" अगदीं हळू ठेवा हं. " जीननें सूचना दिली. त्यानें सूचना द्यायची खरं पाहतां कांहींच जरूर नव्हती. केव्हां एकदां आपण तो बाँब योजलेल्या ठिकाणीं ठेवून देतों आणि त्याच्यापासून दूरदूर निघून जातों; असें प्रत्येकाला होऊन गेलें होतें.

दोन्ही रुळांच्या मधोमध ठेवलेल्या त्या बाँबकडे कपाळावरचा घाम पुशीत ज्यूलसनें एकदां पाहिलें. तो एखाद्या लाकडाच्या ओंडक्याप्रमाणें निरुपद्रवी आणि निष्पाप दिसत होता. त्याच्या मनांत विचार आला, किती संहारशक्ति ह्याच्या पोटांत दडलेली आहे! पण दिसतो किती सालस! ह्या विचारानें ज्यूलसला थोडेंसें हसूंच आलें. आतां येणाऱ्या गाडीचें परमेश्वरच रक्षण करो! ही लाईन आतां निदान महिनाभर तरी जर्मनांना निरुपयोगी होईल.

बाँब योग्य ठिकाणीं नीट व्यवस्थित ठेवला आहे अशी खात्री करून घेऊन तिघेंहि झपाझप पावलें टाकीत ज्यूलसच्या खोलीकडे परत निघाले. गांवांतील लोखंडाचे कारखाने जर्मनांसाठीं रात्रपाळी करीत होते; त्यांतील लालसर प्रकाशानें क्षितिजाचा एक भाग उजाळला होता; त्या अनुरोधानें ते आपला मार्ग चालूं लागले.

"किती वाजले असतील रे?" बरेंच दूर गेल्यावर ज्यूलसनें विचारलें.

"बाराचे ठोके तर मघांच पडले."—जीन.

"मग आतां अर्ध्या-पाऊण तासांतच एक्स्प्रेस येईल तर?"—ज्यूल्स.

"हं. एक्स्प्रेस आल्यावर काय हाहाःकार उडेल ह्याची कल्पनाच करवत नाहीं." जीन म्हणाला, "एन्जिनच्या हादऱ्यांनीं बाँबचा स्फोट होईल, आणि एन्जिन अंतराळांत फेकलं जाईल. कांहीं डबे एकावर एक चढतील, तर कांहींचा चक्काचूर होईल. आरोळ्यांनीं आणि किंकाळ्यांनीं सर्व आकाश भरून जाईल......" पुढें त्याच्यानें बोलवेना. त्याचें अंग शहारलें.

"पण ह्या अपघातांत आपल्या निरपराध फ्रेंच बांधवांचा बळी पडणार हें मात्र वाईट!" खिन्नपणें गिलिस म्हणाला.

"त्याला इलाज नाहीं." करारीपणानें ज्यूल्स म्हणाला, "रक्ताचं अर्घ्य मिळाल्याशिवाय स्वातंत्र्यदेवता प्रसन्न होत नाहीं! मग तें रक्त आपलं असो कीं शत्रुचं असो. सर्व राष्ट्राच्या स्वातंत्र्याचा विचार करतांना थोड्या देशबांधवांचं रक्त सांडलं, तर तिकडे दुर्लक्ष केलं पाहिजे!"

हा वेळपावेतों ते गांवाजवळ आले होते. आतां कुठें त्यांच्या मनावरील दडपण कमी होऊं लागलें होतें. ह्या मोठ्या जबाबदारींतून पार पडल्यावर

ज्यूल्सला पहिल्यानें कशाची आठवण झाली असेल तर ती ज्यूली आणि सिगरेटची. त्यानें एक सिगरेट तोंडांत धरली, आणि तो आतां काडी शिलगावणार इतक्यांत जीन म्हणाला,

" हं, सबूर; काडी पेटवूं नको ! कोणी पाहील ना ! "

सिगरेटची तलफ दाबून ज्यूल्सनें ती खिशांत ठेवून दिली. ' पण माझ्या ज्यूलीविषयीं विचार करायला तर कोणाची आडकाठी नाहीं ना ? ' तो मनांतल्या मनांत म्हणाला, आणि ज्यूलीबद्दल विचार करूं लागला.

जर्मनीविरुद्ध युद्धाची घोषणा झाल्याबरोबर सैन्यांत दाखल होण्याकरितां आपण गेलों; पण आपलें हृदय अशक्त आहे, ह्या सबबीवर आपणाला सैन्यांत घेतलें नाहीं. निराश होऊन आपण परत आलों, आणि झालेला प्रकार ज्यूलीला सांगितला. पण आपल्या सांगण्यावर तिचा विश्वास बसला नाहीं. आपणावर भ्याडपणाचा आरोप करून तिनें आपली निर्भत्सना केली. नंतर हां हां म्हणतां जर्मनांनीं आपला देश पादाक्रांत केला. सर्वत्र निराशेचें साम्राज्य पसरलें. जर्मनांनीं आपल्या देशबांधवांवर अनन्वित अत्याचार केले. सक्तीच्या मजुरीकरितां ज्यूलीला पकडून, चाळीस-पन्नास किलोमिटर्सवर असलेल्या एबव्हिल्ला नेलें, आणि तिथल्या एका बॉंबच्या कारखान्यांत तिला जबरदस्तीनें कामाला लावलें. आपणालाहि इच्छेविरुद्ध इथल्याच एका लोखंडाच्या कारखान्यांत जर्मनांनीं कामाला लावलें. शत्रूचें युद्धसाहित्य तयार करतांना मनाला किती यातना होतात ! ज्यूलीचा आपणावरचा राग अजून फारसा कमी झालेला नाहीं. ती आपणाला देशद्रोहीच समजते. पण आतां ? देशाच्या स्वातंत्र्यासाठीं जिवाची पर्वा न करतां लॉरी, जीन, गिलिस वगैरे क्रांतिकारकांच्या गुप्त संघटनेंत मी सामील झालों आहें. स्वतःचा जीव धोक्यांत घालून तो भयंकर बॉंब उचलून नेण्याचें जें साहस मीं आज केलें आहे, तें ज्यूलीला कळल्यावर माझ्यावरील तिचा राग पार नाहींसा होईल. डोळ्यांत अभिमान उभा करून ती माझ्याकडे पाहील, आणि-आणि मोठ्या आनंदानें माझ्या अधीर बाहुपाशांत आपली देहलता ठेवील. कधीं भेट होईल तिची ?...

बिचारा ज्यूल्स ! मघां सिगरेटच्या बाबतींत त्याची निराशा झाली होती. तोच प्रकार ज्यूलीच्या बाबतींतहि घडून येणार आहे, ह्याची त्याला काय कल्पना !

ज्यूल्सच्या खोलीवर ते तिघे लवकरच येऊन पोहोचले. तिथून रेल्वेलाईन साधारण मैलभर अंतरावर होती. खोलीच्या पाठीमागच्या बाजूच्या खिडकीं-तून जाणाऱ्या येणाऱ्या आगगाड्या दिसत. खोलींत येतांच जीन खिडकीशीं जागा पटकावून उभा राहिला. एक्स्प्रेस केव्हां येते, आणि बॉंबचा स्फोट केव्हां होतो, इकडे सर्वांचें लक्ष लागून राहिलें होतें.

खोलींत ते शिरले, तों लॉरी शांतपणानें एक चिरूट ओढीत एका खुर्चीत पडलेला त्यांना दिसून आला. तो चांगला उंच धिप्पाड होता, आणि त्यांच्या गुप्त टोळीचा तो म्होरक्या होता. ते तिघे आंत शिरतांच त्यानें एकदम अधीरतेनें प्रश्न केला, "काम फत्ते ?"

"फत्ते !" ज्यूल्स म्हणाला.

"अरे हो, ज्यूल्स !" एक समाधानाचा सुस्कारा टाकून आपल्या गबाळया कोटाचे खिसे चांचपीत लॉरी म्हणाला, "विसरूनच गेलों होतों अगदीं ! ज्यूली भेटली होती मला आज."

"कोण ? ज्यूली ? कुठं भेटली होती ती तुला ?"

"अरे, एबव्हिल्ला गेलों होतों ना मी आज !" नंतर आजूबाजूला पाहून अगदीं हलक्या आवाजांत लॉरी म्हणाला, "ज्यूली ज्या बॉंबच्या कारखान्यांत काम करते, त्याच कारखान्यांतून चोरून आणला आहे मी आजचा बॉंब."

"मग तिला माहीत आहे का हें सारं ?" ज्यूल्सनें अधीरतेनें विचारलें, "तूं बॉंब आणलेला तिला माहीत असेल ना ?"

"छट् ! कारखान्याच्या पाहारेकऱ्याशिवाय दुसऱ्या कोणाला माहीत नाहीं हा प्रकार ! कारखाना सुटल्यावर संध्याकाळीं भेटली होती ती मला. माझ्या एका चुलतभावाला भेटायला आलों आहें, म्हणून दिली थाप... ! हो, पण तुझ्यासाठीं एक पत्र दिलंय् तिनं माझ्याजवळ."

"मग दे तर तें पत्र लवकर." ज्यूलीचें पत्र वाचण्यासाठीं ज्यूल्स अगदीं अधीर झाला होता. पत्र हातात पडतांच पाकिट फाडून तो तें पत्र वाचूं लागला—

"तूं देशद्रोही आहेस, ही माझी खात्री आहे. तुझा संबंध मीं कधींच तोडून टाकला असता; पण काय करूं? तुझा तिरस्कार करूनहि मी तुला विसरूं शकत नाहीं...

आज रात्रीच्या एक्स्प्रेसनं मी तुझ्या गांवीं येणार आहें. तिथं आल्याबरोबर तुझ्या खोलीवर तुझी भेट घेईन. तूं कांहीं तरी देशकार्य करीत आहेस अशी जर तूं माझी खात्री पटवून दिलीस, तर ही ज्यूली तुझीच आहे. पण जर तूं अजून पूर्वीसारखाच भित्रा असशील, तर मग मात्र आपली ही शेवटचीच भेट समज...

'तुझीच' म्हणून इतक्यांतच कशी लिहूं?

—ज्यूली"

आणखी थोड्या वेळांत आपली ज्यूली आपणाला भेटणार! ज्यूल्सला एकदम आनंद झाला. आपला आजचा पराक्रम आपण तिला सांगू. लॉरी वगैरेंच्या गुप्त टोळींत आपण आहोंत, हें तिला आपण सप्रमाण पटवून देऊं; ते तिघेहि आहेतच इथें. मग तिला खचित आनंद होईल....

...एक्स्प्रेसखालीं बॉंब ठेवण्याइतकें धाडसाचें काम आपण केलेलें पाहून...

ज्यूली येणार आणि आपल्याविषयींचे तिचे गैरसमज दूर होऊन ती परत पूर्वीप्रमाणेंच आपणावर प्रेम करूं लागणार, ह्या विचारानें ज्यूल्सला इतका आनंद झाला होता, कीं त्या भरांत नुकत्याच केलेल्या कृत्याचे परिणाम तो पार विसरून गेला होता. पण आतां एक्स्प्रेसची आठवण होतांच त्याची त्याला एकदम भयंकर जाणीव झाली.

आपण एक्स्प्रेसच्या वाटेवर बॉंब ठेवला आहे. अति भयंकर आहे तो बॉंब! त्याचा स्फोट झाल्यावर गाडींतील एकहि मनुष्य जिवानिशीं सुटणार नाहीं.

आणि आपली ज्यूली त्याच एक्स्प्रेसनें येणार आहे!......

तिनें तयार केलेला बॉंब तिचाच बळी घेणार!......

तिचा प्रियकरच तिचा खुनी ठरणार !......

एक्स्प्रेस येण्याला आतां पांचदहा मिनिटांचाच अवधि राहिलेला आहे. ज्यूलीला वांचविण्यासाठीं आपण आतां कांहींहि करूं शकत नाहीं... !

मघां आपण म्हणालों होतों, देशाच्या स्वातंत्र्यासाठीं आपल्या थोड्या देशबांधवांचा बळी द्यावा लागतो आहे, त्याला नाईलाज आहे. पण त्यासाठीं आपल्या ज्यूलीचाच बळी...कशी वांचवणार आपण तिला ?...

त्याचें डोकें गरगर फिरूं लागलें, त्याच्या डोळ्यांपुढें अंधारी आली. एका खुर्चीत तो मटकन् बसला !

"आली, एक्स्प्रेस आली !" आनंदाच्या स्वरांत खिडकीशीं उभा असलेला जीन ओरडला.

ज्यूल्स खुर्चीवरून धडपडत उठला. त्यानें जीनला बाजूला सारलें, आणि खिडकींतून त्यानें बाहेर पाहिलें.

बाहेर दाट अंधार माजला होता. आकाश काजळ ओकीत होतें. अंधाराच्या एका कोपऱ्यांतून एक्स्प्रेसच्या एन्जिनच्या सर्चलाइटचा तेजस्वी ठिपका क्षणाक्षणाला मोठा होत होता. वेगानें पळणाऱ्या गाडीचा खडखडाट हळूहळू स्पष्टतर होत होता. आपल्या हृदयांतील धडधडीचा तो प्रतिध्वनि आहे, असा ज्यूल्सला भास झाला. एन्जिननें एकदोनदां कर्कश शिट्या दिल्या. त्या एक्स्प्रेसकडे पाहून त्याला वाटलें, आपल्या ज्यूलीला वेड लागलें आहे, आणि केंस पिंजारून आनंदाच्या आरोळ्या ठोकीत ती डोंगराच्या एका कड्यावरून खालच्या खोलखोल अंधाऱ्या दरींत उडी घ्यावयास मोकाट धांवत सुटली आहे !......

गाडी झपाट्यानें आपला मृत्यूचा मार्ग पळत होती. आणखी दोनच सेकंद...मोठा स्फोट होईल...कानठाळ्या बसविणारा आवाज होईल... गाडी अंतराळांत फेकली जाईल...जिवंतपणानें रसरसलेलीं शरीरें छिन्नविछिन्न होतील...आपली ज्यूली...बिचारीला कल्पनाहि नसेल !....

त्यानें आपले डोळे हातांनीं घट्ट झांकून घेतले आणि जमिनीवर पडतां पडतां तो ओरडला, " ज्यूली !"

थोड्या वेळानें ज्यूल्स अर्धवट शुद्धीवर आला. कोणातरी तरुणीच्या लुसलुशीत मांडीवर आपलें डोकें टेकलेलें आहे, आणि ती तरुणी आपला सुकुमार हात आपल्या तोंडावरून फिरवीत आहे, असा त्याला भास झाला. तो स्पर्श त्याला अगदीं ज्यूलीच्या स्पर्शासारखा वाटला. त्यानें आपले डोळे किंचित् किलकिले करून पाहिलें. त्याचा आपल्या डोळ्यांवर विश्वास बसेना. ती तरुणी ज्यूलीच होती !

त्यानें आपले डोळे परत मिटून घेतले. त्याला वाटलें, आपण स्वप्नांत तर नाहीं ? कीं मघां आपण रेल्वेलाइनवर बॉंब ठेवला, तेंच स्वप्न होतें ? नाहीं तर असें तर नसेल ना, कीं आपणहि मेलों आहोंत, आणि अपघातांत मेलेल्या ज्यूलीशीं आपली स्वर्गात भेट होत आहे ? त्या भयंकर बॉंबचा स्फोट झाल्यावर ज्यूली जिवंत राहणेंच शक्य नाहीं, अशी त्याची खात्री होती. मग हा काय प्रकार आहे ? आपलें डोकें मांडीवर घेऊन बसलेली ज्यूलीच कीं तिचें भूत ? त्याला कांहींच समजेना.

"ज्यूल्स, ऊठ माझा ज्यूल्स !" ज्यूली कातर आवाजांत बोलत होती. तिच्या स्वरातील दुःख आणि प्रेम त्याला जाणवलें, आणि त्याच्या शरीरांतून सुखाची एक गोड शिरशिरी निघून गेली. तिचा तो कातर आवाज त्याला संगीताहून मधुर वाटला. त्याला वाटलें, काळाच्या अंतापर्यंत जर ज्यूलीच्या मांडीवर असेंच पडून राहावयास आणि तिच्याकडून कुरवाळून घ्यावयास मिळालें, तर काय मजा होईल !

"ऊठ ! ज्यूल्स," ज्यूली म्हणत होती, "मीं तुझा मोठाच अपराध केला आहे. पण आतां मला किती वाईट वाटतंय् म्हणून सांगू ! माझा ज्यूल्स देशद्रोही असणंच शक्य नाहीं. कसा मीं त्या कल्पनेवर विश्वास ठेवला, देव जाणे ! पण आतां मात्र तुझ्या देशभक्तीविषयीं मला कांहीं संशय राहिलेला नाहीं. तूं क्रांतिकारकांच्या संघटनेंत शिरला आहेस—हें कळलं मला लॉरीकडून आतांच..."

ज्यूली भरभरतच होती. बाहेरच्या कठड्यावर रेलून त्याचे तिघे मित्र आपसांत कांहीं तरी कुजबुजत होते. हळूंहळूं ज्यूल्स चांगलाच शुद्धीवर आला. आपण स्वप्नांतहि नाहीं कीं स्वर्गातहि नाहीं, आणि आपणाला मांडीवर घेऊन

बसलेली ज्यूलीच, खरोखरीची आपली पूर्वीची ज्यूली आहे, अशी त्याची हळूंहळूं खात्री पटली. त्यानें आपले डोळे चोळले आणि कोपराच्या आधारानें तो उठून बसला; त्यानें एकदां ज्यूलीकडे डोळे भरून पाहून घेतलें, आणि तिला विचारलें " ज्यूली, खरंच का तूं माझी आहेस ? "

ज्यूली कांहींच बोलली नाहीं. ती फक्त लाजली आणि दुसरीकडे पाहूं लागली.

ज्यूल्सनें तिला आपल्या हृदयाशीं घट्ट धरलें. थोडा वेळ तिच्याकडे तो आश्चर्ययुक्त नजरेनें पाहात राहिला. आपण जें सुख उपभोगीत आहोंत, तें खरोखरींच आपल्या वांट्याला आलेलें आहे किंवा काय, ह्याविषयीं त्याच्या मनांत पुन्हां एकदां शंका निर्माण झाली. केवढा भयंकर बॉंब त्यानें रुळावर ठेवला होता ! गाडीला केवढा मोठा अपघात व्हायला पाहिजे होता ! त्यांतून एकहि माणूस जिवंत राहणें शक्य नव्हतें; पण मग ज्यूली कशी आपणांसमोर बसलेली आहे ? ती चांगली धडधाकट जिवंत तर आहेच; पण तिला कुठें खरचटलेंसुद्धा नाहीं ! एवढ्या मोठ्या अपघातांत सांपडलेली असूनसुद्धां ती घाबरलेली नाहीं, कीं त्याविषयीं एक चकार शब्दसुद्धां बोलत नाहीं ! मग काय, तो अपघात झालाच नसेल ? छे; तें कसें शक्य आहे ? तो केवढा भयंकर बॉंब...त्याला कांहींच उलगडा होईना. अखेरीला न राहवून त्यानें प्रश्न केला, " ज्यूली, तूं अजून जिवंत कशी ? "

" खरंच ! मी अजून जिवंत कशी हें एक आश्चर्यच आहे ! " ज्यूल्सकडे आश्चर्यानें पाहात ज्यूलीनें उत्तर दिलें. आपण इतक्या गुप्तपणानें काम करीत असूनहि त्याचा ज्यूल्सला कसा सुगावा लागला, ह्याचें तिला आश्चर्य वाटत होतें. " आतांपर्यंत त्या नरराक्षसांच्या बंदुकीच्या गोळयांनीं आमच्या हृदयाचा ठाव कसा घेतला नाहीं, नवलच आहे...... " !

ज्यूल्सनें विचारलें होतें एक, आणि ज्यूली सांगत होती दुसरेंच. तिच्या त्या बोलण्यामुळें ज्यूल्स आणखी घोटाळ्यांत मात्र पडला. तिच्या बोलण्याचा कांहींच अर्थबोध न होऊन त्यानें विचारलें, " नरराक्षसांच्या बंदुकीच्या गोळ्या ? – "

" हो!" नंतर ती आजूबाजूला पाहून आणि त्याच्या कानाशीं आपलें तोंड नेऊन अगदीं कुजबुजण्याच्या स्वरांत म्हणाली, " अरे, आमच्या कारखान्यांतील आम्हीं कामगार स्त्रिया सॅबोटेज करतों ना? ... इंग्लंडवर विमनांतून टाकलेले कांहीं बाॅंब फुटत कां नाहींत ह्याचं जर्मन वैमानिकांना आश्चर्य वाटत असेल; पण त्याचं कारण त्यांच्या लक्षांत आलं कीं दुसऱ्याच क्षणीं जर्मन्स आम्हांला गोळ्या घालतील...... " नंतर आपले सुंदर डोळे अर्धवट मिटून घेऊन ती म्हणाली, " पण आतां मला मरण आलं तरी पर्वा नाहीं. गोळी घालणाऱ्या जर्मन शिपायाच्या बंदुकीसमोर मी मोठ्या आनंदानं हंसत हंसत उभी राहीन. माझा ज्यूल्स आता मला मिळाला ना! ... "

" काय सॅबोटेज् करतां तुम्हीं?" ज्यूल्सनें मध्येंच विचारलें.

किंचित् हंसून ज्यूली म्हणाली, " अरे, आमच्या कारखान्यांत तयार होणाऱ्या बाॅंब्समध्यें आम्हीं दारूऐवजीं रेती भरून ठेवतों ना? ... "

ज्यूल्स डोळे विस्फारून तिच्याकडे पाहातच राहिला!

# भुताटकी : :

कांही कारण नसतां एकदम सोसाट्याचा वारा सुटला, खिडक्यांचीं दारें धडाधड आपटलीं गेलीं आणि वसंताच्या खोलींतला दिवा एकदोनदा लहान-मोठा होऊन विझून गेला. त्याच्या मागोमाग जमिनीवरून ट्रंक सरपटत ओढल्याचा आवाज झाला. मग कोणीतरी सुटण्यासाठीं धडपडावें तसा आवाज आला; आणि हा काय प्रकार घडतो आहे हें लक्षांत येण्यापूर्वीच वसंताची भेदरलेल्या आवाजांतली किंकाळी ऐकूं आली—

" भूत ! भू...भू...तानं...प...पकडलं...! "

क्षणा दोन क्षणांतच वसंता जमिनीवर धाड्कन् कोसळून पडल्याचा आवाज आला, आणि नंतर सर्वत्र एकदम सामसूम झालें ?

अंगावरून ओढून घेतलेलें पांघरूण घाईघाईने बाजूस फेकून देऊन वसंताच्या खोलीकडे मी धाव घेतली. त्याची ती आरोळी ऐकून शिवाहि दरवाजाशीं येऊन ऊभा होता. वसंताच्या खोलींत गडद अंधार होता आणि खोलींतून कुबट वास येत होता.

माझ्या हातांतल्या विजेच्या बत्तीच्या प्रकाशाचा झोत मीं खोलींतून फिरवला. त्याबरोबर खोलींतलें जें दृश्य माझ्या दृष्टीस पडलें त्यामुळें मला वसंताची कीव आली आणि मनाला थोडीशी भीतीहि वाटली.

खोलीच्या मध्यभागीं वसंता बेशुद्ध होऊन पडला होता. ट्रंकेंतून नुकताच काढलेला स्वेटर त्याने हातांत धरलेला होता. त्याचे कपडे अस्ताव्यस्त होते. त्याचें सर्वांग कांपत होतें. मधूनमधून तो कण्हत होता. त्याच्या तोंडांतून फेस बाहेर पडत होता. त्याचा श्वासोच्छ्वास इतक्या जोराने चालला होता, की मध्यरात्रींच्या त्या शांत वेळीं तेवढ्या दुरुनसुद्धा तो कानांना अगदी स्पष्ट ऐकूं येत होता. त्याच्या कपड्यांची ट्रंक नेहमीच्या जागेपासून बरीच पुढे सरकलेली दिसून येत होती.

मी हें निरीक्षण करतों आहे; तों शिवानें एक काडी पेटवून खोलीतला दिवा शिलगावला होता. मघाचा तो सोसाट्याचा वारा जसा एकाएकी आला होता तसाच तो आतां एकाएकी बंदहि पडला होता. सर्वत्र अगदीं शांत होतें, पण त्या शांततेंत एक प्रकारची विचित्र भयानकता वास करीत होती. जोरजोरानें चाललेल्या वसंताच्या श्वासोच्छ्वासानें आणि कण्हण्यानेंच त्या शांततेचा काय भंग होई तेवढाच.

शिवाने दिवा पेटवतांच आम्हीं दोघे वसंताजवळ धांवतच गेलो. आम्हीं त्याला अलगद उचलून घेतलें आणि बाहेरच्या पडवींतलि एका खाटेवर त्याला आणून निजविलें.

दूरवरून भरती आलेल्या समुद्राच्या लाटांचा अस्पष्टसा ध्वनि कानांवर येऊन पडत होता. थोड्याच वेळांत कचेरींत बाराचे ठोके पडलेले ऐकूं आले.

झाल्या प्रकारानंतर मला चांगलीशी झोप लागणें शक्यच नव्हतें. माझ्या डोक्यांत विचारांचें काहूर उठलें होतें. हें घर भुतांनीं पछाडलेलें आहे, ह्या लोकांच्या म्हणण्यांत खरोखरीच कांहीं तथ्यांश आहे काय ? नाहीतर मग ह्या नुकत्याच घडलेल्या प्रकाराचा अर्थ तरी काय ?

वसंता माझा चुलतभाऊ. तो नुकताच एका मोठ्या दुखण्यांतून उठला होता. हवाफेरासाठीं म्हणून तो आणि त्याला सोबत म्हणून मी असे आम्हीं दोघे कारवारजवळच्या एका खेडेगांवाला जाऊन राहिलो होतो. आम्हांला तेथे जाऊन आठएक दिवसच झाले होते. आणि तेवढ्या अवधींतच भुताटकीचा हा अनुभव आम्हांला आला होता.

आम्ही ज्या घरांत राहावयास आलों होतों, तें घर माझ्या एका दूरच्या मामाचें होतें. घर खूप ऐसपैस होतें आणि बरेंचसें जुनाट होतें. आज बरींच वर्षे तिथे कोणाचीहि वस्ती नव्हती. समोर एक मोठा बाग होता आणि त्यांत आंब्याचीं, फणसाचीं, नारळीचीं वगैरे मोठमोठीं झाडें होतीं. फुलझाडें आणि वेली तर किती होत्या यांची गणतीच नव्हती. आम्हांला तें स्थळ तर अतिशयच आवडलें. खावें, प्यावें, भटकावें, झोपा काढाव्या किंवा कांहींतरी वाचत पडावें. मजा होती आमची. वसंताला तर हा कार्यक्रम फारच मानवला होता. त्याच्याकडे रोज पाहाणाऱ्याला वाटलें असतें, कीं रोज त्याचें वजन एक पौंड तरी वाढत असावें. त्याच्यामध्यें कवीचाही थोडासा 'जंतु' होता. तिथल्या त्या मनोहारी निसर्गाच्या वर्णनपर 'प' ला 'प' आणि 'ट' ला 'ट' करण्यांतहि त्याचा बराच वेळ निघून जाई. तो वरचेवर म्हणे, "ह्या निसर्गरम्य ठिकाणीं जर मला जन्मभर राहायला मिळालं तर काय मजा होईल !"

"मग राहा की ! मामा तुला खुषीनं परवानगी देतील. भाडंसुद्धां मागणार नाहींत तुझ्याकडून. नुसती घराची आणि बागेची व्यवस्था पाहिली की झालं काम." मी म्हणे.

"आपली तयारी आहे." वसंता म्हणे, "काय मजा आहे अिथं. आंबे खाऊन कंटाळा आला की फणसाचे गरे खावेत. त्यांचाहि कंटाळा आला कीं जांभळं खावींत. जांभळं नको असलीं तर शहाळीं, ताडगोळे, फोंग... आणि मधूनमधून कवितेची एखादी ओळ जुळवावी.... निर्झर वाहे झुळूझुळू..."

"आणि तीं भुतं ?"

"छट्, कसचीं भुतं नी कसचं काय !" वसंता नंतर भुतांची टिंगल करूं लागे.

आम्हीं त्या घरांत राहायला जाऊन दोनतीन दिवस झाले असतील. एके दिवशीं सकाळींच पंचा नेसलेला, आखुड सदरा घातलेला, पाठीमागें भली लांबसडक शेंडी सोडलेला आणि पायांत जाडजाड कोकणी वाहाणा घातलेला एक टुणटुणीत म्हातारा बागेच्या कुंपणांतल्या आकाड्यांतून आंत शिरतांना आम्हांला दिसला. नंतर आम्हांला समजून आलें, कीं आमुच्या शेजारच्या वाड्यांत राहणारे ते पुतशेणै म्हणून.

" कोण रे तुम्हीं ? " त्यांनीं प्रश्न केला.

" मी मंगेशरावांचा भाचा. आणि हा माझा चुलतभाऊ." मी म्हटलें.

" कोण मंगेश ? 'फाफ' मंगेश की 'टाइम्स' मंगेश ? "

" टाइम्स मंगेश. "

कारवारच्या बाजूला 'मंगेश' ह्या नांवाचीं माणसं बरींच असतात. त्यांच्यांत नामसादृश्यामुळें घोटाळा होऊं नये म्हणून प्रत्येकाला त्यांच्यातल्या कांहीतरी वैशिष्ट्याचे निदर्शक असें उपपद लावण्याची तिकडे पद्धत आहे. माझ्या मामांचे नांव ' मंगेशराव नाडकर्णी ' असलें, तरी सर्व कारवारांत ' टाइम्स मंगेश ' ह्या नांवानेंच ते ओळखले जात. याचा अर्थ असा, कीं ते ' टाइम्स ऑफ इंडिया'त कामाला होते.

" किती दिवस राहणार ? " त्यांनी कोंकणी हेल काढून विचारलें.

" राहूं दोनतीन महिने."

" मग ह्या पौर्णिमेला आहांत तर तुम्हीं ह्या घरांत ? आणखी पांच दिवसांनीं पौर्णिमा ! " असें म्हणून अशा कांहीं विचित्र नजरेने त्यांनीं आमच्याकडे पाहिलें, कीं आम्हीं घोटाळयांतच पडलों !

त्यांच्या ह्या बोलण्याचा कांहींच अर्थ न कळल्यामुळं मीं आणि वसंताने एकमेकांकडे प्रश्नार्थक दृष्टीने पाहिलें.

" हं..." नंतर थोडीं अवातर प्रश्नोत्तरें झाल्यावर पुतशेणैनी विचारलें, " किती दिवस झाले तुम्हांला इथं येऊन ? "

" दोनतीन दिवस झाले. "

" म्हणजे गेल्या अमावास्येला नव्हतां तर तुम्हीं इथं ! आज दशमी. " बोटें मोजीत पुतशेणै म्हणाले, हिशोब करून झाल्यावर त्यांनीं विचारलं, " कसं काय आवडलं घर तुम्हांला ? "

" वा ! छान आहे की. "

" हं. " त्यांनीं ' हुं ' कार दिला खरा, पण त्यांतून असा अर्थ प्रतीत होत होता, कीं ' तुम्हांला घर आवडलं आहे खरं...पण समजलेच तुम्हांला लवकर...'

पुतशेणैच्या बोलण्याने आम्ही थोडा वेळ घोटाळयांत पडलों असलों तरी आम्हीं त्याला फारसें महत्त्व दिलें नसतें आणि तें विसरूनहि गेलों असतों.

परंतु नंतर आम्हांला गावांतले जे जे कोणी वाणी, धोबी, होडीवाले, भाजीवाले भेटत, तें "आम्ही 'टाईम्स मंगेश'च्या घरांत राहतों" असें सांगितलें की आश्चर्य व्यक्त करीत आणि अशा कांहीं विचित्र नजरेने पाहात, कीं आम्हांला कसेंसेंच वाटे. पहिल्यापहिल्याने लोकांच्या ह्या वागणुकीचा अर्थ आमच्या लक्षांत येत नसे. पण नंतर लवकरच आम्हांला कळून चुकलें, की आम्ही राहात होतों तें माझ्या मामाचें घर भुताने पछाडलेलें आहे, आणि दर अमावास्या-पौर्णिमेला तिथें भुतें जमतात असा समज सर्व गांवात प्रचलित आहे. 'त्या भुतांच्या तडाख्यांत तुम्ही सांपडलेले आहांत, ईश्वर तुमचं भलं करो !' असा अर्थ पुतशेंणेपासून तों इतर सर्व सटरफटर लोकांच्या त्या विशिष्ट दृष्टींत होता, हें आम्हांला लवकरच समजून आलें.

अर्थात् भुताखेतांसारख्या खुळचट कल्पनांवर आमचा विश्वास असणें शक्यच नव्हतें. आम्ही आपसांत लोकांच्या अडाणी समजुतींवर जोरदार टीका करून त्यांची टिंगल उडवीत असूं.

**माणूस** कितीहि खंबीर मनाचा असला तरी कांहीकांही वेळां प्रसंगच असा येतो, कीं त्या वेळीं त्याच्या इच्छेविरुद्ध त्याच्या मनाची चलबिचल होते. तसेंच आमचें त्या दिवशीं पौर्णिमेच्या रात्री झालें.

रात्रीचें जेवण वगैरे आटोपून आम्ही फिरावयास बाहेर पडलों. आमच्या घरापुढें लांबच लांब भाताचीं पांढऱ्या मातीचीं शेतें पसरलेलीं होतीं. त्यांत थोड्याशा अंतरावर एक लहानशी टेकडी होती. तिच्यावर आम्ही जाऊन बसलों. चांदणें कसें पिठासारखें स्वच्छ पडलें होतें. कितीतरी लांबवरचें अगदीं स्पष्ट दिसे. जणू काय सर्व सृष्टीवर एखादा झिरझिरीत रुपेरी पडदाच सोडलेला होता. सर्वत्र अगदी शांत आणि निश्चल होतें. नाही म्हणायला चंद्रासमोर पांढुरके ढग आले की तेवढयापुरता चंद्र पळत चालल्याचा भास होई. तेवढीच काय ती त्या सर्व दृश्यांत हालचाल होती. दूरवरून चंद्रदर्शनाने भरती आलेल्या सागराचें घोंघावणें अस्पष्टसें कानांवर येऊन पडत होतें. मध्येच एखाद्या वटवाघुळाच्या पंखांची फडफड ऐकूं येई ! जणू सर्व जीवसृष्टि ह्या विश्वाचा

सारा कारभार अमानुष शक्तींच्या ताब्यांत सोपवून देऊन गाढ झोपीं गेली होती. आमच्या डाव्या बाजूला थोड्याशा अंतरावर दाट झाडी होती. तिच्या गर्द अंधारांत मधूनमधून काजवे चमचमत. काय असेल तें असो, पण त्या झाडीकडे सारखें पाहात राहावेंसें वाटे; आणि– तुम्ही ह्या कल्पनेला वेडगळ म्हणाल– राहूनराहून मनांत कल्पना येई, की त्या झाडींत कोणीतरी भूत-पिशाच्चें मशाली घेऊन तांडवनृत्य करीत असावींत ! दूरवरून कुठून तरी त्यांना साथ देणाऱ्या ढोलक्यांचा आवाजहि ऐकूं आल्यासारखा भास होई.

आम्हीं दोघेंहि स्वस्थ बसलों होतों. कांहीं बोलून सृष्टीच्या त्या भयाण-सुंदर शांततेचा भंग करावा असें आम्हांला वाटत नव्हतें. मीं वसंताकडे पाहिलें. तोहि किंचित् भ्यालेल्या नजरेनें त्या दृश्यांचें अनिमिष प्राशन करीत होता. त्याच्याहि मनाची चलबिचल चालली असली पाहिजे हे त्याच्या चर्येवरून उघड दिसून येत होतें. आणि तो होताहि माझ्यापेक्षां फारच भावनाशील.

आम्ही असेच किती वेळ बसलों असतों कुणास ठाऊक ! पण आमच्या त्या शांततेचा वसंतानें भंग केला. दूरवर बोट दाखवून तो किंचित् दबलेल्या आवाजांत म्हणाला, " अरे, तें बघ, काय येतंय् तें ! " त्यानें बोट केलेल्या दिशेकडे मी पाहिलें. दृष्टीच्या अगदीं शेवटच्या टप्प्याला कांहींतरी पांढरें हालल्यासारखें दिसत होतें. तें जें दिसत होतें, तें मध्येंच चांदण्यांत विलीन होऊन गुप्त झाल्याचाहि भास होई. मलाहि तें काय असावें हें समजून येईना. पण मग हळूहळू त्या पांढऱ्याला आकार येऊं लागला आणि जसजसें तें आमच्याजवळ येऊं लागलें तसतसें तें मोठें होत जाऊन मनुष्याकृति धारण करूं लागलें. लवकरच ती आकृति आमच्या अगदीं जवळ आली, तिच्या पायातल्या वाहणांचा कर्रकर्र आवाज आमच्या कानांवर आदळूं लागला, आणि आम्हीं ओळखलें की हे तर आमचे शेजारी पुतशेणे !

गंभीर प्रसंगाला मिळालेल्या ह्या विनोदी कलाटणीने मी आणि वसंत एकमेकांकडे पाहून हसलों.

" कां ? हंसलांतसे ? पुतशेणेंनी विचारलें.

" हं. दुरून तुम्हाला येतांना पाहून आम्हांला वाटलं, कोणी भूतच येतं आहे ! " मी म्हणालों, आणि आम्ही तिघेंहि हसलों.

"पण तुमचा तर भुतांवर विश्वास नाही ना?" पुतशेणैनी जरा खोचूनच प्रश्न केला.

आम्हीं कांहीच उत्तर दिलें नाहीं.

"पण सांभाळा हो! हें कोकण आहे. इथं भुतं फार असतात." सावधगिरीच्या स्वरांत पुतशेणै म्हणाले.

"आता दिसलंच की आम्हांला एक!" मीं म्हटलें, "बरं, का हो पुतशेणै, ह्या कोकणांत तुम्ही पन्नासएक वर्षं तरी काढलीं आहेत; पण त्या अवधींत तुम्हाला किती भुतं दिसलीं?"

"एकसुद्धां नाहीं. अहो विषाची परीक्षा घेतोय् कोण? भुतं असतील त्या ठिकाणीं आम्हीं जातोंच कशाला? आम्हीं तुमच्यासारखे सुशिक्षित थोडेंच आहोंत? आम्ही आपलीं देवभीरु खेडवळ माणसं!" त्यांच्या आवाजांत थोडासा कडवटपणा होता. नंतर तो कडवटपणा घालवण्यासाठीं हास्य निर्माण करण्याच्या उद्देशानें पुतशेणै म्हणाले, "तुम्हाला मराठींतलीं म्हण माहीत आहे ना? असतील शितं तर जमतील भुतं! आम्हीं कोकणांत भाताला 'शितं' म्हणतो, आणि कोकणात भात तर खूप पिकतो. ह्यॅ: ह्यॅ:!"

आम्हींहि त्याच्याबरोबर थोडेसें हसलों आणि मी हसतां हसतां म्हणालों, "असलीं तर असलीं भुतं. तीं आम्हाला काय करणार? आणि जर कांहीं त्रास देऊंच लागलीं तर 'राम राम' म्हटलं कीं पळून जातील. त्यानंहि नाहीं काम भागलं तर जानव्याची ब्रह्मगाठ भुताला दाखवली म्हणजे झालं!"

येवढें बोलून मीं वसंताकडे एक कटाक्ष टाकला. जानव्याचा उल्लेख त्याला उद्देशून होता. अलीकडेच त्यानें जानवें घालण्यास सुरवात केली होती. तो म्हणे, "छट्, भुतांच्या भीतीनं नाहीं मी वापरत जानवं. किल्ल्या ठेवायला उपयोगीं पडतं तें चांगलं."

थोड्या वेळानें आम्ही तिघेहि घराकडे जावयास निघालों. जातांजातां थोड्याशा कळवळ्यानें पुतशेणै म्हणाले, "तुम्हीं मोठे शिकलेले असाल; पण माझं अडाण्याचं थोडंसं ऐका. तुम्हीं राहता त्या घरांत आज रात्रीं भुतं येतील. तुमचा विश्वास असो अगर नसो, तुम्हीं आजच्या रात्रीं तिथं राहूं नका. पाहिजे तर माझ्या घरीं निजायला या."

नेहमीप्रमाणें जरी आम्ही भुतांच्या कल्पनेची टिंगल केली नाही, तरी त्यांचें आमत्रंण मात्र आम्हीं साभार नाकारलें.

परंतु झाला एवढा प्रकार आमच्या मनाची चलबिचल करावयास पुरेसा होता. घरीं आल्यावर वसंता म्हणाला, "मीहि आज बाहेरच्या पडवींतच झोपतों रे."

तो दुखण्यांतून नुकताच उठलेला असल्यामुळें वाऱ्याच्या भीतीने आंतल्या खोलींत झोपत असे. मींहि त्याला कारण वगैरे विचारण्याच्या भानगडींत न पडतां रुकार दिला. आणि म्हटलें, "बरं तर. तुझा स्वेटर घेऊन ये. झोपतांना अंगांत कांहीं गरम असलेलं बरं."

आणि स्वेटर आणण्यासाठी म्हणून तो आंतल्या खोलींत गेला होता, तेव्हाच प्रारंभीं वर्णन केलेला भयानक प्रसंग घडून आला होता.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं झुंजूमुंजू दिसण्याच्या सुमारासच मी उठून बाहेर आलों. घरासमोरच असलेल्या पारिजातकाच्या झाडानें लाललाल देठ असलेल्या आपल्या पाढऱ्याशुभ्र फुलाचा अंगणात सडा घातला होता. जिकडेतिकडे हिरवीगार झाडी दिसत होती, आणि हवेत एक प्रकारचा अंगाला झोंबणारा गारवा होता. नारळींचीं झाडें आपल्या लांबलाब माना एखाद्या खुषमस्कऱ्याप्रमाणें वारा येईल त्याप्रमाणें डोलवीत होतीं. उथळ विहीरींतून बांबूच्या टोकाला बाधलेल्या पोहऱ्यानें बागेचा माळी पाणी काढीत होता. लहानलहान नाल्यातून वाहणाऱ्या त्या पाण्याचा कानांना सुखविणारा खळखळ आवाज होत होता. झोंपेंतून नुकतेच उठूं लागलेले पक्षी किलबिलू लागले होते. वातावरणांत निरनिराळ्या फुलांचा मंदमधुर सौरभ भरून राहिला होता. आणि ह्या देखाव्याच्या पार्श्वभूमीवर माझ्या मामांचें तें जुनाट घर एखाद्या तपस्वाप्रमाणें शांत व निश्चल बसलेलें दिसत होतें.

मीं थोडा वेळ ह्या दृश्याकडे पाहिलें आणि माझ्या मनांत विचार आला, "काय ? ह्या अशा नितांतसुंदर ठिकाणीं भुतं राहतील ? शक्य नाहीं ! इथं देवताच वास करतील !"

वसंता बराच उशीरा उठला. भीतीनें त्याचा चेहरा काळवंडून गेला होता. त्याच्याकडे मला पाहवेना. रात्रींच्या प्रकाराचा विषयहि मी होतां होईतों टाळीत होतों. चहा पिऊन झाल्यावर दोन खुर्च्या टाकून आम्ही बागेंत बसलों. थोडा वेळ स्वस्थ बसून, भरून आलेले ढग एकदम कोसळावेत तसें आपल्या मनांतले विचार अधिक काळ दाबून ठेवूं न शकल्यामुळें वसंता एकदम म्हणाला, "आपण हें घर सोडून दुसरीकडे जाऊंया. इथं भूतं आहेत !"

"अरे, असा भितोस काय ? रात्रीं तुला कांहींतरी भास झाला असेल !"

"भास कसला ? मला भुतानं घडधडीत पकडून ठेवलेलं आठवतं. मी ट्रंकेतून स्वेटर काढून घेतला तोंच दिवा मालवला गेला ! मी ट्रंक बंद करून बाहेर येऊं लागलों तों अंधारात भुतानं मला एकदम पकडून ठेवलं."

"कसं पकडलं ?"

"तेंच तर सांगतां येत नाहीं. पण मला जागचं हालतां येईना हें खरं. एखादी बारीकशी दोरी छातीला बांधून त्यानं मला ओढावं तसं कांहींतरी विचित्र मला वाटलं. तें भूतच होतं ह्याबद्दल मला मुळींच शंका नाहीं. हें घर सोडलंच पाहिजे आपल्याला. नाहींतर माझी प्रकृति सुधारायच्या ऐवजी बिघडेल मात्र !"

"बरं, तें असूं दे. आधी तूं आंघोळ करून घे पाहूं. म्हणजे तुला हुषारी वाटेल. पाणी तापलेलं आहे."

त्यालाहि ही कल्पना पटली आणि त्यानें आपला शर्ट काढला. पण लगेच आपला डावा खांदा चाचपून तो एकदम उद्गारला," अरे, पण " माझं जानवं कुठं गेलं ?"

"खरंच कीं !" त्याच्या छातीकडे पाहून मी म्हणालो. थोडेंसें शोधून पाहतांच त्यानें नुकत्याच काढून ठेवलेल्या शर्टाजवळच त्याच्या तुटलेल्या जानव्याचा एक तुकडा पडलेला मला दिसला.

"अरे, हें बघ तुझं जानवं. शर्टाबरोबर निघून आलेलं दिसतंय्."

"अरे हो !" जरासा खजील होऊन वसंत म्हणाला. नंतर तें जानवें उचलून घेऊन तो म्हणाला, "पण हें तुटलं कसं ? आणि ह्याला बांधलेल्या किल्ल्या ?"

"भुतानं नेल्या असतील!" मी थट्टेच्या स्वरांत म्हणालों.

"भलत्याच वेळीं थट्टा करूं नको हं." जास्तच रागावून तो म्हणाला.

त्याचें तें तुटलेलें जानवें पाहून रात्रीं सरकलेल्या ट्रंकेचा आवाज मला एकदम आठवला आणि माझ्या मनांत एक कल्पना लख्कन् चमकली. वसंताला घेऊन मी त्याच्या खोलींत गेलों.

"हें बघ तुला पकडणारं भूत!" ट्रंक दाखवीत मी वसंताला म्हटलें. ट्रंकेच्या कुलपांत किल्ल्या तशाच अडकलेल्या होत्या आणि त्या किल्ल्यांना एक लहानसा जानव्याचा तुकडाहि होता. "किती रे भित्रा तूं वसंता! पुतशेणेंच्या बोलण्यामुळं आणि रात्रीच्या भयाण वातावरणामुळं तुझ्या मनावर भीतीचा पगडा बसला होता. ट्रंकेचं कुलूप लावून झाल्यावर तूं उठूं लागलास. पण ट्रंकेच्या कुलपांत किल्ली पक्की अडकून बसली होती. तेवढ्यांत वाऱ्यानं दिवाहि गेला. अंधारांत तुला हें समजून आलं नाही. भुताचेच विचार डोक्यांत घोळत असल्यामुळं तुला वाटलं, कीं भुतानंच तुला पकडलं आहे! आणि मग भीतीनें ओरडून तूं बेशुद्ध पडलास!"

ट्रंकेच्या कुलपांतून किल्ली काढण्याचा मी प्रयत्न करीत होतों; पण ती इतकी पक्की अडकून बसली होती, की निघतां निघत नव्हती!

वसंताला रात्रीच्या प्रकाराचें मी केलेलें स्पष्टीकरण पटलें. तो विचार करीत उभा राहिला. इतक्यांत 'आकाड्या'वरून टुण्कन् उडी मारून आमचे शेजारी पुतशेणे घाईघाईने आमच्याकडे येतांना आम्हाला दिसले. आमच्यापाशी येतांच त्यांनीं विचारलें, "काय? कांहीं झालं का रात्रीं?" त्यांच्या आवाजांत मूर्तिमंत उत्सुकता होती.

"अंहं! कांहीसुद्धां झालं नाहीं." मी बेफिकिरीने उत्तर दिलें. "आम्हांला पाहून भुतं पळालीं वाटतं तुमचीं?"

"कांही झालं नाहीं?" माझ्या बोलण्याच्या खरेपणाविषयी त्यांना शंका वाटत असलेली दिसून येत होती. माझ्याविषयी उघडउघड अविश्वास व्यक्त करणाऱ्या आवाजांत त्यांनीं उद्गार काढला, "आश्चर्य आहे बुवा!"

# स्टॅनीटीचर ! : :

स्टॅनीटीचर !

स्टॅनीटीचर ही काय भानगड आहे, तुम्हाला माहीत आहे काय ? नाहीं ? पण आमच्या गांवी असा एक स्टॅनीटीचर आहे.

स्टॅनीटीचर म्हणजे काय, हें स्टॅनीटीचर होण्यापूर्वी थोडे दिवस शिवरामलाहि ठाऊक नव्हतं ! त्यापूर्वी तो शब्द त्यानं कुठं ऐकलाहि नव्हता, कीं तो शब्द अजूनपर्यंत त्याच्या कुठं वाचनांतहि आला नव्हता.

स्टॅनीटीचर ! पुण्याच्या एका साप्ताहिकांतील एका इंग्रजी जाहिरातींत शिवरामनं हा शब्द एके दिवशीं प्रथमच पाहिला, आणि किती तरी वेळ तो त्याच्याकडे कुतुहलपूर्वक पाहातच राहिला !

काय असेल ही भानगड ? स्टॅनी-टीचर. टीचर म्हणजे शिकवणारा--शिक्षक--मास्तर ! स्टॅनी शिकविणारा तो स्टॅनीटीचर ! पण स्टॅनी म्हणजे काय ?

त्यानं रक्त येईपर्यंत डोकं खाजवलं, पण स्टॅनीचा अर्थ कांहीं त्याच्या लक्षांत येईना !

स्टॅनी हें कुठलं शास्त्र आहे, कीं लॅटिन, संस्कृत पाली यांच्याप्रमाणं एकादी मृत भाषा आहे ? कीं मिल्समध्यें डाइंग किंवा विव्हिंग मास्टर असतात, त्यांतला कांहीं हा प्रकार आहे ? कीं स्टिनोग्राफरशीं त्याचं कांहीं नातं आहे ?

ज्या जाहिरातींत त्याला हा शब्द आढळला होता, ती 'पाहिजे' ह्या सदराखाली आलेली इंग्रजी जाहिरात त्यानं पुनः पुन्हां वाचून पाहिली. पण त्याच्या डोक्यात काहींच प्रकाश पडेना !

ती जाहिरात देणाऱ्या एका 'क्ष' व्यक्तीला पुण्यांत एक 'स्टॅनीटीचर' पाहिजे होता, अन् तो हिंदु असायला पाहिजे होता. त्याचं शिक्षण निदान मॅट्रिकपर्यंत तरी झालेलं असलं पाहिजे होतं. अशा स्टॅनीटीचरला महिना रु. ६० पगार मिळणार होता,--जाहिरातींतलि मजकुराचा हा सारा अर्थ आतापर्यंत त्याच्या डोक्यांत पक्का बसला होता. टाकावा का अर्ज ह्या नोकरीसाठीं?

त्या जाहिरातींत खणखणून बजावल्याप्रमाणं तो हिंदु होता; एवढंच नव्हे, तर तो ब्रह्मकुलोत्पन्न होता. आतां त्याच्या डोक्यावर शेंडी नव्हती, व त्याच्या गळ्यांत जानवंहि नव्हतं, ही गोष्ट खरी. पण ज्या अर्थी कुणा पाद्र्यानं त्याला अजून 'बाप्तिस्मा' दिलेला नव्हता, किंवा एखाद्या काजीनं त्याचा सुंता केलेला नव्हता, त्या अर्थी तो अजून हिंदूच होता, हें निर्विवाद. जाहिरातींतील अटीप्रमाणं तो नुकताच मॅट्रिक पास झाला होता. मॅट्रिकचा निकाल प्रसिद्ध झालेली, चार जूनच्या टाइम्सची पुरवणी ह्याला साक्षीदार होती. रु. ६० पगार-ह्या पगारावर नोकरी करावयास तो एका पायावर तयार होता. बाकीचं सर्व तर जुळलं ! नोकरीकरतां अधीर झालेलं त्याचं मन म्हणे, 'मग काय ? करून टाक अर्ज !'...

पण सगळंच मुसळ केरात ! स्टॅनी-स्टॅनी म्हणजे काय ? हें कळल्याशिवाय अर्ज कसला करणार डोंबलाचा !

स्टॅनी म्हणजे काय ?— स्वतःलाच शंभराव्यांदा विचारलेल्या ह्या अनुत्तरित प्रश्नानं तो स्वतःवरच चिडला.

स्टॅनी म्हणजे काय ? हें कुणाला विचारावं का ? माधव, गोविंद, रामू, वगैरे आपल्याच खोलींत राहणारे जे आपले मित्र आहेत, त्याना विचारलं तर ?

छे छे छे ! — भलतंच !

आपल्या प्रतिस्पर्ध्यांना आपण होऊन जागं करायचं ? चूड दाखवून वाघ घरांत आणायचा ? छे छे ! जें काय करायचं तें अगदीं गुप्तपणानं केलं पाहिजे ! आपल्या मित्रांना ह्याविषयींचा काहींहि सुगावा लागता मुळींच उपयोगाचं नाहीं !

पण मग स्टॅनी--स्टॅनी म्हणजे काय ?

मॅट्रिकच्या परीक्षेंत पास झाल्यावर आपल्या कांहीं मित्रांच्या भागीदारींत एक खोली घेऊन, शिवराम नोकरीच्या शोधार्थ मुंबईत मुक्काम ठोकून होता. त्या सर्वांचं ध्येय जरी एकादी पन्नाससाठ रुपयाची नोकरी पटकावणं हेंच असलं, तरी प्रत्येकाचे कारभार अत्यंत गुप्तपणानं चालत. युद्धकाळांतल्याप्रमाणं त्या काळीं नोकऱ्या स्वस्त नव्हत्या. पन्नाससाठाची एकादी नोकरी मिळवायची म्हणजे काय काय खटपटीलटपटी कराव्या लागत, कुणाकुणाचे वशिले लावावे लागत, कुणाला किती पैसा चारावा लागे, ह्याची कल्पना त्यावेळीं नोकरी मिळवण्याची ज्यांनीं खटपट केली असेल, त्यांनाच येईल.

सकाळचा सामायिक चहा झाला कीं कोपऱ्यावरील वर्तमानपत्रांच्या दुकानांत जाऊन ह्या कंपूंतील प्रत्येक जण मिळतील तेवढीं वर्तमानपत्रं विकत घेऊन येई; आणि लगेच 'पाहिजे !' ह्या सदराखालील जाहिरातींचा अभ्यास करण्यांत गर्क होऊन जाई. त्या वर्तमानपत्राच्या मुखपृष्ठावर कुणी महान् पुढारी जाड्या टाइपांत सत्याग्रहाची घोषणा करीत असो, कुणी हिटलर सारं जग युद्धाच्या खाईंत जाळून काढण्याची धमकी देत असो, भूकंपांत झालेला हाहाःकार त्याचं लक्ष आपणाकडे ओढून घेण्याची पराकाष्ठा करीत असो, नाहीं तर एकाद्या दुष्काळांतील बळी टाहो फोडीत असोत; एकाद्या स्थितप्रज्ञाप्रमाणं तिकडे दुर्लक्ष करून ते आपलं सरळ मुखपृष्ठ उलटीत, आणि त्याच्या पाठी-मागील पानावर छापलेल्या जाहिराती वाचण्यांत तल्लीन होऊन जात.

आज सात आठ महिने झाले, त्यांची ही नोकरी मिळवण्याची मोहीम चालली होती, पण अजून त्यांच्यापैकीं एकालाहि तींत यश आलं नव्हतं. प्रथम प्रथम फक्त दीड-दोनशें रुपये पगाराच्या नोकऱ्या मिळवण्याची त्याची खटपट असे, पण आतां हळूहळूं साठ रुपयापर्यंत त्यानीं आपला भाव उतरवीत आणला होता. त्या पांचांतील प्रत्येक जण एकाडा शिलेदार होता. जाहिरातींचा अभ्यास करून झाला कीं प्रत्येकजण आपणाला आकर्षक वाटतील अशा जागाकरतां अर्ज टाकी. त्यांचे इतरहि डावपेंच सुरू होत. पण सारा कारभार इतक्या गुप्तपणानं चाले कीं ह्या कानाची बातमी त्या कानाला नसे. कुणी कुठं अर्ज केला आहे, ह्याचा दुसऱ्याला पत्ता नसे. जर तसा कुणाला पत्ता लागलाच, तर असल्या भुक्कड नोकरीपासून अर्ज करणाऱ्याला परावृत्त करण्याचे सारेजण प्रयत्न करीत.

एकदां गोविंदानं एका मिलमध्यें पन्नास रुपये पगाराच्या एका नोकरी-करतां अर्ज केल्याची बातमी–कशी कोण जाणें–पण फुटली. त्याबरोबर सर्वांनीं त्याच्यावर एकच गहजब उडवून दिला.

"पन्नास रुपड्यांची नोकरी ! फूः !" रामू उद्गारला.

"आणि तीहि मिलमधली ? छट् !" माधव तिरस्कारला.

"आपण एवढे मॅट्रिक झालों तें काय असल्या नोकऱ्या करायला ? छ्यट् !"—दामू–मूर्तिमंत हेटाळणी !

"आपण उपाशी मरूं, पण असली हलकी नोकरी करणार नाहीं !"—शिवराम—साक्षात् तिरस्कार !

अखेरीला त्या नोकरीकरतां आपण खटपट करणार नाहीं अशी जेव्हां गोविंदाकडून साऱ्यांनीं कबुली घेतली, तेव्हांच कुठं बिचाऱ्याची सुटका झाली !

पण योगायोग मात्र असा विचित्र कीं, कुणी फोर्टमध्यें, कुणी क्रॉफर्ड मार्केटमध्यें, तर कुणी रॉयल एशियाटिक सोसायटीमध्यें, असे घरून निघालें असूनदेखील, साऱ्यांची गांठ मात्र पेरळला त्या मिलच्या ऑफिसमध्येंच पडली !

नोकरीकरतां त्या पांचांतील कोण काय करील ह्याचा नेम नव्हता. कार्डिनल वुल्स्लेचं अनुकरण करून आपणांला असंहि म्हणतां येईल कीं, नोकरी मिळविण्याकरतां त्यांनीं जितकी शक्ति, बुद्धि आणि उत्साह खर्च केला, जितक्या खटपटी लटपटी केल्या, तेवढ्या जर त्यांनीं स्वराज्यसंपादनार्थ केल्या असत्या, तर एव्हाना हिंदुस्थान खास स्वतंत्र झाला असता !

एकदां दुपारीं शिवराम एकटाच घरीं असतांना एक म्हातारबुवा रामूचा शोध घेत आले.

"रामराव आहेत का हो ?" म्हातारबुवांनीं विचारलं.

"नाहीं; बाहेर गेलेत ते. कां ? काय काम होतं ?" शिवरामनं विचारलं.

"काम म्हणजे—होतं थोडं काम ! त्याच्या वडलाचं मला पत्र आलंय्. त्यांची माझी लहानपणापासूनची मैत्री–शाळेंत मांडीला मांडी लावूनच शिकलों

म्हणा ना !" एवढं बोलतां बोलतां म्हातारबुवा एका खुर्चीवर स्थानापन्न झाले. शिवरामहि एका वळकटीचा कामचलाऊ लोड करून त्याला टेकून बसला. म्हातारबुवांनीं आपल्या डोक्याचा रुमाल जशाच्या तसा काढून घेतला, अन् ते आपल्या उपरण्यानं चमनगोट्यावरील घाम पुसून काढूं लागले. तो विधी संपल्यावर ते पुढं बोलूं लागले, "जरा भेटायचं होतं रामरावांना. पाहायचं होतं कसा काय आहे मुलगा !"

म्हताऱ्यानं रामूच्या वडलांशीं काढलेली लहानपणची ओळख, त्यांचं म्हाताऱ्याला आलेलं पत्र, म्हातारबुवांचा चिकटपणा, 'मुलगा' 'पाहणं' वगैरे शद्बप्रयोग, यावरून म्हातारबुवाना एकादी उपवर कन्या असावी, आणि ती रामूच्या गळ्यांत बांधण्याच्या उद्देशानं ते आले असावेत, हें शिवरामच्या लक्षांत यायला फारसा वेळ लागला नाहीं. रामूचं लग्न झालं तर बरंच झालं, नोकरीरुपी दमयंतीकरतां स्पर्धा करणारा एक नळ आयताच कमी झाला, असा चटकन् विचार करून, म्हातारबुवांजवळ रामूची बेफाट स्तुति करायची व रामूचं लग्न नक्कीच करून टाकायचं, असं त्यानं ठरवलं. तो म्हणाला, "काय पाहायचंय् मुलांत ? असा मुलगा हजारांत नाहीं मिळायचा !"

"असं ?"

"नाहीं तर काय ! दिसायला गोरागोमटा, रुबाबदार ! यंदाच मॅट्रिक झालाय्. घरचाहि सुखवस्तु–बाकी तें तुम्हांला ठाऊक आहेच म्हणा–तुमच्या स्थळाला अगदीं योग्य आहे रामराव !"

"स्थळाला ?" म्हातारबुवा जरा चमकले, पण लगेच थोडासा विचार करून ते म्हणाले, "हो, स्थळ म्हणजे जागाच ! आहे आपलं—स्थळ म्हणजे काहीं तसं मोठंसं नाहीं. पण करारपत्र करावं लागेल !"

"म्हणजे रजिष्टर लग्न करणार आहांत आपण ?" शिवराम म्हणाला, "तेंच बरं—"

शिवराम सर्व संभाषण लग्नाच्या परिभाषेंत करीत असलेला पाहून म्हाताऱ्यालाहि गंमत वाटली. त्याच्या विनोदी स्वभावाचं त्यांना कौतुक वाटलं, आणि ते म्हणाले, "म्हणजे जन्माची गांठ ! मग त्यानं परत कुणा दुसरीच्या नादी लागायला नको !"

म्हातारबुवांच्या व्यवहारी धोरणाचं शिवरामला पुष्कळच कौतुक वाटलं. त्यानं जरासा विचार करून विचारलं, "हुंडाबिंडा ?"

"हुंडा एकदम मिळणार नाहीं, पण महिना साठ रुपये सुरवातीला देऊं. दर तीन वर्षांनीं पांच रुपये वाढ—"

"वा ! हुंड्याची ही हप्तेबंदीची कल्पना छान आहे !"

"शिवाय प्रॉव्हिडंट फंडाचीहि योजना आहे."

"सुरेख ! मग आमचे रामराव मोठेच नशीबवान् म्हणायचे ! एखादी नोकरी मिळाल्यासारखंच झालं हें !...बरं, मुलगी कशी आहे ? कांहीं फोटोबिटो आणलाय् कां ?"

आतां मात्र म्हातारबुवांना शंका आली कीं शिवराम विनोद करीत नसून खरोखरीच लग्नाविषयीं बोलत असावा. त्यांनीं हंसून विचारलं, "अहो, म्हणजे तुम्ही काय मी मुलीच्या स्थळाविषयीं बोलतोंय्, असं समजतां कीं काय ?"

"हो !" गोंधळून शिवराम म्हणाला, "मुलीचं लग्न जमवण्यांकरतां आलांत् ना तुम्ही ?"

"छे हो ! साराच घोटाळा !" पोट धरून हसतां हसतां म्हातारबुवा म्हणाले, "अहो, आमची विमाकंपनी आहे पुण्याला. मी आहें एक डायरेक्टर. आमच्या कंपनीच्या इथल्या शाखेंत रामरावाना चिकटवून घेण्याच्या उद्देशानं आलोंय् !"

आपण ज्याला भिकारी समजत होतों, तो भिकारी नसून, भिकाऱ्याच्या वेषांतला हरून-अल्-रशीद आहे असं कळतांच दचकावं, तितका शिवराम दचकला. इतका वेळ म्हातारबुवाना तो एक यःकश्चित् वधूपिता समजत होता, आणि गादीला टेकून चांगला ऐसपैस हातपाय सोडून तो बसला होता. पण आतां म्हातारबुवा एका विमा कंपनीचे डायरेक्टर आहेत, आणि लोकांना नोकऱ्या देऊन त्यांना अन्नाला लावणं त्यांच्या हातांत आहे, हें कळून येतांच तो एकदम सांवरून बसला. चेहऱ्यावर नम्र भाव आणून आणि आपले हात जोडून तो अर्जीजीच्या स्वरात म्हणाला, "ओ ! माफ करा हं. पण माझा गैरसमज झाला...पण आपण मात्र गैरसमज करून घेऊं नका कृपा करून...थट्टा करण्याचा माझा मुळींच उद्देश नव्हता !..."

" चालायचंच, चालायचंच !" म्हातारबुवा त्याला धीर देत म्हणाले, " त्यांत काय एवढं मनाला लावून घेतां ?—मी आलों होतों तें रामराव नोकरीवर राहायला तयार आहे का व नोकरीला ते योग्य आहेत का हें पाहण्याकरतां."

" नोकरीला ? छट्—रामराव मुळींच योग्य नाहीं. म्हणजे तसा तो जावई व्हायला योग्य आहे, पण नोकरी करायला ? अं हं ! अगदीच युस्लेस् ! अहो, दिसायला गोरागोमटा असला म्हणून काय झालं ? नंबर एकचा आळशी ! मॅट्रिकच्या चार वाऱ्या केल्या तेव्हा कुठं गंगेत घोडं न्हालं ! दुपारचं जेवण झालं कीं लागलाच घोरायला ! हा काय काम करणार कपाळ !" शिवराम प्रसंगावधान राखून म्हणाला.

" पण आपलं मित्रकर्तव्य आहे." म्हातारबुवा म्हणाले शिकेल " हळूंहळूं काम करायला."

" अहो. कसचंन् काय ! आणि तो तुमची साठ रुपयांची नोकरी पत्करणार आहे ? अहो, त्याची उडी दोनशेच्या खालीं नाहीं."

" असं ? पण त्यांच्या वडलांनीं तर पत्रांत लिहिलंय् कीं साठ रुपयांची का होइना पण त्याला नोकरी द्या. कसं तरी चिकटवून घ्या म्हणजे झालं."

" त्याच्या वडलांनीं खूप लिहिलं असेल, पण हे राजेश्री तयार हवेत ना ? नुसता चहापाण्याचा नि सिनेमांचाच खर्च आहे साठ रुपये त्याचा. आणि कुठलीशी एक अडीचशाची नोकरीहि जवळ जवळ नक्की ठरली आहे, म्हणून सांगत होता तो कालच. तिकडेच गेलाय् तो आतां. बहुधा नक्की करूनच येईल."

" अडीचशाची नोकरी !" म्हातारबुवा आश्चर्यानं म्हणाले, " आम्ही कांहीं त्याला साठावर एकसष्ट नाहीं देऊं शकणार. त्याची एवढी मोठी उडी आहे, ह्याची आधी कल्पना असती, तर हा उगाच उन्हांतून हेलपाटा तरी पडला नसता." आपल्या उपरण्यानं एकदां आपल्या चेहऱ्यावरील घाम पुसून घेऊन म्हातारबुवा उद्गारले, " हुश्श ! काय उकाडा होतोय् हो !"

" कांहीं थंडा सोडा लेमन ?"

" चालेल."

नंतर म्हातारबुवांना थंडा सोडालेमन पाजतांपाजतां शिवरामनं गप्पा मारून आणखी थंडा केला. तो म्हणाला, "अहो, रामरावांचं काय आमच्यासारखं थोडंच आहे ! आम्हाला शंभराची नोकरी मिळाली तरी बस्स आहे. नाहींच मिळाली तर साठाचीलाहि हरकत नाहीं. हो. आमचं भागेल साठांत ! खर्च कमी आमचा. काटकसरीनं राहणारीं बाळबोध वळणाचीं माणसं आम्ही !— कष्ट करण्याची लहानपणापासूनची संवय—"

"बरंय्. आतां रामराव नाहींत तर नाहींत, पण तुमची तयारी आहे का ह्या नोकरीला ?"

"हो. करूं कीं !...पण आपण रामरावांकरतां आलेले. मधल्या मध्यें मी ती नोकरी पटकावून मित्रद्रोह कसा करूं ?"

शिवरामच्या उच्च नीतिमत्तेकडे पाहून म्हातारबुवा खूष झाले. ते म्हणाले, "छे छे ! तसं मनांतदेखील आणूं नका. रामरावांना काय, दुसरी मोठी नोकरी मिळतेय्. तुम्ही साठावर काम करायला तयार आहांत—आम्हालाहि कष्टाळू माणसाची जरूरी आहे. घेऊन टाका ही नोकरी. आतां मी वर्तमानपत्रांत एक जाहिरात देतों ह्या जागेची...छे छे ! असं दचकूं नका. नेमणूक तुमचीच करायची—पण हा आपला एक औपचारिक विधी असतो लोकांचीं तोंडं गप्प करायला ! तेव्हां रीतसर अर्ज टाका—काय समजलांत ?"

"हो हो ! अवश्य. मोठे उपकार आहेत आपले." शिवराम तर आतां इतका लाचार झाला होता कीं त्यानं म्हातारबुबाना शिरसाष्टांग नमस्कार घालायचा तेवढा बाकी ठेवला होता !

आपण उपयोगांत आणलेल्या कपटनीतीविषयीं शिवरामला यत्किंचितहि पश्चाताप झाला नाहीं, कीं आपण केलं तें योग्य केलं कीं नाहीं, ह्यावर त्यानं क्षणभरहि विचार केला नाहीं. नोकरी मिळवणं हें त्याचं ध्येय होतं, आणि ती मिळवण्याचे सारेच मार्ग योग्य होते !

**म्हा**तारबुवांनीं कबूल केल्याप्रमाणें वर्तमानपत्रांतून रीतसर जाहिरात दिली. गुप्तपणानं शिवरामनंहि अर्ज टाकला. इतरांच्या नजरेला ती जाहिरात पडली कीं नाहीं, त्यांनीं अर्ज केलेत कीं नाहीं वगैरे बातम्या आडमार्गानं काढण्याचा

त्यानं प्रयत्न केला. पण त्या जागेविषयीं कोणी चकार शब्दहि आपल्या तोंडून काढलेला त्याला ऐकूं आला नाहीं.

अखेरीस मुलाखतीच्या दिवशीं सर्वजण निरनिराळ्या मार्गांनीं निघून, सर्व नद्या ज्याप्रमाणं शेवटीं समुद्रालाच जाऊन मिळतात, त्याप्रमाणं त्या विमाकंपनीच्या मुंबईतील शाखेच्या ऑफिसमध्यें एकमेकांना भेटले. रामूहि आलेला पाहून शिवरामला जरा भीति वाटली. त्याला त्या म्हाताऱ्यानं ओळखलं, आणि मग आपली लबाडी उघडकीला आली तर ! आपली नाचक्की होईल !— नाचक्कीचं एवढं कांहीं नाहीं म्हणा, पण इतक्या हुषारीनं डाव टाकून नक्की केलेली नोकरी मात्र जाईल, ह्याचंच त्याला वाईट वाटलं !

मुलाखती सुरू झाल्या आणि म्हातारबुवांनीं प्रथम रामूलाच बोलावलं. त्याचं नांव त्यांनीं ओळखलं होतं. अडचिशांची नोकरी मिळाली असतां साठाच्या नोकरीकरतां त्यानं अर्ज करावा, ह्याचं त्यांनीं रामूजवळ आश्चर्य व्यक्त केलं, आणि आश्चर्यचकित झालेल्या रामूला मग त्यांनीं त्या दिवशींची साद्यंत हकीकत सांगितली.

" खोटं ! साफ खोटं ! हा शिवराम लबाड आहे ! बोलवा पाहूं त्याला आंत, आणि माधव, गोविंद, कृष्णा ह्यांनाहि आंत बोलवा—खरंखोटं काय ते इथंच पाहूं. " रामू आव्हान फेकणाऱ्या स्वरांत म्हणाला.

त्याच्या इच्छेप्रमाणें त्याच्या चार मित्रांना आंत बोलावण्यांत आलं. सर्वांना शिवरामची त्या दिवशींची लबाडी कळतांच, त्यांनीं त्याच्यावर एकच गहजब केला. " लुच्चा ! " " मित्रद्रोही " " कपटी " वगैरे विशेषणांनीं त्याला त्यांनीं म्हातारबुवांसमोर अगदीं नेस्तनाबूद करून टाकलं.

" बरंय् तर ! मग रामराव, तुम्हीं तयार आहांत ही नोकरी करायला ?" म्हातारबुवांनीं रामूला प्रश्न केला.

" हो. " छाती फुगवून रामू म्हणाला.

" तुम्हा मंडळीची कांहीं हरकत नाहीं ना ? " म्हातारबुवांनीं शिवराम-खेरीज इतर मंडळींना प्रश्न केला. " मला वाटतं, ही नोकरी रामराव उत्तम प्रकारानं करतील ! "

आपल्या ओंठाशीं आलेली नोकरी रामूच्या ओंठाशीं गेलेली पाहून शिवराम जळफळत होता. आतां ते तिघे काय उत्तर देतात, इकडे तो उत्सुकतेनं पाहूं लागला.

गोविंदानं तोंडानं कांहींच उत्तर दिलं नाहीं. त्यानं फक्त आपले खांदे उडवले.

कृष्णा हनुवटी चोळीत म्हणाला, "त्यांच्याविषयीं शिवरामनं आपणांला बहुतेक हकीकत सांगितलीच आहे. ती कांहीं सारीच खोटी नाहीं ! तो आळशी आहे, उधळ्या आहे..."

खास मुलाखतीसाठीं शिवून घेतलेल्या आपल्या रेशमी सुटांत रामराव आज आले होते, तिकडे अंगुलिनिर्देश करून माधव म्हणाला, "त्याचे कपडेच पाहा !"

संध्याकाळीं सर्वजण घरीं एकत्र जमल्यावर माधवानं तत्त्वज्ञान्याचा आव आणून विचारलं, "आपण इथं आलों आहोंत तें नोकऱ्या मिळवण्याकरतां कीं आपल्यांतील एखाद्याला नोकरी मिळत असेल, तर त्याला अपशकून करण्याकरतां ?"

असे ते त्याचे मित्र होते ! 'स्टॅनी'चा अर्थ त्यांना विचारला असतां, तर तो शद्ब त्यानं कुठं वाचला, त्याचा संदर्भ काय वगैरे हजारों प्रश्न निघून अखेरीस शिवरामला ती जाहिरात त्यांना दाखवावी लागली असती. अजून ती जाहिरात कुणाच्या दृष्टीला पडली नसावी, असं त्याला वाटत होतं. मग उगाच त्यांना जागं कां करा ? एकदां का त्यांना तीं जाहिरात दाखवली, कीं त्या द्रौपदीवर पांचहि पांडव हक्क सांगूं लागायचे, अन् मग ती कुणालाच मिळणार नाहीं झालं !

शिवरामनं हा विचार करून ठरवलं, छे ! त्यांना कांहीं कळूं न देतां 'स्टॅनी'चा अर्थ आपणच शोधून काढला पाहिजे !

त्यानं आपल्याजवळची डिक्शनरीची छोटी आवृत्ती काढली, आणि एका कोपऱ्यांत जाऊन आपणांकडे कुणाचं लक्ष नाहीं ह्याची खात्री करून घेऊन तो 'स्टॅनी' हा शब्द शोधूं लागला.

एस्. टी. ए.—स्टॅ.—एस्. टी. ए. एन्.—एस्. टी. ए. एन्. डी.—स्टॅंड-स्टॅंडर्ड-स्टॅग-जी. एच्. आय्.-स्टॅनहोप-स्टॅनिअल !

त्यानं परतपरत डोळे वासून पाहिलं, पण नेमका ' स्टॅनी ' हा शब्दच त्या डिक्शनरींत नव्हता !

मग त्यानं ऑक्सफर्ड डिक्शनरी पाहिली, त्यानंतर चेंबर्स ट्वेंटिएथ सेंचरी डिक्शनरी पाहिली–शेवटीं ज्ञानकोश पाहिला, पण छट् ! हे ग्रंथ रचणाऱ्यांपैकीं कुणालाहि इंग्रजी भाषेंत ' स्टॅनी ' हा शब्द असेल अशी शंकाहि आलेली दिसून येत नव्हती !

मग आपलीच तर कांहीं चूक झाली नसावी ना ?

त्यानं तें पैशाच्या पाकिटांत नीट घडी करून ठेवलेलं जाहिरातीचं कात्रण काढलं आणि चांगल्या उजेडांत जाऊन पाहिलं. Stani—स्टॅनी—अगदीं स्पष्ट छापलेलं होतं तें. त्याविषयीं जरादेखील शंका घेण्याला जागा नव्हती !

ही काय भानगड आहे त्याला कळेना ! एक नोकरी हातांत माळा घेऊन आपल्या गळ्यांत घालण्याकरतां सज्ज होऊन उभी आहे, पण 'स्टॅनी'चा अर्थ आपणाला कळत नाहीं, म्हणून सारं अडून राहिलं आहे ! किती क्षुल्लक गोष्ट ! आणि ह्या क्षुल्लक गोष्टीमुळंच आपणाला ह्या नोकरीवर पाणी सोडावं लागणार !

' स्टॅनी ' ह्या शब्दाची प्रकृति शुद्ध इंग्रजी दिसत असली, तरी तो कदाचित् अस्सल आंग्लकुलोत्पन्न नसून, ' पक्का ' ' बनाव ' वगैरे शब्दांप्रमाणं एकाद्या देशी भाषेंतून तो इंग्रजीला दत्तक गेला असावा, अशी शिवरामला शंका आली, आणि मग त्यानं झाडून साऱ्या देशी भाषांचे शब्दकोश पालथे घालावयास सुरुवात केली.

पण हा किंवा ही ' स्टॅनी ' लपंडाव खेळण्यांत मोठा किंवा मोठी पटाईत असावा किंवा असावी असं त्याला दिसून आलं. देशी भाषांच्या कोशांत त्याचा पत्ता लागत नाहीं असं पाहून मग त्यानं जर्मन, फ्रेंच, रशियन आदिकरून साऱ्या युरोपीय भाषांचे शब्दकोश धुंडाळले. कदाचित् 'स्टॅनी' ही व्यक्ति स्कॅंडेनेव्हियन देशांची रहिवासी असावी, ह्या विचारानं त्यानं मामा वरेरकरांची मुलाखत देखील घेतली !

पण 'स्टॅनी' हें एक अखेरपर्यंत त्याला न उकललेलं गूढच राहिलं !

त्या गूढ शद्बाचा अर्थ शोधून काढण्याच्या बाबतींत जसंजसं अपयश त्याच्या पदरीं येऊं लागलं, तसतशी त्या शद्बाचा अर्थ जाणून घेण्याविषयींची त्याची उत्सुकता अनावर होऊं लागली. जागृतींत, निद्रेंत, स्वप्नांत त्याला एकच ध्यास लागून राहिला-- 'स्टॅनी!' समोर असलेल्या कागदावर तो लिहून ठेवूं लागला-- 'स्टॅनी!' 'स्टॅनी!' जेवतां जेवतां मध्येंच ताटांत तो बोटानं लिही-- 'स्टॅनी!' झोंपेंत मध्येंच तो बरळे-- 'स्टॅनी!' त्याच्या जिभेवर वरचेवर शद्ब येई-- 'स्टॅनी!'

आणि आपल्या गौप्याचे इतके माग त्यानं पसरून ठेवल्यावर त्याच्या मित्राला ह्या गोष्टीचा सुगावा न लागता तरच नवल!

"आज स्टॅनी आली होती!" एक दिवस संध्याकाळीं सारे जमले असतां रामू म्हणाला.

"स्टॅनी? कोण स्टॅनी?" त्याच्या मित्रांनीं एकच कोलाहल करीत विचारलं.

तो शद्ब ऐकतांच शिवराम किती दचकला.

"जिनं एका माणसाला वेड लागलं आहे, ती!" रामू म्हणाला.

"ख्रिश्चन छोकरी दिसतेय्!" कृष्णा म्हणाला, "कुठं चिराबाजारांत गांठली वाटतं!"

"चला, नौकरी नाहीं तर नाहीं, निदान छोकरी तरी पटकावली!"— गोविंद.

"पण तुला रे कशी कळली ही भानगड?"—कृष्णा.

"अरे, ह्या शिवरामनं साऱ्या कागदांवर लिहून ठेवलंय् 'स्टॅनी, म्हणून. शिवाय काल रात्री झोंपतहि बरळत होता 'स्टॅनी, स्टॅनी' म्हणून! एकाद्या पोरीनं अगदींच वेड लावल्याशिवाय इतकं कुणी करणार नाहीं!" —रामू.

'स्टॅनी' विषयीं त्याच्या मित्रांमध्यें प्रसृत झालेली ही भलतीच समजूत शिवरामला आवडली नाहीं! आपण एका ख्रिश्चन पोरीच्या प्रेमांत सांपडलों आहोंत- ही बातमी, ज्या घरीं जाऊन पोहोंचूं नयेत अशा बाकीच्या साऱ्या बातम्यांप्रमाणं-शेवटीं आपल्या घरीं अचूक जाऊन पोहोंचलेली त्याला आवडली नसती. म्हणून तो म्हणाला, "स्टॅनी हें कांही मुलीचं नांव नाहीं!"

" मग काय आहे ? "

" कुणाला ठाऊक ! "

" कुणास ठाऊक ? अन् मग तिचा ध्यास कसा धरला आहेस तूं ? सांग, स्टॅनी कुठं राहते तें—"

" खरंच रे मला ' स्टॅनी ' म्हणजे काय ह्याची कल्पना नाहीं,"– शिवराम.

" ही ' स्टॅनी ' परमेश्वराप्रमाणंच निराकार निर्गुण दिसतेय्. " !

" हें पाहा, उगाच असा गहजब करूं नका." काकुळतीला येऊन शिवराम म्हणाला," आणि भलतेच तर्क करूं नका! सारा प्रकार मी तुम्हांला समजावून सांगतों."

असं म्हणून त्यानं त्या जाहिरातीची सारी हकीकत सांगितली.

" पाहूं.पाहूं, कुठं आहे ती जाहिरात ?" असं म्हणून शिवरामनं खिशांतून काढलेल्या त्या जाहिरातीच्या कपट्यावर सर्वांनीं एकदम झडप घातली.गोविंदानं ती आपल्या ताब्यांत घेतली,व ती इंग्रजी जाहिरात तो मोठ्यानं वाचूं लागला. " वॉंटेड ए हिंदु, स्टॅनीटीचर ऑन रुपीज सिक्स्टी पर मंथ—" एवढं वाचून तो एकदम थांबला, नि मोठमोठ्यानं हसूं लागला.

त्याच्या त्या हंसण्यानं गोंधळलेले सारेजण चिडून त्याला विचारूं लागले, " काय रे, हंसतोस कशाला ? वाच ना ती जाहिरात !

" अरे, कसलं स्टॅनी नि कसलं काय !" हंसून झाल्यावर गोविंदा सांगूं लागला, " वॉंटेड ए हिंदु इथं एक ओळ संपते, व ' स्टॅनीटीचर ' पासून दुसऱ्या ओळीला सुरुवात होते. जाहिरात आहे ती, 'वॉंटेड ए हिंदुस्टॅनी टीचर'—म्हणजे हिंदुस्थानीचा शिक्षक, अशी आहे. पण शिवरामनं त्याचे दोन शद्ब केलेत् 'हिंदु' आणि ' स्टॅनीटीचर ' म्हणून ! वा ! वा रे स्टॅनीटीचर ! "

शिवरामनं ती जाहिरात पाहिली. हिंदु स्टॅनीटीचर हा शद्ब दोन ओळींत तोडून लिहिलेला असल्यामुळं व हिंदुपुढं आडवी रेघ छापलेली नसल्यामुळं त्याचा सारा घोटाळा झाला होता, हें त्याच्या लक्षांत आलं.

आणि नंतर त्याला पुण्याची ती 'स्टॅनीटीचर'ची नोकरी मिळाली नाहीं, तरी तेव्हांपासून त्याचं नांव मात्र पडलं, " स्टॅनीटीचर ! "

# अरसिक बायको ! : :

**मीं** गोष्ट वाचून संपविली आणि लतिकेकडे पाहिलें. आरामखुर्चीत पडल्या पडल्या ती स्वस्थपणें झोपीं गेली होती ! तिला झोंपलेली पाहतांच मला तिचा अतिशय राग आला. तिच्यासारख्या अरसिक बायकोशीं लग्न करण्यांत मीं केलेली चूक मला एकदम जाणवली—इतक्या तीव्रतेनें ती चूक त्यापूर्वी मला कधींच जाणवली नव्हती.

लतिकेचें हें नेहमीं असेंच ! ती म्हणजे मुलखाची अरसिक ! माझ्यासारखा उत्कृष्ट लघुकथालेखक (निदान माझ्या आणि माझ्या कांहीं मित्रांच्या मतें तरी) पति मिळाला असूनदेखील तिला वाङ्मयांतील कांहींसुद्धां कळत नव्हतं. माझी एखादी नवी गोष्ट मी मोठ्या हौसेनें तिला वाचून दाखवीं. त्या वेळीं तिच्या तोंडचे माझ्या लेखनकौशल्याविषयींचें कौतुक प्रगट करणारे शब्द ऐकण्यासाठीं माझे कान अतिशय आतुर असत. एवढा बडा लघुकथालेखक आपला नवरा आहे, ह्या विचारानें तिच्या मुखावर उभा राहिलेला अभिमान शोधून काढण्यासाठीं माझी दृष्टि तिचा चेहरा धुंडाळीत राही. पण सर्व व्यर्थ ! 'अग बाई ! किती सुंदर गोष्टी लिहितां तुम्हीं !' हे शब्द मला तिच्या तोंडून कधींच ऐकायला मिळाले नाहींत. गोष्ट ऐकायला तरी ती कशी बसत असेल, अशी तुमची कल्पना आहे ? एखाद्या आरामखुर्चीत बसून एकाग्रतेनें ती गोष्ट

ऐकत बसत असेल अशी तुमची समजूत असेल, तर ती साफ चुकीची आहे. गोष्ट ऐकत असतांना लहानग्या बच्चूला ती खेळवीत बसेल, किंवा कांहीं विणकाम तरी करीत राहील. जणूं गोष्ट ऐकण्याचा वेळ फुकट जातो, आणि केवळ माझी समजूत घालावी, म्हणून ती गोष्ट ऐकायला येऊन बसत असे! मधून मधून 'हं' एवढेंच ती केव्हां तरी म्हणे-एखाद्या वाक्याच्यामध्यें सुद्धां! जशी कांहीं मीं तिला एखादी राजाराणीची कहाणीच सांगत असे! शेवटीं माझी गोष्ट वाचून संपली कीं अंगाला आळेपिळे देत ती प्रश्न करी, "हं, झाली? एवढीच गोष्ट!" अलीकडच्या तंत्राप्रमाणें गोष्टीचा शेवट अपुरा आणि सूचक ठेवायला पाहिजे, हें मी तिला हज्जारदां तरी समजावून सांगितलें असेल. तरी पण गोष्ट संपली कीं तिचा हा प्रश्न आपला ठरलेलाच! नंतर ती एक सुस्कारा सोडी, आणि तोंडांतले टॉन्सिल्स आणि पडजीभ दिसेल, एवढी मोठीं जांभई देई. त्या तिच्या सुस्काऱ्यात 'सुटल्यें बाई एकदांची गोष्ट ऐकण्याच्या कटकटींतून!' असा अर्थ असावा अशी मला शंका येई, आणि माझ्या साऱ्या उत्साहावर पाणी पडे. पुन्हां म्हणून कधीं लतिकेला आपली गोष्ट वाचून दाखविण्याचा मूर्खपणा करायचा नाहीं असा मी तेव्हां निश्चय करीं.

हा निश्चय बरेच दिवस यशस्वीपणें पाळून, आज मीं प्रथमच मोडला होता, आणि त्याचा मला आतां पुरेपूर पश्चात्ताप होत होता.

आज मी लिहिलेली गोष्ट किती सुंदर उतरली होती! समरप्रसंग, नीरगांठ, उकल वगैरे सर्व भानगडी कशा अगदीं 'प्रतिभासाधन'बरहुकुम साधल्या होत्या. गोष्टींतल्या नायिकेला मीं 'काळेभोर, टपोरे, अन् भावनादर्शी' डोळे बहाल केले होते; आणि तिच्या सुंदर मुखावर 'लाघवी हास्य' खेळवलें होते. मोठ्या कलात्मकतेनें गोष्टीचा आरंभ, जेथें कथानकाचा खरा शेवट होतो, तेथून केला होता; आणि गोष्टीच्या शेवटीं कथानकाचा आरंभीचा भाग सांगितला होता. तंत्रदृष्ट्या तर गोष्ट अगदीं निर्दोष होती. सारे कांही जेथल्या तेथें होतें. मधूनमधून विनोदाची पखरणहि केली होती. मग सांगा त्या गोष्टींत काय कमी होतें?

एखादी सुंदर कलाकृति पुरी केल्यावर कलावंताला जो एक प्रकारचा उन्मादक आनंद होतो, तसा मला ती गोष्ट पुरी केल्यावर झाला होता.

आपली गोष्ट कोणाला तरी वाचून दाखवून त्यालाहि आपल्या सुखांत वांटेकरी करावें, असें मला वाटूं लागलें होतें. पण तेव्हां रात्रीं दहाचा सुमार होता. अशा अवेळीं कोण रसिक भेटणार ? अखेरीस, त्या आनंदाच्या भरांत लतिकेलाच गोष्ट वाचून दाखविण्याचें मीं ठरवलें. श्रोता कितीहि अरसिक असला तरी गोष्टीच्या सुरुवातीचीं तीनचार वाक्यें ऐकतांच त्याचें मन गोष्टींत रमलेंच पाहिजे, इतका त्या गोष्टींचा आरंभ बहारदार झाला आहे, असा मला आत्मविश्वास वाटत होता. शिवाय म्हटलें, आपणावरचा अरसिकतेचा डाग धुवून काढायला लतिकेला आणखी एक शेवटची संधि देऊन पाहायला काय हरकत आहे ?

शिवाय आज लतिकाहि जराशी खुषींत दिसत होती. तिला गोष्ट ऐकण्यासाठीं बोलावतांच मांडीवर झोपी गेलेल्या बच्चूला खाटेवर घालून ती लगेच एका आरामखुर्चीवर येऊन पहुडली, आणि वरपांगीं तरी माझी गोष्ट एकाग्रतेनें ऐकूं लागली. त्यामुळें मलाहि थोडासा हुरूप चढला आणि मोठ्या उत्साहानें मी तिला ती गोष्ट वाचून दाखवूं लागलों.

गोष्ट वाचतांना, गोष्टींतील विनोद ऐकून ज्यावेळीं माझ्या मतें लतिकेनें हंसावयास पाहिजे होतें, त्यावेळीं मीं तिच्याकडे हळूच चोरून पाहिलें. ती हंसत होती खरी ! ती जातीची सुंदर होतीच पण तिचा तो हंसणारा चेहरा आतांच्याइतका सुंदर मला पूर्वीं कधींच वाटला नव्हता. तिला हंसतांना पाहून मला एक आनंदाश्चर्याचा लहानसा धक्का बसला. आणि आपली बायको, एकूण आपण समजतों तितकी कांहीं 'ही' नाहीं, हा विचार मनांत येऊन मनाला थोडेसें समाधानहि वाटलें.

पण माझें हें समाधान फार वेळ टिकून राहूं शकलें नाहीं. कारण, लवकरच मला समजून आलें कीं, लतिका हंसत होती ती माझ्या गोष्टींतील विनोदामुळें नव्हे, तर दुसऱ्याच एका कारणामुळें !

तिला हंसतांना पाहून माझा हुरूप अधिकच वाढला होता. गोष्टींतील विनोद पुरतेपणीं तिच्या ध्यानांत आलेला नसल्यास तिला तो नीट समजावून द्यावा, ह्या उद्देशानें मी तिला विचारलें "काय ? हंसतेस कां ?"

"कांहीं नाहीं; आपलं उगाच."

"उगाच कसं? कारणावांचून कोणी हंसतं का?"

"नाहीं हो, आज सकाळीं किनइ ऽ एक गंमत झाली."

"काय गंमत झाली?" मीं जराशा कठोरपणानें विचारलं.

"शेजारची स्वयंपाकीणबाई आहे ना शकुंतलाबाईची—काय मेली फॅशन करते, जशी कांहीं एखादी सिनेमांतली नटीच!"

"बरं मग?"

"तिनं किनई माझ्या हातांतल्या बांगड्यांना पिना लावलेल्या पाहिल्या. बच्चूच्या आंगड्यांना लावलेल्या पिना काढल्या कीं मी त्या हातांतल्या बांगड्यांना देतें लावून. पण तिला वाटलं कीं हीहि एक फॅशनच आहे. म्हणून तिनं काय केलं, आज बाजारांतून एक डझन पिनांचा कागद आणला, आणि त्या पिना दिल्या आपल्या बांगड्यांत अडकावून!"

एवढें बोलून ती मोठमोठ्यानें हंसूं लागली. दुसऱ्या एखादे वेळीं तिनें सांगितलेल्या ह्या 'गंमती'ला मीहि हंसलों असतों. पण ह्या वेळीं मीं फक्त "बरं, आतां गोष्ट ऐक" एवढेंच म्हटलें, आणि गोष्ट पुढें वाचूं लागलों.

नंतर ती गोष्ट वाचतांना त्या गोष्टींत मीं स्वतःच इतका रमून गेलों कीं लतिकेकडे माझें लक्षच गेलें नाहीं. गोष्ट वाचून संपल्यावर तिचा अभिप्राय काय पडतो हें पाहण्यासाठीं एक मोठा श्वास सोडून मीं तिच्याकडे पाहिलें, तर आरंभी वर्णन केल्याप्रमाणें तिची ब्रह्मानंदीं टाळी लागली होती!!!

माझी गोष्ट एखादे वेळ कोणाला अत्युत्कृष्ट वाटली नसती, पण ती ऐकत असतां झोंप येईल, ही गोष्ट मात्र मी कधींच कबूल केली नसती! लतिकेच्या त्या अभिप्रायानें माझा राग अनावर झाला. एकदोन मिनिटें माझ्या डोळ्यांतून तिच्यावर मीं संतापाचा वर्षाव केला, आणि गोष्टीच्या कागदाची गुंडाळी करून, व रागानें ती टेबलावर आपटून मी बाहेर गॅलरींत येऊन उभा राहिलों.

टेबलावर कागद आपटल्याच्या आवाजानें लतिका दचकून जागी झाली. अंगाला एकदोन आळेपिळे देऊन ती बाहेरील दरवाज्यांत उभी राहिली, आणि लाडिकपणें म्हणाली, "झाली का गोष्ट वाचून? मग चलावं तर जेवायला आतां, दहा वाजून गेलेत."

माझ्या मनाच्या हिरमोडीची अरसिक लतिकेला कांहींच कल्पना नव्हती; पण ती मला पुरेपूर होती. मी रागानेंच म्हटलें, "मला भूक नाहीं; तूं जेवून घे!"

नंतर किती तरी वेळ खालच्या रस्त्यावर आपली शून्य दृष्टि लावून मी उभा होतों. लतिका केव्हा आंत गेली हें मला समजलेंसुद्धां नाहीं. माझ्या बोलण्यानें तिलाहि राग आला असावा. माझ्यावर तीं फार चटकन् रागावे! —येईना का तिला राग! मला काय त्याची पर्वा! छेः छेः! नुसत्या बाह्य सौंदर्याला भुलून इतक्या अरसिक बायकोशीं लग्न करण्यांत आपण मोठाच मूर्खपणा केला. तसें पाहिल्यास गृहकृत्यांत ती हुशार होती. माझ्या पोटाची भूक आपल्या सुग्रणपणानें ती छान भागवी. पण माझी बौद्धिक भूक? ती भागविण्याला लतिका सर्वस्वी असमर्थ होती. आपणाला कशी एखादी वाङ्मयाची गोडी असलेली रसिक बायको असावयाला हवी होती. मग माझा संसार म्हणजे नंदनवन झालें असतें. चूल आणि मूल ह्यांतच आयुष्याची इतिकर्तव्यता मानणारी लतिका मला नको होती. ह्यापेक्षां एखादें विशाल जीवनविषयक तत्त्वज्ञान असलेली पत्नी मला पाहिजे होती. माझ्या नव्यानव्या गोष्टींवर तहानभूक विसरून तासन् तास चर्चा करीत बसणारी, मधूनमधून मला नव्या कल्पना सुचवून देणारी, आणि काव्यशास्त्र-विनोद-पारंगत, अशा एखाद्या सहचारिणीची मला आवश्यकता होती.

ह्या बाबतींत आमच्या शेजारचें कवि 'भृंग' किती भाग्यवान् होते! त्यांना 'शकुंतले'सारखी विदुषी आणि रसिकच नव्हे, तर एक उदयोन्मुख कवयित्रीच बायको मिळाली होती! कधीं 'भृंगां'नीं एखादी कविता लिहावी, आणि मग दोघांनीं त्यावर तासन् तास चर्चा करावी, तर कधीं 'शकुंतलेच्या कवितेचें रसग्रहण करण्यांत मशगुल होऊन मध्यरात्रसुद्धां टळून जावी. छे, छे, आपणहि 'शकुंतले'सारख्याच एखाद्या कवयित्रीशीं विवाहरज्जूंनीं बद्ध व्हावयास पाहिजे होतें.

मी गॅलरींत हे विचार करीत उभा असतां, शेजारच्या घरातून 'भृंग' आणि 'शकुंतला' ह्यांच्यामध्यें मोठमोठ्यानें चाललेल्या वादविवादाचे कांहीं शब्द माझ्या

कानांवर मधूनमधून येऊन पडत होते. 'साहित्य,' 'तिखटपणा,' 'झोंबणें,' 'रसाळ', 'खरपूस समाचार' वगैरे वगैरे जे शब्द माझ्या कानांवर येऊन पडत होते, त्यांवरून त्या प्रेमळ आणि रसिक पतिपत्नींमध्यें कांहींतरी साहित्यविषयक चर्चा चाललेली असावी असा मीं तर्क बांधला. आणि त्यामुळें नुकताच झालेला माझा आशाभंग मला अधिकच जाणवूं लागला. घराच्या चार भिंतींत होणारा हा माझा बौद्धिक कोंडमारा मला आतां अगदीं असह्य होऊं लागला होता. ह्या कोंडींतून बाहेर पडण्याचा आणि माझी बौद्धिक भूक शमविण्याचा आतां एकच उपाय मला दिसत होता, आणि तो म्हणजे अलीकडच्या फॅशनप्रमाणें पहिली बायको जिवंत असतांनाच दुसरी एखादी बायको घरांत आणणें, हा होय.

थोडा वेळ ह्या गंभीर प्रश्नावर मी सांगोपांग विचार करीत उभा होतों, इतक्यांत कवि 'भृंग' आपल्या खोलींतून बाहेर पडले. चालतांना त्यांच्या जराशा झोकांड्या जात होत्या, त्यांचे केस पिंजारलेले दिसत होते, त्यांचे डोळे तारवटलेले आणि अश्रुपूर्ण दिसत होते, खांद्यावर धोतराचा सोगा टाकून हळूंहळूं ते माझ्या शेजारीं येऊन कठड्यावर रेलून उभे राहिले. आज एखादें खंडकाव्य किंवा एखादी भयंकर कारुण्यपूर्ण विलापिका ते प्रसवले असावेत, असा त्यांच्या त्या अवतारावरून मीं तर्क केला, आणि त्याप्रमाणें त्यांना विचारलें,

"काय कविता वगैरे केलीत कीं काय ?"

"कसची कविता नी कसचं काय !" त्यांच्या शब्दांतून दारुण निराशा प्रतीत होत होती.

"म्हणजे ?"

"अहो, आधी पोटोबा नि मग विठोबा. पोट भरलेलं असेल तर कविता सुचेल ना ? नेपोलियननं म्हटलं आहे, 'सैन्यं पोटावर चालतात !' त्याचप्रमाणं मीहि म्हणतों कीं पोट भरलेलं असेल तरच कवीहि काव्य करूं शकेल !"

आश्चर्यचकित होऊन ह्या कवींमधल्या 'नेपोलियन'चं तत्त्वज्ञान मी ऐकत होतों. 'भृंग' पुढें म्हणाले, "कवि दरिद्री असतात असा संकेत आहे. तरी पण दोन वेळची कांदाभाकर तरी मिळाल्याशिवाय कवीला काव्य करण्याची स्फूर्ति

होणं अशक्य आहे, अशी माझी समजूत आहे—छे, हा स्वानुभव आहे ! कल्पनेच्या नंदनवनांत विहार करणाऱ्या उपाशी कवीला पोटांतली आग क्षणाक्षणाला चटके देते, आणि त्याला चैन पडूं देत नाहीं. मग काव्यरचनेची गोष्टच कशाला ?" 'भृंग' तावातावानें आपलें मत प्रतिपादन करीत होते.

"पण तुम्हाला आज हे विचार सुचायचं कारण ?"

"कारण ! कारण माझ्या पोटांत उठलेला भुकेचा गोळा !"

"म्हणजे अजून जेवण वगैरे नाहीं कां झालं ?"

"अहो, आमची स्वयंपाकीण गेली ना एका फिल्म कंपनींत ! पन्नास रुपयांवर तिला एक्स्ट्रा नटीचं काम मिळालं आहे. हं ! आम्ही सिनेमाहून परत येतों तों, तिनं त्या अर्थाची चिठ्ठी लिहून ठेवलेली आम्हांला मिळाली."

"मग खानावळींतून डबा आणायचा होता."

"हो, माझा तोच विचार होता; पण शकुंतला म्हणाली आजचा दिवस आपण स्वयंपाक करतें म्हणून."

"वा, छान ! मग तर त्यांच्या हातचं जेवून तुमचं पोट फुटायला आलं असलं पाहिजे ! तुमची जी नुकतीच साहित्यविषयक चर्चा चालली होती, त्यावरून मला वाटलं...."

"कुठली साहित्यविषयक चर्चा ! वा, छान. अहो, ती साहित्यविषयक चर्चा नव्हती, ती शकुंतलेच्या स्वयंपाकाची चर्चा होती ! जरा निराळ्या अर्थानं साहित्यविषयक चर्चा होती ती." भूक लागलेली असूनहि भृगांनीं कोटी केली, आणि ते भकासपणें हंसले !

"येवढ्या हिरीरीनं ?"

"ती एखादी कवयित्री असेल, एखाद्या वृत्तांत मात्रा किती असतात हें तिला तोंडपाठ असेल. पण आमटींत मीठ किती घालायचं हें तिला ठाऊक नाहीं. तिनं केलेली पोळी रबरासारखी वातड झाली होती. भाजी म्हणजे निव्वळ कोळसा ! आणि आमटींत तर मीठ घालायलाच ती विसरली. इतकी तिखट झाली होती आमटी कीं एक भुरका मारताच एखादी विलापिका वाचून यावं इतकं पाणी वाहूं लागलं माझ्या डोळ्यांतून !" धोतराच्या सोग्यानें

आपले डोळे पुशीत 'भृंग' बोलत होते, "आमटी आळणी झाली आहे असं तिला म्हणतांच तिने विनोद केला, 'अहो आतां मीठ महाग झालंय् ना ?' पण अशा कोट्यांनीं का कुठं पोटांतली भूक शमते ? तसाच उठलों पानावरून आणि खूप बोललों तिला. बाप रे ! त्या स्वयंपाकाची आठवण झाली म्हणजे अजूनहि अंगावर शहारे येतात ! ...बरंय्, जातों आतां खाणावळींत डबा आणायला..."

"वा ! हें कसं चालेल ? आम्ही तुमचे शेजारी असतांना ह्या वेळीं तुम्ही खाणावळींतून डबा आणणार !"

मी त्यांना थांबवून झट्कन् आंत गेलों, आणि आमच्या शेजारचें जोडपें जेवायला येणार असल्याची लतिकेला वर्दी दिली. ती बातमी ऐकून माझ्या भीतीप्रमाणें लतिका कंटाळली तर नाहींच, पण सारा दिवस काम करून थकलेली असूनसुद्धां, ती मोठ्या उत्साहानें कामाला लागली.

मीहि आतां जरा खुषींत आलों होतो. जेवण आटोपल्यावर शेजारच्या रसिक दांपत्याला माझी नवी गोष्ट वांचून दाखविण्याचा माझा डाव होता. शकुंतलेला कवितेच्या दोन ओळी जुळवायला जितका वेळ लागला असता, त्यापेक्षांहि कमी वेळांत लतिकेनें त्या दोघांचा स्वयंपाक करून टाकला. आणि नंतर जेवण उरकल्यावर ढेंकर देतदेत आम्हीं तिघांनीं माझ्या नव्या गोष्टीचें जवळजवळ मध्यरात्रीपर्यंत रसग्रहण केलें.

घरीं जावयास उठल्यावर 'भृंग' मला हळूंच म्हणाले," तुम्हीं भाग्यवान् आहांत बुवा ! लतिकाबाईसारखी सुग्रण पत्नी मिळाली तुम्हांला !-किती दिवसांत इतकं चांगलं जेवण जेवलों नव्हतो मी. थँक्स !"

मी हंसून त्यांच्या आभारांचा स्वीकार केला आणि आतां मी दरवाजा बंद करणार इतक्यांत 'भृंग' म्हणाले, "जरा थांबा, दोन मिनिटं"-असें म्हणून जवळजवळ धांवतच ते आपल्या घरांत घुसले. मी त्यांची वाट पाहात दरवाजांत उभा राहिलो. त्यांनी मला कशासाठीं ताटकळत उभें केलें होतें, त्यांचें माझ्याशीं इतकें महत्त्वाचें काय काम होतें, हेंच मला समजेना. ललितेकडे जाण्यासाठीं मी उत्सुक झालों होतो.

एकएक मिनिट मला तासाप्रमाणें वाटत होतें.

ह्या हिशोबाप्रमाणें साधारण पांच सहा तासांनीं, हातांत एक चिटोरें धरून, 'भृंग' लगबगीनें बाहेर आले. आणि माझ्या हातांत तें चिटोरें ठेवीत म्हणाले, "हं, वाचा !"

"काय आहे हें ?" त्या चिटोऱ्यावर काय लिहिलेलें असावें, ह्याचें आश्चर्य करीत मी विचारलें.

"कविता आहे ती-'अन्नपूर्णेस' लतिकाबाईवर लिहिली आहे ती."

"इतक्यांत लिहून झालीसुद्धां ?" मीं आश्चर्यानें विचारलें.

"हो ! मग त्यांत काय आहे ! पोट भरलेलं असेल तर कवितांना काय तोटा ? वाचा ना. ही कविता मीं लतिकाबाईंना अर्पण करणार आहे"

"आतां मला झोंप आली आहे. उद्यां सकाळीं वाचीन सावकाश !" येवढें बोलून, उत्तराची वाट न पाहतां, मीं धाडकन् दरवाजा लावून घेतला. लतिकेविषयीं नुकतेंच मला जें काय वाटूं लागलें होतें, त्यांत ती कविता वाचून मला बिब्बा कालवायचा नव्हता.

**मीं** आंतल्या खोलींत जाऊन पाहतों तों दिवा तसाच ठेवून लतिका झोपीं गेली होती. तिच्या पुढ्यात बच्चू झोंपला होता. सर्व दिवसाच्या श्रमांनीं तिचा चेहरा श्रांत दिसत होता. पण एक प्रकारचा सात्त्विक आनंद त्यावर खेळत होता.

थोडाच वेळ ह्या दृश्याकडे मी पाहात राहिलों असेन; बच्चूनें आपला चिमुकला हात लतिकेच्या मानेवर टाकला, आणि त्याच्या तोंडावर खोडकर हास्य खेळूं लागलें. जणूं गुलाम मला म्हणत होता, "आई किती रसिक आहे ! तुमचं खटाटोपाचं काव्य तिला आवडत नसेल. पण माझ्यासारख्या जीवंत काव्याच्या सहवासांत तिचा सारा दिवस जातो. मला-आणि तुम्हांला सुद्धां-सुखांत ठेवण्यासाठीं किती श्रम घेते ती ! ती संसार इतका सुरळीत चालवते, म्हणून तर तुम्हांला गोष्टी लिहिण्याइतकी फुरसत आणि स्वस्थता

मिळते. किती किती चांगली आहे आई ! ... आणि तुम्हीं दुसरी बायको करण्याचा विचार करतां ! हूंः ! "

जणूं येवढे बोलून, लतिका आपणाला किती आवडते, हें दाखविण्यासाठीं लतिकेच्या मानेभोंवतालची आपल्या लहानग्या हाताची मिठी त्यानें अधिकच घट्ट केली, आणि तो तिच्या पोटाशीं अधिकच बिलगला. त्या ह्याच्या कोमल स्पर्शानें शरीरांत खेळूं लागलेल्या सुखसंवेदनांचें प्रतिबिंब लतिकेच्या मुखावर उमटलें. साऱ्या जगाला विसरून, किती तरी वेळ हें सुंदर चित्र पाहत मी तसाच उभा होतों.......

# साहेब आणि गाढव : :

" काय रे विन्याच्यामागं इतकं लागतां ? इंग्रजी बोलतांना त्याची चूक झाली तर त्यांत त्याची इतकी टिंगल उडवण्यासारखं काय झालं ?" बाबूराव आम्हां सर्वांना दबकावून म्हणाले.

पत्ते खेळून आम्ही सर्व घरीं जावयास निघालों होतों. तेव्हा वशाने विचारलें होतें, "काय विनोबा, उद्यां दुपारीं येणार ना पत्ते खेळायला ?"

"Oh yes if I am empty." (हो हो, रिकामा असलों तर अवश्य येईन.) विन्यानें त्यावर ऐटींत इंग्रजींत उत्तर दिलें होतें. विन्याने 'रिकामा' ह्या मराठी शद्बाला 'Empty' हा इंग्रजी प्रतिशद्ब चुकीने वापरलेला पाहून एकच हंशा पिकला होता. आणि सर्वजण त्याची टिंगल उडवूं लागले होते. त्या संधीचा फायदा घेऊन वशाने "But you seem to be empty" (पण तूं तर 'रिकामा'च दिसतोस !) असा विन्याच्या डोक्यावर अर्थपूर्ण दृष्टीने पाहात टोलासुद्धां मारला होता. आणि जेव्हां आम्ही फारच वाह्वत चाललों तेव्हा बाबूराव मध्यें पडले होते. ते पुढे म्हणाले, "परकी भाषा ती परकी भाषा. ती कितीहि शिकली तरी ती बोलतांना एखादी चूक ही व्हायचीच. इंग्रजी बोलतांना जशा आपल्या चुका होतात तशाच साहेबांच्याहि मराठी बोलतांना होतात. मराठी बोलतांना साहेब लोक

किती विचित्र घोटाळे करतात, कल्पना नाहीं तुम्हाला! पांडोबा कुलकर्ण्यांचा अनुभव तुम्हांला सांगितला तर हसूनहसून पोट दुखेल तुमचं!"

हें बोलतां बोलतां त्यांना त्या प्रसंगाची आठवण झाली आणि त्यांना हास्याच्या उकळ्यांवर उकळ्या फुटूं लागल्या.

"काय? काय? पांडोबा कुळकर्ण्यांना काय अनुभव आला?" आम्ही सर्वांनीं एकच गिल्ला केला. बाबूरावाजवळ गोष्टींचा साठा भरपूर होता. त्यांच्याकडून ऐकलेल्या इतर गोष्टींप्रमाणें हीहि गोष्ट फारच गमतीची असली पाहिजे अशी आमची अपेक्षा होती. बाबूराव सांगूं लागले:

दहाबारा वर्षांपूर्वीची गोष्ट. पांडोबा त्यावेळीं बेलगांवला तलाठी होते. शंभर दीडशे घराचा गाव. गावांतलीं जीं काय भांडणें असतील तेवढींच काय ती तेथें करमणूक. कधीं वर्षांतून एखादी जत्रा! नाहींतर आयुष्याचा प्रवाह किती संथ चाले! एक एक दिवस येई आणि जाई! वाण्याच्या रद्दींत दोनतीन वर्षांपूर्वींच्या बातम्या वाचावयास मिळत किंवा कोणी कोर्टकचेरीसाठी तालुक्याच्या गावीं जाऊन येई तेवढाच काय तो बाहेरच्या जगाशीं संबंध! पांडोबांना कामहि थोडेंच असे. बहुतेक वेळ ते पूजेअर्चेत घालवीत. त्यांच्या आयुष्यांत कधी खळबळ नाहीं की गडबड नाही.

पण त्यांचा आयुष्यक्रम असा संथपणें चालला असतां एके दिवशीं आठवड्यांतून बेलगांवला एकदां येणाऱ्या पोस्टमननें त्यांच्या हातांत एक सरकारी खलिता आणून ठेवला. आणि मग त्यांच्याच आयुष्यांत नव्हे तर सर्व बेलगांवच्या इतिहासांत न भूतो न भविष्यति अशी खळबळ उडवून देणारा प्रसंग घडून आला. तो खलिता वाचून होतांच तर पहिल्याने पांडोबाचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना! हो! खुद्द मेहेरबान कलेक्टरसाहेब बहादुर बेलगांवला आपली पायधूळ झाडणार होते, एवढेंच नव्हे तर त्यांचा तिथे चांगला चार दिवस कँप पडणार होता. बरें, एवढ्यावरच त्यांचें दैव थांबलें नव्हतें, तर कलेक्टरसाहेबांबरोबर त्यांच्या मेमसाब व धाकटा 'बाबा' पण येणार होता. ओहोहो! बेलगांवचें केवढें हें भाग्य! आणि अशा वेळीं

पांडोबा तिथे तलाठी असावेत हा केवढा महत्त्वाचा योगायोग ! लख्खकन् त्यांच्या डोक्यांतून एक कल्पना चमकून गेली. जर साहेब आपल्या सेवेने प्रसन्न झाले तर... तर मामलेदारी-निदान मामलेदाराची सरकारकुनी...

तो खलिता ते पुनःपुन्हां वाचून पाहूं लागले. पहिलें प्रेमपत्र वाचतांना होणाऱ्या आनंदाचा त्यांना अनुभव नव्हता; पण ती भावनांची खळबळ-ती हृदयाची हुरहूर-वगैरे भानगडी त्यांना 'चटोर' गोष्टींतून वाचून माहिती होत्या. त्यांची त्यांना ह्या वेळीं आठवण झाली. पुनःपुन्हा तो खलिता वाचून काढतांनां बऱ्याच वेळाने त्यांच्या लक्षांत आलें, कीं 'मेहेरबान कलेक्टरसाहेब येणार' ह्या बातमीनें आपणाला इतका हर्ष झाला आहे, की खलित्यांतल्या पुढच्या बराचशा भागाकडे अजून आपलें लक्षच गेलेलें नाहीं ! साहेब हरणांच्या शिकारीसाठीं येणार होते. कारण बेलगांवच्या आसपास हरणांचे कळप बरेच होते. साहेब मांसाहारी असल्यामुळें दोनचार चांगले धुष्टपुष्ट बोकड व कोंबड्या तयार ठेवावयाच्या होत्या; गावाबाहेरील एका आंबराईत साहेबांच्या कँपसाठीं जागा साफसूफ करून ठेवायची होती. कमोड साफ करणारा भंगी बेलगांवांत नसल्यास तसें ताबडतोब तालुक्याच्या कचेरींत कळवायचें होतें, म्हणजे तेथून एका खास भंग्याची रवानगी करून देण्यांत येणार होती. येथपर्यंतच्या सूचना पांडोबांना नीट समजल्या. पण ह्यानंतर जी एक सूचना त्यांना त्या खलित्यांतून मिळाली होती, तिची उपयुक्तता मात्र बराच विचार करूनहि त्यांच्या लक्षांत येईना ! आणि ती सूचनाहि होतीच तशी विचित्र !

ती सूचना होती एक चांगलें गाढव तयार ठेवण्याबद्दल !

कलेक्टरसाहेब आपल्या गावीं मुक्कामाला येणार आहेत ही बातमी बेलगांवांत आगीप्रमाणें पसरली, आणि गावांतले कंबर वाकलेले म्हातारे, मारवाडी, शाळामास्तर, पाटील वगैरे प्रतिष्ठीत मंडळी पांडोबांच्या घराच्या ओटीवर हळूहळू जमूं लागली. कलेक्टरसाहेब जणूं आपल्याच घरीं पाहुणे येणार आहेत आणि त्यांची बडदास्त उत्तम ठेवली पाहिजे अशा समजुतीने प्रत्येकजण बोलत होता. बोकड आणि कोंबड्या कुठे मिळतात ह्याची पांडोबांसारख्या कर्मठ ब्राह्मणाला कांहींच माहिती नव्हती. पण अबदुल्ल्या ताशेवाल्यानें उत्तमांतला उत्तम माल पुरविण्याची कामगिरी आपण होऊन

अंगावर घेतली. गावाबाहेर दोनचार जणांच्या आंबराया होत्या. साहेबांनीं उतरण्याचा मान आपल्याच आंबराईला मिळावा म्हणून त्यांच्यांत अहमहमिका सुरू झाली. अखेर बरीच भवति न भवति होऊन गावापासून सर्वात दूर आणि ओढ्याच्या काठीं असलेली एक रमणीय आंबराई पांडोबांनी मुक्रर केली.

ह्याप्रमाणें सर्व व्यवस्था लावून झाल्यावर सर्वात मुख्य असा गाढवाचा प्रश्न निघाला. साहेबमजकुरांना गाढव कशासाठीं लागत असावें ह्याविषयीं त्या पोक्त आणि अनुभवी गावकऱ्यांत तर्कवितर्क सुरू झाले.

" गाढव साहेबाला बसायला पाहिजे असेल. " पांडोबा म्हणाले.

" वा वा ! येवढा मोठा साहेब, तो काय गाढवावर बसेल ?" मारवाड्यानें शंका काढली.

" अरे हो बुवा ! तुम्हास्नी काय माहित हाय ? साहेब लोक गाढवावरच बसत्यात." गणपत न्हावी म्हणाला.

" कशावरून ? " मारवाडी.

" अहो मी शिमग्याला शहरांत गेलों नव्हतों का ? तिथं पाह्यलं व्हतं- एका पोरानं साहेबाचं स्वांग काढलं व्हतं अन् तो गाढवावर बसूनशानी फिरत व्हता."

" वा—वा ! ह्यावरून कांहीं साहेब लोक गाढवावर बसून फिरतात असं सिद्ध होत नाही." शाळामास्तरांनीं संशय प्रदर्शित केला.

" मंग ? खरे साहेब गाढवावर बसत असत्याल म्हून तर त्येचं स्वांगबी गाढवावरून काढत असत्याल !" गणपत न्हाव्याची तर्कशुद्ध विचारसरणी !

" हो. आणि एखादा चांगला घोडा तयार ठेवण्याविषयीं ज्या अर्थी कांहींच सूचना नाहीं त्या अर्थी साहेबांना गाढव बसण्यासाठींच पाहिजे असणार !" पांडोबांनीहि अनुमोदन दिलें.

" माझा इचार चालतो, की गाढव खायास्नी पाहिजे असल सायेबाला." खंड्या गवळी म्हणाला.

"छट्! गाढव का कुणी खात्यात?" धोंडू कुंभाराने अधिकारवाणीनें प्रश्न केला.

"पन त्ये गाय अन् डुक्कर तर खात्यात ना?"—खंड्या.

"म्हणून काय झालं?"—शाळामास्तर.

"झालं तर मग! डुक्करबी खात्यात तर गाढव कां नाहीं खानार?"

हें तर्कशास्त्र सर्वांना निरुत्तर करणारें होतें तरी त्यावर विश्वास ठेवायला कुणी तयार नव्हता. शेवटीं अनेक तर्कवितर्क निघाले तरी साहेबाला गाढव बसण्यासाठींच पाहिजे असावें ह्या विचारसरणीला मताधिक्य लाभलें, आणि धोंडू कुंभाराचें एक चांगलें गुटगुटीत गाढव त्या कार्यासाठीं नेमस्त केलें गेलें.

त्या दिवशीं बेलगांवांत सर्वांच्या हेव्याला पात्र झालेल्या अशा दोन व्यक्ति होत्या. एक पांडोबा आणि दुसरी धोंडू कुंभाराचें गाढव!

घरीं आल्यावर पांडोबा पुढल्या व्यवस्थेला लागले. "अग, माझं इंग्रजी प्रायमर कुठं आहे तें काढ बघूं जरा." संध्याकाळीं घरांत आल्यावर पांडोबांनीं आपल्या 'हि'ला सांगितलें!

"कशाला? बंडूला शिकवायला का? पण त्याची तर अजून मराठी तिसरी व्हायची आहे ना?"

कलेक्टरसाहेब बेलगांवला येणार ही बातमी पांडोबांपासून उगम पावून तिचें रूपांतर सारा गांव बुडवून टाकणाऱ्या गंगेंत झालें होतें तरी त्यांचें माजघर मात्र अजून कोरडेंच होतें!

"अग, बंडूला नाही ग. मलाच पाहिजे आहे तें."

"इश्श! हें काय आपलं वय का आहे आता इंग्रजी शिकायचं? कांही तरीच बाई मेलं!" कुतूहलानें आपल्या पतिराजांचें निरीक्षण करीत रखमाबाई उद्गारल्या.

"तसं नव्हे ग. मला तसं इंग्रजी येत नाही असं थोडंच आहे?" इतक्यांत त्यांना वाटलें असावें, आपणाला इंग्रजी येतें असें सांगण्यापेक्षा त्याचें प्रात्यक्षिकच करून दाखवलें तर काय वाईट? म्हणून ते म्हणाले, "माय डीयर, कलेक्टरसाहेब इज् कमिंग."

रखमाबाईंच्या चेहऱ्यावर आदरामिश्रित कौतुकवाचक उद्‌गारचिन्ह उभें राहिलेलें पाहून त्यांना धन्य वाटलें व आपलें आणखी ज्ञान दाखवण्याची त्यांना स्फूर्ति झाली. पण ऐन वेळीं इंग्रजीच्या ज्ञानाने त्यांना दगा दिल्यामुळे तो विचार त्यांनी सोडून दिला व ते मराठींतच म्हणाले,

" अग, मेहेरबान कलेक्टरसाहेब येणार आहेत ना आपल्या बेलगांवला ? त्यांची सर्व व्यवस्था मलाच पाहावी लागणार आहे. उठल्यासुटल्या त्यांच्याशीं इंग्रजींत बोलावं लागणार, तेव्हा म्हटलं आपली इंग्रजीची उजळणी करून ठेवलेली बरी. अजून दोनचार दिवस आहेत त्यांना यायला."

" अस्सं होय ? मग आधीच कां नाही सांगितलं तसं ? " खुद्द पांडोबांना कलेक्टरकी मिळाली असती तर ज्या नजरेने रखमाबाईंनी त्यांच्याकडे पाहिलें असतें त्या नजरेने पाहात त्या म्हणाल्या.

" हो. आणि त्यांची सौभाग्यवतीहि पण येणार आहे लहान मुलाला घेऊन. चांगला 'टी' वगैरे आहे ना घरांत ? "

" हें 'टी' काय ? "

" अग, 'टी' म्हणजे चहा. एक दिवस चहाफराळाला बोलवावं लागेल त्यांना."

साहेबमजकुरांशीं इंग्रजींत बोलण्याची तयारी म्हणून पांडोबांनी प्रायमरची उजळणी मोठ्या उत्साहाने सुरू केली. त्यासाठी दोन दिवस त्यांनी आपल्या संध्येच्या कार्यक्रमाला चाट दिली. म्हणजे संध्येच्या वेळीं विष्णुसहस्रनामाच्या ऐवजी ते गुपचूप 'आर ए टी रॅट म्हणजे उंदीर' व 'सी ए टी कॅट म्हणजे मांजर' हें घोकूं लागले. प्रायमरपर्यंतच त्यांचें इंग्रजी शिक्षण झालें होतें. तरी फर्डे इंग्रजी बोलून आपण साहेबांना गार करून टाकूं असा त्यांना आत्मविश्वास होता. कारण ते नेहमी म्हणत, "काय आमच्या वेळचं तें प्रायमर ! अहो, आत्ताच्या मॅट्रिकच्या पुस्तकांच्या तोंडांत मारील तें ! "

अखेरीस तो सोन्याचा दिवस उगवला आणि कलेक्टरसाहेब, लांब्या झग्यांतल्या त्यांच्या मेमसाब, निळा 'नेव्ही सूट' घातलेला आणि लाललाल मांसाच्या गोळ्याप्रमाणे दिसणारा 'बाबा' एवढी मंडळी आपल्या सर्व परिवारासह मुक्कर केलेल्या आंबराईंत येऊन दाखल झाली. गावांतल्या लोकांच्या

त्या दिवशींच्या उत्साहावरून कोणाला वाटलें असतें, की आज नरकचतुर्दशीच आहे. सर्व लोकांनी भल्या पहाटेस उठून आंघोळी वगैरे उरकून आपले सणासुदीचे कपडे पेहरले होते, आणि ऊन पडायच्या आधींच आंबराईपाशीं जमून सर्व लोक आदर व्यक्त करण्याइतक्या अंतरावर साहेबांच्या स्वागतासाठीं तयार राहिले होते. गावांतील सर्व बायका नटूनथटून एका वडाच्या झाडाखालीं येऊन बसल्या होत्या आणि तिथूनच त्या मेमसाहेबांच्या लांब्या झग्यावर टीका करीत होत्या किंवा 'बाबा'च्या लीलांचें कौतुक करीत होत्या. डोक्याला रुमाल बांधलेले आणि खांद्यावरून रेशीमकाठी उपरणें टाकलेले पांडोबा एखाद्या वरपित्याप्रमाणें शोभत होते. ते आणि गावांतील इतर कांही निवडक प्रतिष्ठित मंडळी यांनाच काय ती आंबराईच्या जवळ जाण्याची परवानगी होती.

"वेलकम् सर!" हात जोडून पांडोबांनी साहेबांचें स्वागत केलें.

"सु-स्वा-ग-त-म् म्हणा!" साहेब इंग्रजी ठेक्यांत पण मराठींत बोलले. "माझ्याशीं मराठींत बोला. कारण की, मी ती भाषा उत्तम प्रकारें ज्यानतों."

गांवच्या वेशीवरच्या शेंदूर फासलेल्या म्हसोबाला वाचा फुटली असती किंवा धोंडू कुंभाराच्या त्या तेथे उभ्या असलेल्या गाढवाने वेद म्हटले असते तर त्या खेडुतांना जितकें आश्चर्य वाटलें नसतें तितकें आश्चर्य साहेबांच्या मराठी बोलण्याने त्याना वाटलें. त्या धक्का देणाऱ्या गोष्टीने त्यांच्या मनांत उडविलेला गोंधळ चांगला पांचएक मिनिटें टिकला आणि मग नंतर एकएकजण हळूहळू शुद्धीवर येऊं लागला. आपले प्रायमर घोकण्याचे श्रम व्यर्थ गेलेले पाहून पांडोबाना जरासें वाईट वाटलें. कारण सबंध बेलगांवात इंग्रजी जाणणारा त्याच्याखेरीज दुसरा कोणी नव्हता. त्यामुळें साहेबांना खूष करण्याची संधि त्यांना एकट्यालाच मिळणार होती. पण साहेबांच्या मराठीच्या ज्ञानाने त्याचा तो मोका हुकला होता!

साहेबांच्या मराठी बोलण्याचें जरी बेलगांवच्या लोकांना आश्चर्य वाटलें असलें तरी वस्तुस्थिति आश्चर्य करण्यासारखी मुळीच नव्हती. लंडनला झालेल्या आय्. सी. एस्. च्या परीक्षेंत मराठी विषयांत इंग्लंडातले मराठीवर अधिकारवाणीने बोलूं शकणारे सुप्रसिद्ध पंडित डडले यांच्याकडून साहेबांना शेंकडा ऐंशी मार्क मिळाले होते. हिंदुस्थानांत आल्यावरसुद्धां त्यांचा मराठीचा शास्त्रशुद्ध

अभ्यास एका 'पंडिता'मार्फत चालूच होता. शिवाय ते आपले बटलर, पट्टेवाले वगैरे लोकांशीं मराठी बोलण्याचा सराव ठेवीत तें निराळेंच! त्यांची इतकी तयारी असल्यावर बेलगावच्या मुक्कामांतले आपले सर्व व्यवहार आपण मराठींतून पार पाडूं शकूं असा त्यांना आत्मविश्वास वाटत असल्यास आणि त्याप्रमाणे त्यांनी मराठींत बोलावयास सुरवात केली असल्यास त्यांत नवल करण्यासारखें कांहीच नव्हतें.

"षाबाष!" खेडुतांची गोंधळलेली मनःस्थिति लक्षांत येऊन साहेबांना मोठी गंमत वाटली. त्यांना आणखी गोंधळांत पाडण्याच्या उद्देशानें साहेब पुन्हा मराठींत बोलूं लागले, "तुम्हीं लोकांनी माझी व्यवस्था तर लई सुंदर ठेवली आहे. फार आभार! हो, पण तो गाढव कुठं आहे?"

आपलें कुशल विचारण्याच्या आधीं साहेबानी गाढवाची चौकशी करावी ह्याविषयी त्या गावकऱ्यांना जरा वैषम्य वाटलें. पुष्कळांच्या मनांत विचार आला, आपणच जर धोंडू कुंभाराच्या गाढवाच्या जन्माला आलों असतों तर काय बहार झाली असती! कदाचित् साहेब त्याला आपल्या गोऱ्यापान मांसल हातांनी थोपटतील, कुरवाळतील...

इतक्यात धोंडू कुंभारानें तीनचार दिवस खपून साबणानें घासून पुसून धुवून पांढराशुभ्र केलेला आपला धष्टपुष्ट गर्दभराज साहेबांपुढें उभा केला व साहेबांना त्यानें जमिनीपर्यंत लवून मुजरा केला. त्याचें गाढव साहेबांना पसंत पडणार अशी त्यालाच काय पण तेथें जमलेल्या सर्व बेलगांवकरांना खात्री होती. आपल्यासारख्या गरिबाच्या गाढवावर साहेबाची ती गौरमूर्ति विराजमान होणार म्हणून त्याला योग्य तो अभिमानहि वाटत होता. आतां साहेबांच्या त्या उंच व धिप्पाड देहाकडे पाहून आपल्या गरीब गाढवाच्या सुरक्षिततेबद्दल त्याला थोडीशी चिंता वाटली हें खरें, पण आपल्या गाढवाचा बळी देऊन जर गोऱ्या कातड्यांत अवतरलेला हा देव प्रसन्न झाला, तर एकच काय अशीं दहा गाढवें आपण घेऊं शकूं असा सुज्ञ विचार करून त्यानें पुढील प्रसंगासाठीं आपलें मन घट्ट केलें.

त्या गाढवाला साहेब आता काय करतात इकडे सर्वांचें लक्ष लागून राहिलें होतें. साहेबांनी त्या लंबकर्णाकडे एकदां निरखून पाहिलें आणि त्यांनी

सर्वांना आश्चर्यचकित करून सोडलें! ते म्हणाले, "हा गाढव मला नको. दुसरा गाढव आणा."

सर्व दृष्टींनी परिपूर्ण असलेल्या त्या गाढवांत साहेबांनी काय उणें शोधून काढलें–कोणालाच कल्पना करतां येईना! सर्व गावांत त्या गाढवाचा नंबर पहिला होता. धोंडू कुंभाराचें तोंड तर खर्‌कन् उतरलें! पण ती वेळ विचार करण्याची नव्हती. कलेक्टरसाहेबांचा हुकूम झाला होता. पांडोबांनी भराभर हुकूम सोडून जिकडेतिकडे माणसें पिटाळलीं. लवकरच एकजण दुसरें एक चांगलेसें गाढव घेऊन आला. हें तरी साहेबांना पसंत पडेल अशी सर्वांना आशा वाटत होती.

ह्या वेळपावेतों साहेबांच्या 'बाबा'ने रडावयास सुरवात केली होती. आयाने हात टेकल्यावर स्वतः मेमसाब त्याला समजावण्याचा प्रयत्न करीत साहेबां-जवळ उभ्या होत्या. साहेबांसमोर नवा गाढव उभा करण्यात आल्यावर त्याचीहि त्यांनी कसून तपासणी केली, व ते म्हणाले, "हा गाढवहि नको."

साहेबांचा नकार ऐकून सर्वजण परत घोटाळ्यांत पडले! साहेबांना कोणत्या तऱ्हेचें गाढव पाहिजे, ह्याची कोणालाच कल्पना करतां येईना! बरें, साहेबांना तसें विचारावें तर तेवढी हिंमतहि कोणाला होईना! कदाचित् 'बाबा'ला बसण्यासाठीं एखादें शिंगरू पाहिजे असेल ह्या कल्पनेने पांडोबांनी एक शिंगरू आणण्याचा हुकूम केला. इकडे वेळ जाऊं लागला तसतसें 'बाबा'चें रडणें अधिकाधिक रौद्र स्वरूप धारण करूं लागलें. मेमसाब आणि एवढे मोठे जिल्हाधिकारी खुद्द मेहेरबान कलेक्टरसाहेबहि नाना तऱ्हांनी त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न करीत होते. पण कांहीं केल्या 'बाबा'ची समजूत पडेना! साहेबांनीं त्याला इंग्रजींत 'काऊ चिऊ' दाखविले असावेत असा त्यांच्या आविर्भावावरून आणि त्यांनीं काढलेल्या निरनिराळ्या आवाजांवरून पांडोबांनी तर्क बांधला. त्यांचें तें पुत्रवात्सल्य पाहून पांडोबांच्या डोक्यांत विचार आला, मनुष्य कोठल्याहि देशांतला असो किंवा कितीहि उच्च पदावर असो, बालहट्टापुढे त्याचें कांहीं चालत नाहीं हेंच खरें! त्यांना आता आपल्या बंड्याची आठवण येणार इतक्यांत लोकांनी गाढवाचें एक शिंगरू आणून साहेबापुढें उभें केलें. गाढवाचें शिंगरू गोजिरवाणें

दिसतें असें म्हणतात, तरी मेमसाहेबांनी त्याच्याकडे पाहून नाक मुरडलें. साहेबहि जरा त्रासल्यासारखे दिसले आणि किंचित् रागाने ते म्हणाले, "मला लहान गाढव नको, मोठा गाढव पाहिजे."

परत एकदां धावपळ सुरूं झाली. थोड्याच वेळांत निरनिराळ्या प्रकारचीं पांचसहा गाढवें आणून साहेबांपुढे उभीं करण्यांत आलीं. पांडोबांनीं मनांतल्या मनांत परमेश्वराचा धावा करण्यास सुरवात केली, 'हे दयाघना ! माझ्या हातून जर भक्तिभावाने तुझी सेवा घडली असेल, तर ह्या पांचसहा गाढवांतलें एक तरी गाढव साहेबांच्या पसंतीला उतरूं दे !' परंतु दयाघनाच्या खातीं पांडोबांची पुण्याई पुरेशी नव्हती असें दिसतें ! कारण, साहेबांनीं त्या गाढवांकडे एकवार पाहिलें आणि ते संतापाने एकदम ओरडले, "मूर्खांनो ! मला ही गाढवं नकोत. हीं गाढवं माझ्यासारखीं आहेत. मला मेमसाबसारखा गाढव पाहिजे."

साहेबांनीं रागांत उच्चारलेलें हें वाक्य ऐकून आणि त्यांचा तो शेंदूर फासल्याप्रमाणें लाललाल दिसणारा चेहरा पाहून सर्वांच्या पोटांत धडकीच भरली ! परिस्थिति मोठी बिकट झाली होती. सर्वजण एकमेकांकडे टकमका पाहूं लागले. 'बाबा'ने तर आता आपलें रडणें सरळ पंचमांत सुरू केलें होतें !

सर्वजण स्तब्ध उभे राहिलेले पाहून साहेबांच्या रागाचा पारा आणखी वर चढला आणि ते ओरडून म्हणाले, "मूर्खांनो ! बघतां काय ? मी तुम्हाला सांगतों ना, कीं हीं सारीं गाढवं माझ्यासारखीं आहेत म्हणून..."

आता मात्र पांडोबांच्याने राहावेना. ते साहेबांना मध्येच अडवून हात जोडून बोलले, "छे छे ! साहेब, असं कसं होईल ? आपली आणि गाढवाची तुलना कशी करतां येईल ? सेवकाच्या हातून चूक झाली असल्यास क्षमा असावी. असं रागावूं नये, अशी आपल्या चरणांजवळ विनंती आहे. चूकभूल संभाळून घ्यावी."

"बंद करा !" (Shut up !) साहेब गजरले, "मी सांगतों ना, कीं हीं गाढवं माझ्यासारखीं आहेत म्हणून ! तीं नकोत. मेमसाहेबासारखं गाढव आणा."

परत तेंच ! आता काय करणार ? साहेब तर खवळले होते. 'बाबा'ने आकाशपाताळ एक करावयास सुरवात केली होती. मेमसाबहि संतापानें नाकपुड्या फुगवून 'काळ्या आदमीं'चा इंग्रजींतून उद्धार करीत होत्या. आतां काय करावें, कोणालाच कांहीं सुचेना ! साहेबांचा हा त्रागा पाहून पांडोबांना वाटलें, आपली सरकारकुनी आणि मामलेदारी राहिली बाजूला, आतां आहे ही नोकरी राहिली तरी बस्स आहे ! कांहींना शंका आली, साहेबांचें डोकें तर फिरलेलें नसेल ना ? शेवटीं पांडोबांनीं आपलें सर्व धैर्य एकवटलें आणि आपले लग्नामुंजींत वापरण्याचे ठेवणींतले कपडे मातींत मळतील ह्याची मुळींच पर्वा न करतां त्यांनी जवळजवळ शिरसाष्टांग नमस्कार घालून साहेबांना प्रश्न केला, "मेहेरबान, सर...विचारतों त्याची माफी असावी. पण गाढव आपणाला कोणत्या कामासाठीं पाहिजे हें जर आम्हांला सांगण्याची कृपा कराल तर तसं गाढव आम्ही मेहेरबानांना आणवून देऊं,–धाष्ट्यीची क्षमा असावी."

पांडोबांच्या नम्र विनंतीने साहेबाचा राग बराच कमी झाला. ते म्हणाले, "आमच्या 'बाबा'ला दूध पाजायचं आहे. आम्हीं त्याला गाढवाचं दूध पाजतों. म्हणून सागतों, की मेमसावसारखा गाढव पाहिजे. मूर्खांनो, माझ्या सारख्या गाढवाला दूध कसं येऊं शकेल ?"

साहेबानी हा खुलासा करताच सर्वांना ह्या गाढव-प्रकरणाचा उलगडा झाला. लवकरच साहेबापुढे दोनतीन दुभत्या 'मेमसावसारख्या' गाढव्या उभ्या करण्यांत आल्या आणि जिकडेतिकडे परत आनंदीआनंद झाला.

गर्दभराजाच्या पत्नीला मराठींत 'गाढवी' म्हणतात हें साहेबांना ठाऊक नसल्यामुळें हा सर्व घोटाळा झाला !

बाबूरावांनीं सांगितलेली गोष्ट ऐकून आम्हां सर्वांच्या हसूनहसून मुरकुंड्या वळल्या. हसणें ओसरल्यावर बाबूराव म्हणाले, "सारांश काय ? तर इंग्रजी बोलतांना जशा आपल्याकडून चुका होतात तशाच परकीयांच्याहि मराठी किंवा हिंदी बोलताना होतात. तेव्हा त्यांत एखाद्याची टिंगल उडवण्यासारखं कांहीं नाही. कितीहि झालं तरी परकी भाषा ती परकी भाषा.'

# एक इंच आणि एकच सेकंद : :

ता. १४-४-४४ रोजीं सकाळीं मी उठलों तेव्हा मी एक क्षुद्र माणूस होतों. चाळींतील आमच्याच मजल्यावरील बिऱ्हाडकरू आणि ऑफिसांतील माझे सहकारी कारकून येवढ्या लोकातच काय तें माझं नांव तोंवर प्रसिद्ध होतं; पण त्या दिवशीं संध्याकाळीं मुंबईंत कारनॅकबंदरावर दोन मोठे स्फोट झाले आणि रात्रींपर्यंत मी एक सुप्रसिद्ध व्यक्ति होऊन बसलों. आमची चाळ असलेल्या प्रार्थनासमाजाच्या नाक्यापासून तों थेट केनेडी ब्रिजपर्यंतच्या साऱ्या चाळींतून ज्याच्यात्याच्या तोंडी जवळजवळ आठएक दिवस माझंच नांव झालं होतं. स्फोटांमुळं कुणाकुणाच्या घरांत सोन्याच्या विटा येऊन पडल्या असं म्हणतात; माझ्या घरीं मात्र अचानकपणें कीर्तीची वीट येऊन पडली खरी!

त्या दिवशीं दुपारीं तीनानंतर मी कारनॅकबंदरला चतुर्भुज खैसीच्या पेढीवर कांहीं महत्त्वाच्या कामाकरतां गेलों होतों. आमचं काम ऐन रंगांत आलं असतांना साधारण चार वाजतां एक मोठा आवाज झाला आणि चतुर्भुज-शेठची पेढी हादरली. आम्हीं दोघांनीं एकमेकांकडे प्रश्नार्थक दृष्टीनं पाहिलं आणि पूर्ववत् आपल्या कामाला लागलों. साधारण पंधरावीस मिनिटांनीं आणखी एक तसाच मोठा आवाज होऊन आणि भूकंप झाल्यासारखी जमीन हादरून आमच्या कामांत पुन्हा व्यत्यय आला. पण माझं काम अतिशय

महत्वाचं म्हणजे पैसे घेण्याचं असल्यामुळं आणि तें जवळजवळ संपत आलेलं असल्यामुळं मीं तिकडे दुर्लक्ष केलं आणि पांचएक मिनिटांत काम आटोपून बाहेर पडलों.

बाहेर येऊन पाहतों तों रस्त्यावर एकच गोंधळ माजलेला! लोक सैरावैरा धावत होते. दुकानदार घाईघाईनं आपलीं दुकानं बंद करीत होते. कित्येक दुकानांना आधीच टाळीं लागलीं होतीं. पळून जाऊं पाहणाऱ्या शेट्यांना गाडीवाले स्वप्नांतहि खरीं वाटणार नाहींत अशीं भाडीं सांगत होते. सर्वत्र धमाल उडाली होती. काय भानगड झाली असावी ह्याचा विचार करीत मी गल्लीच्या नाक्यापर्यंत येऊन पोचलों. इतक्यांत समोरून बंडोपंत घाबऱ्याघाबऱ्या धावत येतांना दिसले. माझी त्यांची विशेषशी ओळख नव्हती; पण त्या गडबडींत बंधुभावाला बराच पूर आलेला दिसला. त्यांनी माझा हात प्रेमावेगानं दाबून मला विचारलं, "का हो, कुठून आलांत?"

" जरा कारनॅकबंदरला गेलों होतों."

" अरे बापरे!" माझ्या देहाचं आपादमस्तक सूक्ष्म निरीक्षण करून त्यांनी विचारलं, "सुखरूप आहांत ना?"

त्यांच्या ह्या विचित्र वागणुकीचा मला अर्थ कळेना! मीं जरा करड्या आवाजांत माझी प्रकृति अगदी ठणठणीत असल्याची त्यांना जाणीव करून दिली.

" काय? काय गडबड झाली तिकडे?" त्यांनी मोठ्या उत्सुकतेनं प्रश्न केला.

" गडबड?" मी विचार करून म्हटलं, " अं...कांहीतरी गडबड झाली खरी!"

" कसले तरी स्फोट झाले म्हणतात!"

" स्फोट? असेल. पण मला वाटतं बहुधा ते धरणीकंपाचे धक्के असावेत. मधूनमधून बसतात धरणीकंपाचे असे धक्के कधीकधी!"

माझ्या ह्या उत्तरानं बंडोपंतांची निराशा झालेली दिसली. ह्या वेळपावेतों आमच्याभोवतीं पांचसहाजणांचा घोळका जमला होता. तेहि माझ्याकडे रागानं पाहात असल्याचा मला भास झाला.

इतक्यांत एक गुजराथी हातांत धोतराचा सोगा धरून व तोंडानं " भागो, भागो " असा उपदेश करून तो आपल्या पायांनीं अत्यंत चपळाईनं कृतींत उतरवीत आमच्यासमोर धापा टाकीत येऊन उभा राहिला. माझ्याभोवतालचा घोळका एकदम त्याच्याकडे वळला. कांहींनी त्याला विचारलं, " केम भाई ? शूं थयूं ? "

" शूं थयूं ? अरे मारा बाप रे ! " आपण कोणीतरी 'आहोंत,' अशा आविर्भावांत तो धापा टाकण्याच्यामध्यें जो वेळ मिळे त्याचा उपयोग करून म्हणाला, " लइ मोटा धसका बसला ! दोन जहाज आख्खा अस्मानमंदीं उडून गेला ! "

आम्हां सर्वांच्या चेहऱ्यांवर भीति, आश्चर्य इत्यादि विकार उभे राहतांच त्याचा चेहरा अभिमानानं फुलून गेला. नंतर आपला सोगा उचलून त्या बातमीचा प्रसार करण्याकरतां तो पुन्हा वायुवेगानं निघाला.

कसले स्फोट झाले असावेत आणि दोन जहाजांनी आकाशांत कां उड्डाण केलं असावं, मला कांहीच कळेना ! मी ह्यावर विचार करीत जरा पुढं गेलों तों पांचसहाजणांचा एक जमाव उभा होता त्यानं मला अडवलं.

" काय राव ! कुठून आलांत ? " एकानं मला विचारलं.

" कारनॅक बंदरहून. " मीं आपलं सहज उत्तर दिलं.

" कारनॅक बंदरहून ? " सर्वांच्या तोंडून एकच कौतुकोद्गार बाहेर पडला, आणि औरंगजेबाच्या डेऱ्याचे कळस कापून आणणाऱ्या संताजी घोरपड्याकडे त्यांनी ज्या दृष्टीनं पाहिलं असतं त्या दृष्टीनं ते माझ्याकडे पाहात राहिले.

" काय ? काय हकीकत आहे तिथली ? " आश्चर्याचा, कौतुकाचा व माझ्याविषयींच्या आदराचा भर जरासा ओसरल्यावर एकानं मला विचारलं.

" स्फोट झाले म्हणतात बुवा तिकडे, आणि दोन बोटीहि काय आकाशांत उडाल्या की काय झालं म्हणतात. " मी म्हणालों.

नाटकाच्या खेळांत एखादा प्रसिद्ध नट भूमिका करणार आहे अशी खूप जाहिरात केलेली असावी आणि ऐन प्रयोगाच्या वेळीं तो नट गैरहजर राहावा, म्हणजे मग नाटक कंपनीच्या मॅनेजरविषयी जें वाटतं तसा भाव त्या लोकांनीं माझ्याकडे पाहून व्यक्त केला. नंतर एकजण म्हणाला, " तें माहीत आहे हो !

पण तुम्ही कारनॅक बंदरहून आलां म्हणतां, तर तुम्हांला आणखी काय माहिती आहे ती सांगा. किती लोक मेले ? ”

“ किती लोक मेले ? ” मीं आठवण करून खरं सांगितलं, “ मला तर कुत्रंदेखील मेलेलं दिसलं नाहीं ! ”

“ किती घरं कोसळलीं ? ” दुसऱ्या एकानं जरा रागानंच विचारलं.

“ एकसुद्धा पडकं घर दिसलं नाही मला ! ”

आता मात्र त्याची दारुण निराशा झालेली दिसली. ह्यावेळीं जर त्यांच्या-जवळ भर्जी नाही तर कुसकीं अंडीं असतीं, तर खात्रीनं त्यांनी तीं माझ्यावर फेकलीं असतीं.

“ काय हो ? कारनॅक बंदराहूनच आलांत ना तुम्ही ?” एकानं विचारलं.

“ का ठाण्याहून पळून बिळून आलांत ? ”– दुसरा एकजण.

“ पाहूं. आंधळे तर नाही ना तुम्ही ? ”– तिसऱ्याची शंका.

हा सारा प्रकार काय आहे आणि हे सारे लोक माझ्यावर एकाएकी इतके कां चिडलेत, मला कांहींच कळेना ! माझी मस्करी करीत ते हळूहळू मला खेटूं लागले होते. पुढं काय करण्याचा त्यांचा विचार होता कुणास ठाऊक ! पण तेवढ्यात एक मारवाडी कारनॅक बंदराच्या बाजूनं आपला जीव आणि पोट घेऊन धांवत आला.

“ अरे मेरो बाप रे ! ” तो कपाळावर हात मारून घेऊन म्हणाला, “ काय झाला ये समदा ! मरी गयो रेऽ ! ”

माझ्यावर चिडलेल्या लोकांची कळी खुलवण्यासारखं त्याच्या ह्या भाषणांत काय होतं कुणाला ठाऊक ! पण त्यामुळं मी एकदम ‘ बॅकग्राऊंड’मध्यें पडलों. आणि साऱ्यांनी त्याच्याभोंवती गर्दी केली.

“ काय ? काय झालं शेठजी ? ” सर्वांनी एकच गिल्ला केला.

“ बाप रे ! ” आपल्या अंगांतील चरबी एखाद्या गायीप्रमाणं शहारून शेठजी म्हणाले, “ दहापंधरा हजार माणूस तरी मेला ! ”

आता तर सर्व श्रोत्यांचे चेहरे सूर्यफुलाप्रमाणं फुलले. त्यांनी विचारलं, “ आणखी ? आणखी ? ”

“ मीच तर पंधरावीस मुडद्यांना तुडवून आलों ! ”

" बापरे ! " एकच कौतुकोद्गार.

आता ह्यापुढं शेठजी आणखी कांही सांगणार इतक्यांत " आग, आग " असा एकच ओरडा झाला आणि आगीचा एक बंब घणघणत निघून गेला !

आग कुठं लागली आहे, हें पाहण्याकरता मी दाही दिशाना दृष्टि फिरवली, पण मला त्या भागांतील प्रचंड इमारतींखेरीज दुसरं कांहींच दिसलं नाही.

कोणतंहि वाहन परवडणं शक्य नसल्यामुळं प्रार्थनासमाजपर्यंत चालत जाणंच मला भाग होतं. काळबादेवी रोडवर कृष्णाजीपंत भेटले. " कुठून आलां? " असं त्यांनी विचारलं. " कारनॅकबंदर " हा शब्द माझ्या तोंडून बाहेर पडतांच अर्धा फर्लांग परिघांतलीं पन्नासएक माणसं एकदम माझ्याभोंवतीं गोळा झालीं. खरी परिस्थिति जाणून घेण्याची त्यांची ती आतुरता पाहून जरी मला आनंद होत असला तरी आतापर्यंतच्या अनुभवावरून माझीं उत्तरं ऐकून त्यांची जबर निराशा होणार ह्या विचारानं मला जरा वाईट वाटलं. स्फोटाच्या अनर्थातलं माझ्या दृष्टीला जर कांहीं पडलंच नव्हतं, तर मी सांगणार तरी काय कपाळ ! कांही विचित्र योगायोगानं स्फोटाच्या वेळीं मी असलेल्या भागांत येवढंसुद्धां नुकसास झालेलं दिसत नव्हतं !

" कां हो, किती माणसं मेलीं ? " कृष्णाजीपंतांनी पृच्छा केली.

" पंधरा हजार ! " हा शद्ब अगदी माझ्या ओठांशीं आला होता. पण आतापर्यंत अतिशयोक्ति अलंकाराची जी लोकप्रियता माझ्या दृष्टीस पडली होती आणि माझ्या श्रोत्यांनी माझ्या उत्तराचं स्वागत करण्याकरता आपले कान ज्या पवित्र्यांत ठेवले होते, तें पाहून तो आकडा थोडासा फुगवून सांगणं मला मुत्सद्देगिरीचं वाटलं. चाचरत चाचरत मी म्हणालों, " वीस हजार तरी मेले असतील ! पंचवीस मुडदे मी पळतांना तुडवून आलों ! "

पण माझ्या अपेक्षप्रमाणं ह्या उत्तरानं माझा जयजयकार झाला नाही. दबलेल्या आवाजांत त्या जमावानं आपसांत कांहीतरी चर्चा केली. कृष्णाजीपंत आश्चर्य दाखवून म्हणाले, "काय ! वीसच हजार ? मीं तर ऐकलं तीस हजार म्हणून ! "

" अरे, तीस कसला, चांगला च्यालीस हजार माणूस मेला ! " एक शेटिया आपली ढेरी सावरीत व मला बाजूला सारून व्यासपीठाचं स्वामित्व

बळकावीत म्हणाला. त्याबरोबर जमावाच्या तोंडून जे चीत्कार बाहेर पडले त्यांवरून मीं ओळखलं, की त्या शेठ्यानं सभा जिंकली आहे. मग मीहि वीर, रौद्र, भयानक, बीभत्स इत्यादि रसानी उतूं जाणारं त्याचं भाषण श्रोत्याची भूमिका पतकरून ऐकूं लागलों. तो आपल्या भाषणांत म्हणाला—

"अरे, च्यार हज्जार बिल्डिंग तरी खलास झ्याला. आख्खी मांडवी जळून ख्खाक झ्याली! फायर ब्रिगेडच्या एकबी माणूस शिल्लक नाय. आता पूनामंदून फायर ब्रिगेड बोलावला हाय. मी तर इतक्यामंदीं चुकलां (ह्या वेळीं तो आपल्या लठ्ठ बोटाचं एक पेर दाखवी) नाहीतर खलास झाला असता! धसका लागला तवा मी एकदम टेबलाखाली बसलों. एकच मिनिटानं च्युकलों नाहींतर जहाजाचा एक पत्रा उडून आला होता त्येच्याखाली मेलोंच असतों...."

बहुधा तो शेठ्या गुजराथी साहित्यांतला एखादा प्रतिभाशाली लेखक असावा. जवळजवळ तासभर श्रोत्यांना मुळीच कंटाळा येऊं न देतां त्यानं रौद्र, भयानक, अद्भुत वगैरे सर्व रस आपल्या जिभेच्या टोकावर खेळविले होते. मीहि त्याच्यापासून श्रोत्यांची उत्सुकता ताणतताणत कशी न्यावी व त्यासाठीं शब्दप्रयोग कसे मोजके करावे, ह्याचं तंत्र लघुकथालेखनाच्या दृष्टीनं मनांत टिपून ठेवलं. विशेषतः "एकच इंच" आणि "एकच सेकंद" हे शब्दप्रयोग मला फारच आवडले.

आमच्या चाळीच्या दरवाजाशीं मी पोचेपर्यंत रात्री नऊ झाले. दर फर्लांग अर्ध्या फर्लांगाला मला कोणीतरी हटकी आणि माझ्याकडून चक्षुर्वैसत्यम् हकीकत काढून घेण्याचा प्रयत्न करी. आतापर्यंत मी जरी सत्यकथनाचा हट्ट सोडलेला असला व अतिशयोक्ति वारेमाप करूं लागलों असलों तरी दर वेळेला माझी अतिशयोक्ति तोकडी पडल्याचाच मला अनुभव येत गेला. नव्या वाडींत मीं सांगितलं, की "पन्नास हजार माणसं मेलीं" तर तिथला माणूस हिरमुसला होऊन म्हणाला, "आम्हीं तर ऐकलं की साठ हजार म्हणून!" जणु काय बातमीची व माझी शर्यत लागली होती आणि दर वेळेला

मी हार खात होतों! येवढंच नव्हे, तर बातमी क्षणाक्षणाला विराट स्वरूप धारण करीत होती. खुद्द कारनॅकबंदरच्या लोकांना माहित नसतील अशा कितीतरी बातम्या मला ठाकुरद्वारला कळल्या! आतापर्यंत पुण्याची फायर-ब्रिगेडहि खलास झाली होती, आणि नाशिक, बेळगांव, अहमदाबाद वगैरे ठिकाणीं बंब पाठविण्याविषयीं तारा गेल्यां होत्या! स्फोटाची कारणमीमांसाहि तयार झाली होती; पण नक्की कारणाविषयीं अजून जरा मतभेद होता. शत्रुच्या कृत्यामुळंच स्फोट झाला ह्याविषयीं जरी सर्व मीमांसकांची एक-वाक्यता असली तरी कांहींच्या मतें जपानी विमानांनी बोटींवर बॉंबचा वर्षाव केला होता, तर कांहींच्या मतें जपानी पाणबुड्यांचा एक काफिला ह्या अनर्थाच्या बुडाशीं होता. आतापर्यंत पंधरा जहाजं बुडालीं होतीं आणि वीस हजार अमेरिकन शिपायांनी समुद्राचा तळ गाठला होता! आग पसरत पायधुणीपर्यंत आली होती, आणि ही हकीकत सांगणारा प्रत्येकजण 'एकच इंचानं' आणि 'एकच सेकंदानं' ह्या अनर्थातून केवळ देवाचा लाडका असल्यामुळं बचावला होता!

मी चाळीच्या महाद्वाराशीं येऊन पोचलों तेव्हा माझी मनःस्थिति मोठी विचित्र झाली होती. ऐन स्फोटाच्या वेळीं देवानं मला कारनॅकबंदराला नेऊन स्फोटांत सापडण्याची संधि दिली होती; पण मी येवढा अभागी, की कुठंहि न खरचटतां, फार कशाला, अनर्थाचा एकहि प्रसंग माझ्या आसपास न घडतां मी त्यांतून सहीसलामत सुटलों होतों! मी स्वतःला एक मोठा कल्पक लेखक समजत होतों; पण अतिशयोक्ति अलंकार तयार करण्याच्या बाबतींत माझी प्रतिभा आणि कल्पकता थोटी पडत असल्याची मला खात्री पटली होती. ह्याच निराशाजनक विचारांत चाळीचे दोन जिने चढून मी आमच्या बिऱ्हाडाच्या मजल्यावर येऊन पोंचलों. कपाळावरचा घाम पुसून काढण्याकरता शेवटच्या पायरीवर मी जरासा थांबलों आणि नंतर पुढील प्रवासास लागण्यापूर्वी गॅलरींत नजर टाकली, तर मी आश्चर्यचकितच झालों!

गॅलरी माणसांनी फुलून गेली होती. गर्दीचा सर्वांत बाहेरचा थर तरुणांचा होता. माझ्या खोलीच्या आसमंतांत गर्दीचं केंद्र होतं. आणि तिथं चाळींतील म्हाताऱ्या शिष्टांचीं शिबिरं होतीं. अश्वत्थाम्याचा वध झाल्यावर कौरवांच्या

शिबिरांत कृपाचार्य, द्रोणाचार्य वगैरे मंडळी जसे चेहरे करून बसली असतील तसे त्यांनीं चेहरे केले होते. एखाददुसरी बाई ह्या गर्दीतून वाट कापीत माझ्या खोलींत अदृश्य होतांना मला मधूनमधून दिसे, त्यावरून माझी खोली खास कु. स्त्रियांकरिता राखून ठेवण्यांत आलेली असावी अशी मीं अटकळ केली.

ही गर्दी इथं कां जमली असावी मला कळेना. पहिला विचार माझ्या डोक्यांत आला तो असा, कीं माझ्या अगदीं निकटच्या शेजाऱ्यापैकीं कोणीतरी ह्या स्फोटांत बळी पडला असावा! आतापर्यंत बळींची संख्या पाऊण लाखापर्यंत येऊन पोचली होती व त्या पाऊण लाखांत माझ्या शेजाऱ्यांपैकीं एखाद्याचा नंबर लागणं कांहीं अगदींच अशक्य नव्हतं. दुसरी एक सुखकारक शंका माझ्या मनाला जराशी चाटून गेली ती अशी, की एखादी सोन्याची वीटबीट तर माझ्या खोलींत येऊन पडली नसेल ना? पण इतक्यांत गर्दीच्या सीमाप्रांतांतील तरुणांच्या दृष्टीस मी पडलों आणि 'आले आले' ह्या शद्वाचं लोण तिथं उगम पाऊन माझ्या खोलीपर्यंत गेलेलं मला ऐकूं आलं. हा प्रकार पाहून मला शंका आली, आज इथं एखादी दुखवट्याची सभा तर नाहीं ना? आणि आपण तिचे नियोजित अध्यक्ष असून कधींहि वेळेवर न येण्याचा अध्यक्षांचा अलिखित नियम तर पाळलेला नाहीं ना? पण मी असा विचार करीत आहे, तो कृष्णाला डोक्यावर घेऊन जाणाऱ्या वसुदेवाला वाट देण्याकरतां यमुना नदी जशी फाटली तशी क्षणार्धात गर्दी दुभंगून मला जाण्याकरता वाट झाली. ह्या माझ्या अनपेक्षित सन्मानानं आणि सर्वांनीं माझ्यावर रोखून लावलेल्या दृष्टींनी मघाच्या निराशाजनक विचारांनी माझ्या मनांत उडविलेला गोंधळ अधिकच वाढला. त्या गर्दीतील पाऊलवाटेनं जड पावलं टाकीत मी आपल्या खोलीचा प्रवास पुरा केला, आणि माझ्याकरता एक आरामखुर्ची झटपट मांडण्यांत आली तीवर टाचणी पडली तरी ऐकूं येईल अशा शांततेत स्थानापन्न झालों.

माझ्या अर्धांगीकडे मीं पाहिलं. कुरुक्षेत्रावरून कांहींहि शारीरिक मोडतोड न होतां परत आलेल्या वीर पतीकडे पाहावं, तशा दृष्टीनं ती माझ्याकडे डोळे भरून पाहून घेत होती. रडूनरडून तिचे डोळे सुजून आले होते. चाळींतील

एकदोन स्त्री-पुढाऱ्यांनी तिला आपला आधार दिला होता. मघां वर्णन केलेल्या निराशाजनक विचारांनी दुःखी झालेली माझी मुद्रा पाहून किंवा प्रेमाचं भरतं येऊन तिला हुंदका अनावर झाला आणि ती मुसमुसून रडूं लागली.

थोड्याच वेळांत हा नायकनायिकेच्या मीलनाचा करुणरसात्मक प्रवेश आटोपल्यावर माझी विचारपूस सुरू झाली. मी कारनॅकबंदरला गेलों आहें आणि आठ वाजून गेले तरी माझा पत्ता नाही अशी बातमी माझ्या पत्नी-मार्फत साऱ्या चाळींत पसरली होती, व त्या बातमीमुळं उडालेल्या खळबळीनं सारी चाळ स्फोटांतल्याप्रमाणं हादरत होती! सर्व चाळकरूंनी आपलीं जेवणं भराभर उरकून घेतलीं होतीं, आणि वरपांगीं माझ्या बायकोला सहानुभूति दाखविण्याच्या मिषानं, पण कारनॅकबंदरच्या स्फोटाचा परिणाम आपल्या चाळींत एवढया जवळ झालेला असावा ह्या कल्पनेनं आनंदून, ही सारी गर्दी जमली होती. माझे किती तुकडे झाले असतील, माझा हात कुठं असेल, माझे पाय कुठं असतील, ह्याविषयीं त्याची चर्चा चालली होती. पण आता माझा धडधाकट देह आरामखुर्चीवर स्वस्थ पहुडलेला पाहून मी कारनॅकबंदरला खरोखरीच गेलों होतों की नाही ह्याची कित्येकांना शंका वाटत असलेली दिसूं लागली. मला जिवंत पाहून वाटणाऱ्या निराशेचं प्रतिबिंब कित्येकांच्या चेहऱ्यांवर दिसत होतं. लवकरच स्फोटाविषयींची चक्षुर्वैसत्यम् हकीकत माझ्या तोंडून वदवून घेण्याकरता मला प्रश्न विचारले जाऊं लागले! त्यांच्या प्रश्नांचीं उत्तरं देण्यापूर्वी मी थोडा वेळ स्वस्थ बसून राहिलों. लोकांना वाटलं, ज्या भयंकर प्रसंगांतून मी नुकताच बाहेर पडलों होतों त्याच्या आठवणीनं मी बावरून गेलों असेन. त्यामुळं ते मला धीराचे चार शब्दहि सुनवीत होते. पण खरं पाहतां मी माझं उत्तर मनांतल्या मनांत जुळवीत होतों. आतापर्यंत गर्दीच्या मानसशास्त्रांत (मॉब मेंटॅलिटी) मी एखाद्या सिनेमा डायरेक्टराइतका तज्ञ झालों होतों. सामोशाप्रमाणं बातमींतहि मीठमसाला भरपूर असावा लागतों हें मी जाणलं होतं. अतिशयोक्ति अलंकाराची ह्या तीन तासांत इतकीं उदाहरणं माझ्या कानांवर पडलीं होतीं आणि त्या अलंकाराबद्दलची जनतेची आवडहि मला इतकी दिसून आली होती, की माझ्या जिभेच्या अग्रावर तो दागिना चढविण्यांत मी आता गर्क झालों होतों. मला असा धडाकेबाज, रोमांचकारी

आणि दिलखेचक चक्षुर्वैसत्यम् वृत्तान्त कथन करायचा होता, की नादियाचा स्टंट-पट चालू असतां पिटांतून ज्या प्रकारचे आवाज निघतात, तसे आवाज मला माझ्या श्रोत्यांच्या तोंडून काढावयाचे होते! मी जिवंत आलेला पाहून माझ्या शेजाऱ्यांची जी निराशा झाली होती तिची मला भरपाई करायची होती.

आणि नंतर माझी प्रतिभा आणि कल्पकता राबवून मीं जो वृत्तान्त कथन केला, त्यामुळंच माझ्या कीर्तीची मुहूर्तमेढ रोवली गेली. नंतर फक्त जेवणाकरता पांचएक मिनिटं सोडून, पहाटे चार वाजेपर्यंत श्रोत्यांच्या निरनिराळ्या तुकड्यांना अद्भुत, वीर, करुण, रौद्र वगैरे रसांनी भरलेले माझे अनुभव मी सांगत होतों. माझे ते अनुभव इतके लोकप्रिय झाले, की त्यानंतर पंधराएक दिवस केवळ ते अनुभव माझ्या तोंडून ऐकण्याकरतांच मला दादर-कुर्ल्यापासून तों कल्याणपर्यंत रोज चहाचीं आमंत्रणं येत होतीं. त्या रात्रीं तर बाहेर गॅलरींत श्रोत्यांचा 'क्यू'च लागला होता. पहाटे चाराच्या सुमारास केनेडी ब्रिजजवळच्या इराणी बिल्डिंगमधील श्रोत्यांच्या शेवटच्या तुकडीला मी स्फोटाची जी चक्षुर्वैसत्यम् हकीकत सांगितली, तिचा सारांश असा—

"साधारण दुपारीं तीन वाजतां पोर्टट्रस्टमधील माझ्या आतेभावाला भेटण्याकरता मी कारनॅक बंदरच्या गोदीवर गेलों होतों. काम आटोपल्यावर दारुगोळ्यानं भरलेल्या बोटी दाखवण्याकरता तो मला धक्क्यावर घेऊन गेला. इतक्यांत आकाशांत शत्रुचीं चार विमानं घिरट्या घालीत असलेलीं त्यानं मला दाखवलीं. त्याच वेळीं दूरवर समुद्रांतून पंधरा पाणबुड्यांचे पेरिस्कोप आमच्याच दिशेनं येत असलेले मीं त्याला दाखवले. एक पाणबुडी हळूहळू समुद्राच्या पृष्ठभागावर आली. तिच्या कोनिंग-टॉवरवर चपट्या नाकाचा, चष्मा लावलेला आणि दात विचकीत उभा असलेला जपानी कॅप्टन मी त्याला पहावयास सांगत होतों. तो तिकडे पाहणार इतक्यांत दारूगोळ्यानं भरलेल्या एका जहाजावर भयंकर स्फोट झाला. हाच तो पहिला स्फोट. (नंतर स्फोटाचं भयानक वर्णन.) स्फोट होतांच मी एकदम जमिनीवर पालथा पडलों. माझा आतेभाऊ

काय करावं हें न समजून पळावयास लागला. पण पळतांना मला अडखळून तो बरोबर माझ्याच अंगावर पडला. त्याबरोबर एक मोठा लोखंडाचा फाळा येऊन त्याच्यावर आदळला. थोड्या वेळानं मीं उठून पाहिलं तों तो गतप्राण झाला होता. माझ्यावर पडायला त्याला एकच सेकंद उशीर झाला असता तर मीच खलास झालों असतों ! मी अगदी एकाच सेकंदानं बचावलों. नंतर मी धक्क्यावरून बाहेर पळूं लागलों, तों फाटकाशी एका पहारेकऱ्यानं मला अडवलं. त्याच्याशीं मी हुज्जत घालीत आहे तों दुसरा भयंकर स्फोट झाला, व लोखंडाचा एक लाललाल गोळा येऊन त्या पहारेकऱ्याच्या डोक्यावर आदळला. एकाच इंचानं चुकलं नाहींतर माझाच कपाळमोक्ष व्हायचा !... फायर ब्रिगेडचा तर अर्धासुद्धां माणूस शिल्लक नाहीं... आता दिल्लीहून फायर ब्रिगेड बोलावली आहे ...आग ठाकुरद्वारपर्यंत आली आहे. हायकोर्टाची इमारत कोसळून पडली आहे...मी जीव घेऊन पळालों, तेव्हां निदान पन्नास प्रेतांवरून तरी उड्या मारून आलों. रस्त्याच्या दोन्ही बाजूंना इमारती सारख्या कोसळत होत्या... गाडीचा उडून गेलेला एक घोडा एका बिल्डिंगच्या गच्चीवर उभा होता...माझ्याभोवतीं बायकांचीं डोकीं, हिंदूंचे हात आणि मुसलमानांचे पाय ह्यांचा नुसता पाऊस पडत होता. रस्त्यांवर प्रेतांबरोबरच हिऱ्यामोत्यांचे खच पडले होते...माझा अंदाज आहे, कीं तीन लाख तरी माणसं मेलीं असावीत ... अखेरीस पांचशे रुपये देऊन एक टॅक्सी करून मी गिरगांवांत आलों... मी मात्र एकच इंचानं आणि एकच सेकंदानं बचावलों !...."

# सहा मास्तर आणि एक मास्तरीण : :

**पांच** सहा वर्षांपूर्वी आमची शाळा नवीनच निघाली तेव्हां तींत आम्ही दहा मास्तर होतों. त्यांतले चार वृद्ध किंवा वयस्क ह्या सदरांत मोडणारे होते, आणि आम्ही सहाजण नुकतेच विश्वविद्यालयाची पदवी घेऊन बाहेर पडलेले तरुण होतों.

पहिलीं दोनतीन वर्षं आम्हीं सहाजणांनीं मोठ्या खेळीमेळीनं नि आपुलकीच्या भावनेनं काढलीं. जणुं काय आम्ही सहाहिजण एकाच कुटुंबांतील माणसं होतों. सर्वजण अगदीं एकविचारानं चालत. कोणालाच कोणाविषयीं द्वेष वाटत नव्हता. कोणीहि कोणाची थट्टामस्करी केली तर त्यांत मत्सर नसायचा. प्रत्येक जण दुसऱ्याशीं पूर्ण खिलाडू वृत्तीनं आणि शुद्ध मैत्रीच्या भावनेनं वागायचा.

मधून मधून आम्ही ट्रिप्स काढीत असूं. रोज संध्याकाळीं शाळेंतच व्हॉली-बॉल नाहींतर दुसरे कांही खेळ खेळत असूं. सुट्टीच्या दिवशीं पत्ते खेळत असूं, आणि कधींकधीं चांदण्यांत फिरावयास जात असूं. आमच्यांतील कोणी आजारी पडल्यास त्याची शुश्रुषा करीत असूं, किंवा कोणाची कांहीं अडचण असल्यास ती दूर करण्याचा शक्य तेवढा प्रयत्न करीत असूं.

त्याचप्रमाणं शाळेचं कामहि आम्ही सर्वजण अत्यंत उत्साहानं आणि मन लावून पार पाडीत असूं. नव्यानव्या कल्पना काढून आमची शाळा लोकप्रिय

करण्याची आम्ही कोशिस करीत असूं. लोकाग्रहास्तव आमची शाळा वाढवणं आम्हांला भाग पडलं, हें त्याचंच दृश्यफल होय.

आतांपर्यंत आमच्या शाळेंत फक्त इंग्रजी शिक्षणाचीच सोय होती. परंतु नव्या योजनेप्रमाणं लहान मुलांसाठीं मराठी चार वर्गहि उघडण्याचं आम्हीं ठरवलं होतं. आणि त्याप्रमाणं लवकरच एक 'सरस्वती-मंदिर'हि आमच्या शाळेला जोडण्यांत आलं.

आणि त्यांतूनच निर्माण झालेल्या एका घटनेनं आम्हां सहा जणांतला एकोपा कांहीं काळ नष्ट झाला. साधारण एक वर्षभर आम्ही एकमेकाला पाण्यांत पाहूं लागलों.

ह्याला कारण अर्थातच नेहमीप्रमाणं एक स्त्री होती.

ह्या सरस्वती-मंदिरासाठीं जी मास्तरीणींची नवी भरती करण्यांत आली होती, त्यांत मिसेस सुधाबाई रानडे ही एक विधवा स्त्री होती. मॉंटेसरी पद्धतीनं लहान मुलांना शिकवण्याचं खास शिक्षण घेऊन सुधाबाई आली होती. आपल्या आनंदी स्वभावामुळं आणि हंसत खेळत शिकवण्याच्या पद्धतीमुळं ती बाल-गोपालांची लवकरच आवडती झाली, ह्यांत कांहींच नवल नव्हतं. पण तिनं आम्हां सहा तरुण मास्तरांनाहि थोड्याच काळांत चटका लावून सोडला.

तशी ती सुंदर होती अशांतला भाग नव्हता. एखाद्या कवीनं तिच्या रुपाची चिकित्सा केली असती तर तिचं तें किंचितसं फुगीर नाक चाफेकळी-सारखं नाहीं असं त्यानं सांगितलं असतं. जपान्यांच्या डोळ्याप्रमाणं दिसणाऱ्या तिच्या त्या बारीक आणि तिरप्या डोळयांची ओढूनताणूनहि त्याला कमळाशीं तुलना करतां आली नसती. मग गालांवरच्या गुलाबांची गोष्ट तर दूरच राहिली. तिच्या पाठीवर ( जिला किंचितहि बांक आलेला नव्हता ) शेपट्याच्या रूपानं खेळत असलेली नागीणहि त्याला दिसून आली नसती. त्यानं म्हटलं असतं, "हिच्या तोंडांतील दंतावलि कशासारखी दिसते कुणास ठाऊक, पण ती कुंदकळ्यांसारखी दिसत नाहीं, हें खास!" सारांश, तिच्या चेहऱ्याचं पांचच क्षण निरीक्षण करून निराश झालेल्या त्या कवीनं दुःखाचा एक निश्वास सोडला असता, आणि तिथून पोबारा केला असता.

पण आम्हांला तिच्याविषयीं आकर्षण वाटे तें तिच्या उमद्या आणि खेळकर स्वभावामुळं. केव्हांहि पहा, तिचा चेहरा आपला हंसतमुख. तिची थट्टा केली कीं आमच्यापेक्षांहि मोठ्यानं ती हंसे. चेष्टामस्करींत एखादा शब्द अधिकउणा झाला तरी त्याकडे दुर्लक्ष करून ती हंसत असे. जणुं मान म्हणजे काय, पुरुषांकडून स्त्रीदाक्षिण्याची अपेक्षा कशी करावी, ह्याची तिला कल्पनाच नव्हती.

आमच्या मास्तरांच्या खोलींत आम्हां सर्व पुरुष मास्तरांबरोबर ती एकटी निस्संकोच बसे, त्याचं आम्हांला विशेष कौतुक वाटे. कॉलेजांत असतांना कॉलेजांतल्या मुलींची वर्तणुक आम्हीं पाहिलेली होती. कोणी विद्यार्थी एखाद्या विद्यार्थिनीशीं बोलावयास गेल्यास ती एकदम कावरीबावरी होई. उत्तरादाखल फार तर 'हो' किंवा 'नाहीं' असा एखादाच शब्द तिच्या तोंडून बाहेर पडे; किंवा त्या विद्यार्थ्याचं एवढंहि भाग्य नसलं तर नुसत्या मानेच्या फणकाऱ्यावरच त्याला समाधान मानून घ्यावं लागे, आणि नंतर चेहरा एकदम गंभीर करून त्याच्याकडे पाह्यलं न पाह्यलंसं करून ती निघून गेली कीं बिचाऱ्याचं तोंड थोबाडींत मारल्याप्रमाणं गोरंमोरं होई. जणुं काय त्या विद्यार्थिनी म्हणजे कोणी स्वर्गातून पृथ्वीवर पडलेल्या शापभ्रष्ट देवता होत्या, आणि आम्हां केवळ मर्त्य मानवांबरोबर चार शब्द बोलणं म्हणजेसुद्धां त्यांना कमीपणाचं वाटत होतं. स्त्रीचं ह्या तऱ्हेचं वागणं आमच्या अगदी अंगवळणीं पडून गेलं होतं. ह्याखेरीज दुसऱ्या कोठल्याहि प्रकारच्या वर्तनाची अपेक्षा आम्ही स्त्रीकडून करीत नव्हतों. पण मिसेस सुधाबाई रानडेचं सारंच और. तिची वर्तणुक ह्याच्या अगदीं उलट. ओळख नसली तरी ती आपण होऊन बोलणं काढी. कधीं 'चहा घेतां कां?' म्हणून विचारल्यास तिनं नकार दिला नाहीं. एवढं कशाला, आम्हां सहा जणांना पुष्कळदां ती हंसत खिदळत कोपऱ्या-वरच्या इराण्याच्या हॉटेलांत घेऊन जाई, आणि आपल्या खर्चानं आम्हांला चहा पाजी! मग सांगा, तिच्या इतक्या मोकळ्या, हंसऱ्या आणि खेळकर स्वभावाचा आमच्यासारख्या खुशालचेंडू तरुणांना चटका बसला नसता, तरच नवल नव्हतं कां?

लवकरच आम्हां सहा जणांच्या कंपूंत ती दाखल झाली, आणि गांवांतील टवाळ लोक आम्हांला 'सप्तर्षि' ह्या नांवानं ओळखूं लागले.

"ऐकलं काहो सुधाताई?" मास्तरांच्या खोलींत मधल्या सुटींत चहा चिवड्यावर ताव मारतांना मी एक दिवस म्हटलं. "आपल्याला लोक सप्तर्षि म्हणतात!"

"होय का?" मनापासून हंसून ती म्हणाली, "अगदीं अन्वर्थक नांव काढलंय् शोधून–म्हणजे मी अरुंधति झाल्यें! नांव सुंदर आहे, नाहीं? अरुंधति!"

"हो. तुम्ही अरुंधति, पण मग वशिष्ठमुनि कोण?" संस्कृतचे मास्तर कुंटे विनोद करण्याच्या उद्देशानं म्हणाले.

"वशिष्ठमुनि ना? तुम्हीच!" असं म्हणून ती मोठ्यानं हंसली. आम्हीहि हंसलों खरें, पण कुंट्यांबद्दल मनांतून आम्हांला थोडासा मत्सर वाटला हें नाकारण्यांत अर्थ नाहीं. कुंटेहि थोडेसे खुलले. तिचं हें अगदींच अनपेक्षित बोलणं ऐकून त्यांना गुदगुल्या झाल्या होत्या. आणि गोंधळून जाऊन ते म्हणत होते, "छे!...भलतंच काहींतरी. मी कसचा वशिष्ठ!"

कुंट्यांच्या बोलण्याकडे कुणाचं फारसं लक्ष नव्हतं. तिनं कुंट्यांना 'वशिष्ठ' म्हटलं ह्यांत कांहींतरी गुढार्थ आहे कीं काय, ह्याचाच जो तो विचार करीत होता. इतक्यांत चिवड्याचा एक फक्का मारून जरासा गंभीर चेहरा करून सुधाबाई म्हणाली,

"काय नाहीं तुम्ही वशिष्ठ?"

"छट्! उगाच कांहींतरी!"—कुंटे.

"हो, खरंच. तुम्ही कसचे वशिष्ठ!–तुम्ही नुसतेच शिष्ट!" असं म्हणून ती खो खो करून हंसूं लागली.

कुंटे एकदम गडगडत खालीं आले. पण आम्ही बाकीचे पांचजण तारस्वरांत हंसलों. एखाद्या लहान मुलाप्रमाणं ती मात्र पूर्ण निरागसपणें खदखदां हंसत होती.

हा झाला तिच्या थट्टामस्करीचा नमुना! तिच्या ह्या बेलगाम वर्तणुकीचा अर्थ आम्हांला करतां येईना. पुष्कळदां ती नसली म्हणजे आम्ही त्यावर खल करीत असूं.

"काय बुवा, ह्या बाईचं कांहींच कळत नाहीं!" मी म्हणावं.

"खरंच ! कधीं वाटतं ती अगदीं भोळी असावी, तर कधीं वाटतं ती अगदीं पक्की बनलेली असावी."—इंग्रजीचे मास्तर खरे.

"आपण तर अगदीं गोंधळून गेलोंय् बुवा तिच्या वागणुकीनं !" –तालीममास्तर नाबर.

"विधवा आहे ती !"—मी.

"पण पहाना ! कोणाला वाटेल तिच्या वागणुकीवरून ती विधवा आहे म्हणून ?—सदा आनंदी !" –खरे मास्तर.

"बऱ्याच गांवचं पाणी प्यालेली आहे ती."—इतिहासशिक्षक दाणी.

"पुष्कळच खेळ खेळलेली दिसते !"–अंकगणिताचे शिक्षक मोडक.

"आपण जरा संभाळून राह्यलं पाहिजे बुवा !"—खरे मास्तर.

"काय रे उगाच तिच्याबद्दल कांही तरी बोलतां ? मला तर वाटतं कीं ती अगदीं भोळी आहे." कुंटे मास्तर.

"हे आलेत् मोठे तिचा कैवार घ्यायला !"—तालीममास्तर नाबर.

"कुंट्यांना हुरळून जायला कांहीं लागत नाहीं. जरा कोणी ह्यांच्याकडे पाहून हंसलं, कीं खुलली स्वारी !" दाणीमास्तर म्हणाले, "बरं का, म्हटलं अहो वशिष्ठ–नाहीं आपले कुंटे–जरा संभाळूनच हं. नाहीं तर अधःपात व्हायचा तुमचा !"

"म्हणजे ! मला नाहीं समजला ह्याचा अर्थ ?" जराशा कठोरपणानं कुंट्यांनीं विचारलं.

"नाहीं म्हटलं" त्या दिवशीचे "वशिष्ठ–अरुंधती" थट्टेतले थट्टेतच राहूं द्या. मी पाहतोंय् अलिकडे तुमची जरा वाजवीपेक्षां जास्तच घसरट चाललीय्." मिस्किलपणें दाणीमास्तर.

"बरं ! बरं ! मला नको तुम्ही शहाणपण शिकवायला. तिच्या मनमोकळया वर्तनाचा असा विपर्यास करणं शोभत नाहीं तुम्हाला !" असं रागारागानं म्हणून पुस्तकं बगलेंत मारून कुंटेमास्तर चटकन् खोलीबाहेर पडले.

त्याबरोबर आम्ही सर्वजण मोठ्यानं हंसलों. आमचं हंसणं ओसरतं आहे तोंच सुधाबाईनं खोलींत प्रवेश केला. आम्हांला हसतांना पाहून तीहि हंसू लागली — कांहीं कारण नसतां !

"काय ? काय झाली गंमत !" तिनं उत्सुकतेनं विचारलं.

"कांहीं नाहीं. आपलं उगाच."–मीं म्हटलं.

"इश्श ! उगाच कुणी हंसतं कां ?" नंतर किंचित् लाडांत येऊन ती म्हणाली, "सांगाना तुम्ही कां हंसता ते !"

"अहो, त्याचं असं झालं," गंभीरपणाचा आव आणून तालीममास्तर नाबर म्हणाले, "आपले गणितमास्तर आहेत ना राजेश्री मोडक, त्यांनीं आम्हांला एक उदाहरण सोडवायला टाकलं होतं. त्याला आम्ही हंसत होतों."

"वा ! गणितांहि विनोद सुरू झाला कीं काय अलिकडे ?" तिनं विनोदानं विचारलं.

"वा ! हे आपले मोडकमास्तर फारच विनोदी आहेत हो." नाबर मास्तर म्हणाले, "बरं तुम्हींच सांगा पाहूं त्यांच्या उदाहरणाचं उत्तर. बरोबर सांगितल्यास आजचा चहा आपल्याकडे."

"पहा बरं !" ती म्हणाली.

"तुमचं उत्तर बरोबर येणंच शक्य नाहीं."–नाबर.

'सांगा पाहूं उदाहरण. मग पाहूं येतं कीं नाहीं तें."—सुधाबाई.

"उदाहरण अगदीं सोपं आहे." मोडकमास्तर गंभीरपणें म्हणाले, "एकांत एक मिळवला म्हणजे बेरीज किती होते ?"

"दोन !" ती किंचित् विचार करून म्हणाली. ह्यांत येवढं अवघड काय आहे, हेंच तिला समजेना.

"छट् ! चूक ! तीन !" मोडकमास्तर म्हणाले, आणि त्यांच्या या नेहमींच्या कोटींतला विशिष्ट अर्थ माहित असल्यामुळं आम्हीहि खूप हंसलों. पहिल्यानं जरी तिच्या लक्षांत त्या कोटीचा अर्थ आला नाहीं, तरी आमच्या हंसण्यामुळं लवकरच तो तिला समजला आणि आमच्या हंसण्यांत तिनं आपल्याहि हंसण्याचा नाजुक स्वर मिसळून दिला !

तिच्यासमोर असल्या कोट्या करायाला आम्हांला कांहींच वाटत नसे. आणि तीहि त्या ऐकून रागावण्याऐवजीं पोट धरून हंसत असे.

"हो. पण कुंटेमास्तर कुठं आहेत ?" हंसून झाल्यावर तिनं विचारलं.

"ते आत्तांच बाहेर गेलेत् !"—मी.

"काय बाई गृहस्थ तरी! आज सिनेमाला जायचं ठरलंय् आमचं--चहा पिऊन दोघंहि बरोबर जाणार होतों. आणि त्यांचाच पत्ता नाहीं!" असं भडभडां बोलून आणि आपली आखुड दांड्याची बायकी छत्री घेऊन, किंचित् त्रासलेल्या चेहऱ्यानं ती निघून गेली.

ती गेल्यानंतर चागली पांच मिनिटं आम्हीं एकमेकाकडे फक्त टकमकां पहात बसलों होतों. अखेरीस खरेमास्तर इंग्रजींत उद्गारले, "परमेश्वरा, कुंट्यांचं रक्षण कर!"

"आतां काय, एक आणि एक--तीन!" तालीममास्तर नाबर म्हणाले.

वरवर थट्टेनं आम्हीं उसासे सोडले, पण मनांतून कुंट्यांविषयीं आमच्या मनांत एक अढी बसली.

आणि नंतर पाहिलं तर खरंच, कुंट्यांची आणि सुधाबाईची बरीच दोस्ती जमलेली दिसली. ती अजूनहि आम्हा सर्वांशीं पूर्वीइतक्याच मनमोकळेपणानं बोले, पण कुंटे मात्र आमच्याशीं जरा फटकून वागूं लागले होते. सुधाबाईच्या पाठीशीं मात्र ते सारखे असत. शाळा सुटल्यावर घरीं जातांना कांहीं ना कांहीं निमित्त काढून ते तिच्याबरोबर जाऊं लागले.

"थांबा हो जरा सुधाबाई." शाळा सुटल्यावर ते म्हणत. "मलाहि जरा त्याच बाजूला जायचं आहे. नोटपेपर्स घ्यायचे आहेत, गाडगीळ आणि मंडळी कडून."

"हो का! बरी सोबत झाली. चला." ती म्हणे.

आणि आमच्याकडे एक विजयाचा कटाक्ष टाकून कुंटे तिच्याबरोबर चालूं लागत.

आम्ही मुकाट्याने हा सर्व प्रकार पहात होतों. ह्याचं पर्यवसान कशांत होणार ह्याचाहि आम्ही कधीं कधीं विचार करीत असूं. कुंट्यांविषयीं आम्हां सर्वांचं मत वाईट झालं होतं, आणि आम्ही त्यांच्यामागें त्यांची वाटेल ती टिंगल करीत असूं.

पण खरं सांगायचं म्हणजे मनांतून आम्हांला त्यांचा हेवाच वाटे.

एक दिवस मुद्दाम आम्हां सर्वादेखत कुंट्यांनीं सुधाबाईला विचारलं, "काय, आज रात्रीं सिनेमाला जायचं लक्षांत आहे ना!"

"हो, मी जेवून तयार राहतें. साडेनवाला या तुम्ही."

"नक्की?"

"नक्की."

आम्हीं त्या संभाषणाकडे लक्ष नाहीं असं दाखवलं खरं, पण त्यांची पाठ वळतांच एकमेकांकडे पाहून आम्हीं डोळे मिचकावले. त्या दिवशीं आम्हीं ठरवलं कीं, एका विधवेशीं लग्न करून कुंटे समाजसुधारक म्हणून लवकरच मिरविणार.

पण आमचा हा तर्क सपशेल चुकला.

दुसऱ्या दिवशीं पाहिलं तर सर्व नूर एकदम पालटला. कुंट्यांचा चेहरा उतरलेला दिसत होता. लवकरच आमच्या लक्षांत आलं, कीं सुधाबाईला शक्य तोंवर टाळण्याचा आणि तिच्या दृष्टीला दृष्टी न भिडविण्याचा ते प्रयत्न करीत आहेत. आम्हांला त्यांच्या ह्या वागणुकीचा अर्थ कांहींच कळेना. आम्ही आपले त्यावर निरनिराळे तर्क बसवीत होतों.

सुधाबाईची वागणूक आम्हां राहिलेल्या पांचांशीं मात्र पूर्वीसारखीच दिलखुलास होती. कुंटेहि आतां त्या दिवसानंतर आम्हांला टाळण्याचा प्रयत्न न करतां उलट आमच्यांत पूर्ववत् मिसळूं लागले होते.

दोन तीन दिवसांनीं आम्हीं त्यांना विचारलं, "काय हो, कांहीं भांडण-बिंडण झालं कीं काय?"

"ऊं हूं!"

"मग हा काय प्रकार आहे?"

"तुमचंच म्हणणं बरोबर ठरलं. सुधाबाईचं शील चांगलं नाहीं!" एवढं बोलून कुंटे गप्प बसले.

नंतर आम्ही त्यांना खूप छेडून पाहिलं, पण ह्यापेक्षां अधिक ते कांहींच सांगेनात. सिनेमाला गेले असतां कांहीतरी प्रकार घडला असावा, असा आम्ही तर्क बांधला.

त्यानंतर एकदोन महिने आम्ही सुधाबाईशीं जरा तुटकच वागूं लागलों. तिच्याशीं जास्त संबंध ठेवायचा नाहीं, असा आम्हीं अगदीं कानाला खडा लावला होता.

परंतु सर्व कांहीं व्यवस्थित चाललं आहे अशी आमची कल्पना असतां, आम्हांला आणखी एक अकल्पित धक्का बसला.

एक दिवस संध्याकाळीं आमचे तालीममास्तर नाबर शाळेसमोरील अंगणाची एक टेप घेऊन मोजमापणी करण्यात गर्क झालेले दिसले.

" काय नाबर, काय चाललंय् ?" मी विचारलं

" बॅडमिंटन कोर्ट आखतोंय्. " माझ्याकडे न बघतांच नाबर म्हणाले.

" कां ? व्हॉलीबॉलचा कंटाळा आला कीं काय ?"

" तसं नव्हे. सुधाबाईना बॅडमिंटन खेळायला शिकायचं आहे."

" असं होय ! पण बॅडमिंटन कोर्टवर सुधाबाईबरोबर कोर्टिंग मात्र करूं नका, बरं का. " मोडकांनीं कोटी केली.

" कांहीं तरीच काय बोलतां, मोडक ?" मी म्हटलं.

" अहो, कांहींतरीच नाहीं. मी बोलतों ह्याला पुरावा आहे. आतां ह्या नाबरांचा नंबर लागलाय्. तिच्याबरोबर फिरतांना ह्या नाबरांना मी स्वतःच्या डोळ्यांनीं पाह्यलंय. काय हो नाबर, खरंना हें ?"

" बरं ! बरं !" नाबर रागानं एवढंच बोलले, आणि त्यांनीं आपली जमीनमोजणी परत सुरू केली. आणि अखेरीस मोडकांची वाणीच खरी ठरली. नाबर आणि सुधाबाई ह्यांची जोडी जिथं तिथं दिसूं लागली. बॅडमिंटन कोर्टवर तर त्यांनीं नुसता धुडगूस घातला. खेळून झाल्यावर इराण्याच्या हॉटेलांतल्या खास फॅमिलीसाठीं राखून ठेवलेल्या खोलींत बसून नाबर तिला ड्रिंक्स काय पाजीत, आईसक्रीम काय खाऊं घालीत, कांहीं विचारूं नका. हा सर्व प्रकार पाहून मोडकमास्तर म्हणाले, " नाबर सुधाबाईला बॅडमिंटनमध्यें इतके तरबेज करणार कीं अखेरीस तिच्याकडूनच ते लव्हगेम खाणार !"

आम्ही नाबरांची वरून टिंगल पण मनांतून हेवा करूं लागलों.

पण थोड्याच दिवसांत त्यांची ही मैत्री तुटली. नाबर गंभीर दिसूं लागले, आणि त्यांची कसून तपासणी केल्यावर कुंड्यांप्रमाणंच त्यांनींहि अभिप्राय दिला कीं, " तिचं शील चांगलं नाहीं ! "

आम्हां राहिलेल्या चौघांशीं सुधाबाई पूर्वी इतक्याच मनमोकळेपणानं वागत होती. कुंटे आणि नाबर मात्र तिला शक्य तों टाळीत होते.

पुन्हां एकदोन महिने आम्हीं सुधाबाईशीं संभाळून वागूं लागलों. पण नंतर ह्या सांथीला खुद्द खरेमास्तरच बळी पडले !

तेव्हां कुंटे म्हणाले, "परमेश्वरा खऱ्यांचं रक्षण कर."

खरे एके काळीं पट्टीचे पोहणारे होते. रोज सकाळीं ते सुधाबाईला घारपुऱ्यांच्या घाटावर पोहणं शिकवावयास घेऊन जाऊं लागले. बरेच दिवस हा प्रकार चालला होता. शेवटीं आम्हीं ठरवलं कीं, सुधाबाईला पोहणं शिकवण्याचा खरे मास्तरांचा हा उपद्व्याप, भवसागर जोडीनं तरून जाण्यासाठींच आहे.

पण एक दिवस हीहि मैत्री तुटली. खरेमास्तर खिन्नपणानं एवढंच म्हणाले, "सुधाबाईबद्दल माझ्या अपेक्षा फार निराळ्या होत्या, पण ती स्त्री शीलानं बरी नाहीं, हेंच खरें !"

सुधाबाईची एकेकाशीं मैत्री होते काय आणि त्या प्रत्येकाला तिच्या शीलाचा वाईट अनुभव येतो काय, हें गौडबंगाल आहे तरी काय ! हें आम्हां राहिलेल्या तिघांना कांहींच समजून येईना. तिची वागणूक मात्र राहिलेल्या आम्हां तिघांशीं पूर्ण मैत्रीचीच होती.

ह्या सांथीची चौथी लागण ह्यानंतर अवघ्या एक महिन्यांतच लागली. आतां इतिहासाच्या दाणीमास्तरांची पाळी आली होती. एक दिवस त्यांनीं तिला पांडवलेणीं दाखवावयास नेलं, आणि तिथं त्यांनीं इतिहाससंशोधन केलं, कीं तिचं शील चांगलं नाहीं !

तिच्या शीलाविषयीं बरावाईट अनुभव न आलेले असे आतां आम्हीं दोघेच राहिलों होतों-मोडक आणि मी. पण एक दिवस मोडक मला म्हणाले, "आज मी सुधाबाईला गंगापूरचा धबधबा पहायला घेऊन जाणार आहे."

"का ? आतां तुमचा नंबर लागला का ?" मी विचारलं.

"छे हो, तिच्या शीलाचा इतरांना असा काय अनुभव आलाय्, ह्याचं मला फारच कुतुहल वाटतंय्. म्हणून म्हटलं पाहूं या एकदां परीक्षा."

इतरांना आला होता तसाच अनुभव मोडक मास्तरांनाहि गंगापूरला आला. ते म्हणाले,

"इतरांना तिच्या शीलाचा वाईट अनुभव आला त्यांत कांहींच आश्चर्य नाहीं. त्या बाईचं शील चांगलं नाहीं."

सुधाबाई पूर्वींप्रमाणंच मास्तरांच्या खोलींत येई आणि पूर्वी इतक्यांच मोकळेपणानं वागे. तिच्यासमोर ते पांचहि जण चोरांसारखे वागत, पण तिची पाठ फिरली कीं कोणी तरी म्हणे, " काय निर्लज्ज बाई आहे पहा. त्या दिवशीं इतकी झाडली तिला, पण परत आपली कोडग्यासारखी येतेच ! "

आणि मग बाकीचे सर्वजण त्याला दुजोरा देत.

सुधाबाईशीं जास्त संबंध न आलेला असा मीच तेवढा आतां राहिलों होतों. ती माझ्याशीं पूर्वींप्रमाणंच वागे, उलट आतां बाकीचे तिच्याशीं मोकळेपणानं बोलत नसल्यामुळं तिचा माझ्याशींच जास्त संबंध येई. माझ्याशीं होत असलेल्या तिच्या वागणुकीचा सर्व बाजूंनीं विचार करूनहि ती स्त्री वाईट शीलाची असावी असं मला वाटेना. पण ते पांचहि जण वरचेवर मला इषारा देत, " पहा बुवा, आम्हांला तसा अनुभव आला आहे म्हणून सांगतों. त्या बाईपासून आपलं चार हात दूर रहा. "

**त्या** दिवशीं रात्रीं कोजागिरी होती, आणि गांवाबाहेरील एका बंगल्यांत एका सुप्रसिद्ध गायिकेचं गाणं होतं. सुधाबाईला गाण्याची बरीच आवड होती तिच्याबरोबर गाण्याला चलण्याची तिनं मला विनंती केली होती.

गाणं संपायला बराच उशीर झाला. आम्ही परत यायला निघालों तेव्हा गर्दी निघून गेली होती. त्यांतून आम्ही रमतगमत चाललेलों असल्यामुळं आमच्या आसपास कोणीच नव्हतं. चांदणं कसं पिठासारखं स्वच्छ पडलं होतं. हवेंत गारवा होता, आणि कसला तरी मंद सुगंध हवेंत दरवळत होता. आम्ही एकमेकांच्या फारच जवळून चाललों होतों. एकदोनदां तिच्या ऊबदार शरीराचा स्पर्श झाल्यासारखा मला भास झाला. मध्येंच एकदां वाऱ्याच्या झुळकीबरोबर उडालेला तिचा पदर माझ्या हाताला चिकटून बसला. पण तो काढून घेण्याचा तिनं जरासुद्धां प्रयत्न केला नाहीं.

नुकत्याच ऐकलेल्या गाण्याविषयीं तिची वटवट चालली होता पण माझं तिकडे फारसं लक्ष नव्हतं. तिची बडबड चालू असतां मी मध्येंच म्हटलं, चांदणं किती छान पडलं आहे, नाहीं ? " चला, आपण जरा त्या टेकडीवर जाऊन बसूं. "

" खरंच !" आजूबाजूच्या मनोरम दृश्यावरून एकदां नजर फिरवून ती म्हणाली, " एखाद्या कादंबरींतल्या नायकनायिकेला प्रेमालाप करण्यास किती योग्य स्थळ आणि वेळ आहे ही !"

येवढं बोलून कांहींच आढेवेढे न घेतां माझ्याबरोबर आपलींहि पावलं तिनं त्या टेकडीकडे वळवलीं.

टेकडीवर ती माझ्या शेजारीं येऊन बसली ती जवळ जवळ मला खेटूनच. तिनं तोंडाला लावलेल्या पावडरचा आणि पातळावर शिंपडलेल्या सेंटचा मादक वास मला स्पष्ट येत होता. आमच्यापैकीं कुणीहि जराशी हालचाल केली कीं माझ्या खांद्याला तिच्या लुसलुशीत खांद्याचा स्पर्श होई. नुकतीच टेकडी चढून आल्यामुळं प्रत्येक श्वासाबरोबर तिच्या नाकपुड्या किंचित् विस्फारित होत होत्या, आणि तिचा उरोभाग खालवर होत होता. मी तिच्या त्या सारखी बडबड करणाऱ्या तोंडाकडे पाहिलं. तें सुंदर नव्हतं, पण त्या वेळच्या रम्य आणि विकारांचं उद्दीपन करणाऱ्या पार्श्वभूमीवर मला तिच्या त्या नाजुक ओठांची हालचाल मोहक वाटली. क्षणभर आधाशी डोळयांनीं मीं तें चित्र पाहिलं. त्याचवेळीं माझ्या मनांत विकारांचं भयंकर वादळ सुरू झालं होतं. माझ्या मनांत विचार येऊं लागले– 'हिची ही वर्तणूक मुद्दाम मला मोह पाडण्यासाठींच चालली आहे का ? ती नुकतंच जें वाक्य बोलली, त्यांत मला कांहीं तरी सुचवण्याचा तिचा उद्देश आहे कां ? पांच मास्तरांनीं सांगितल्या-प्रमाणं ही स्त्री खरोखरीच शीलानं वाईट असून आतां मला आपल्या मोह-पाशांत पकडण्याचा ती प्रयत्न करीत आहे काय ? नाहीं तर हें खेटून बसणं मघां पदर माझ्या अंगाला चिकटून बसला तरी तो काढून न घेणं वगैरे सर्व गोष्टींचा अर्थ काय?...खरंच ती सुंदर नसली तरी मोहक खास आहे....' ह्या तऱ्हेचे हजारों विचार माझ्या मनांत येऊन गेले. मनांतल्या विकारांचा जोर वाढतच होता, आणि त्यापुढं मनाची पिछेहाट होत होती. जसजसा वेळ जाऊं लागला, तसतसा मनाचा तोल सांभाळणं मला अवघड वाटूं लागलं. इतक्यांत कसा कोण जाणें, माझ्या हाताला तिच्या कोमल हाताचा स्पर्श झाला, आणि मनावरचं विकारांचं दडपण असह्य होऊन, तिचा तो मांसल हात मी एकदम घट्ट दाबून धरला.

त्या स्पर्शानं माझ्या शरीरांतल्या सर्व रक्तवाहिन्यांतून वीज चमकून गेल्यासारखं मला वाटलं. माझी छाती धडधडूं लागली--जणुं कोणी लोहारच तिथं काम करीत होता. हळूंच दृष्टि वर करून मी तिच्याकडे पाहिलं. ती शांतच होती. ती दचकली नाहीं, बावरली नाहीं, कीं रागावली नाहीं. शांतपणानं तिनं एकदां माझ्याकडे पाहिलं. त्या दृष्टींत मादकता नव्हती. चुकणाऱ्या मुलाकडे ज्या किंचितशा कठोर दृष्टीनं आई बघते, तशी तिची ती दृष्टी होती. त्या दृष्टींत दाहकता नव्हती. त्यावेळीं आकाशांतून पृथ्वीवर वितरणाऱ्या चंद्रकिरणांइतकी ती सौम्य होती. तिच्या हातावरची माझ्या हाताची पकड हळुहळू सैल पडूं लागली. आपला हात माझ्या हातांतून नाजूकपणें सोडवून घेऊन तिनं एक सुस्कारा सोडला. आणि शांतपणानं ती म्हणाली, " अखेरीस तुम्हीहि तसेच निघालांत. सर्व एकाच माळेचे मणी !"

ती एवढंच बोलली खरी, पण तें ऐकून मी अमर्दी शरमिंदा झालों. मी विकारांच्या इतका आधीन कसा झालों, ह्याचंच मला आश्चर्य वाटूं लागलं. कातरत्या आवाजांत मीं म्हटलं, " सुधाबाई, मला क्षमा करा. माझ्या हातून चूक झाली !"

" त्यांत तुमची काय चूक ? माझंच चुकलं. पांच जणांचा असा अनुभव आला असतांना तुमच्याबरोबर मी इथं ह्या अशा वेळीं यायला नको होतं." नंतर थोडसं थांबून ती म्हणाली, " पण मला वाटलं होतं कीं तुम्हीं त्यांच्यापेक्षां निराळे असाल !"

मी गप्प बसलों होतों. सुधाबाई परत बोलूं लागली, " माझ्या मोकळ्या वर्तनावरून पुष्कळांचा गैरसमज होतो. त्यांना वाटतं कीं मी एक वैषयिक सुखाला लालचावलेली आणि नीतिमत्तेची चाड नसलेली स्त्री आहे... "

ती शांतपणानं बोलत होती. जगांत अनेक टक्केटोणपे खाल्लेल्याचा तो शांतपणा होता. " माझा स्वभावच मेला विचित्र आहे. स्त्रीला न शोभण्या-इतक्या मोकळपणानं, मी पुरुषांशीं वागतें. हें माझं वागणं चुकतं आहे हें मला समजत नाहीं असं नाहीं. पण स्त्रीप्रमाणं वागायला माझ्यांत स्त्रीत्वच आतां उरलेलं नाहीं मुळीं. इतर स्त्रीयांना जीं सुखं उपभोगावीशीं वाटतात तीं भोगण्याची

मला आतां इच्छाच नाहीं. संसारसुख मीं चारपांच वर्षेंच भोगलं, पण तेवढ्यांत माझ्या सर्व हौशी फिटल्या. त्यांच्यावर मी इतकं प्रेम केलं कीं आता दुसऱ्या कुणावर प्रेम करावंसंच मला वाटत नाहीं–तसं प्रेम करायला तें आतां कांहीं शिल्लकच राहिलेलं नाहीं! ''

सामान्याहून निराळया अशा एका विधवा स्त्रीच्या अंतरंगाचे पापुद्रे माझ्यासमोर खोलले जात होते. मी एकचित्त होऊन तिचं भाषण ऐकत होतों. थोडंसं थांबून तिनं आपलं भाषण पुढें चालू केलं,

" झालेलं दुःख विसरण्यासाठीं मनाला विरंगुळा म्हणून मी मास्तरीण झाल्यें ! इथं आल्यावर तुमचा सहाजणांचा आनंदी आणि खेळकर कंपू पाहून मला अतिशय आनंद झाला. तुमच्या सहाच्या कंपूंत आपणहि सातवी म्हणून सामील व्हावं, असं मला वाटूं लागलं. मी मनाशीं विचार करी, तुम्ही सहाजण आपसांत ज्या निःस्वार्थी मैत्रीनं राहतां, त्या निःस्वार्थी मैत्रींत आपणहि वाटेकरी होऊंया. तुम्हां सहा पुरुषांत सातवा पुरुष म्हणून मला रहायचं होतं. आणि म्हणून मी तसा प्रयत्न केला. माझ्यासारखी वागणूक एखाद्या पुरुषानं ठेवली असती तर तुम्हांला त्यांत विशेष असं कांहीं वाटलं नसतं. पण तीच वागणूक एका स्त्रीनं ठेवतांच, तुम्हीं त्याचा भलताच अर्थ केला. मी माझं स्त्रीत्व विसरून तुमच्यांत मिसळलें, पण तुम्ही मात्र माझं स्त्रीपण विसरूं शकलां नाहीं. ''

" झालं खरं तसं ! " कांहीं तरी बोलायचं म्हणून मी म्हणालों.

" कुंभ्यांनीं सिनेमांत माझ्याशीं अतिप्रसंग करण्याचा प्रयत्न केला. नाबरांनीं तोच प्रकार हॉटेलांत केला. खऱ्यांनीं पोहतांना, दाणींनीं पांडवलेण्याला, मोडकांनीं गंगापूरला, आणि तुम्हींहि आंता इथं त्याच प्रसंगाची उजळणी केली. " नंतर एक उसासा टाकून ती म्हणाली " पुरुषांपुरुषांत जशी निष्कपट निरागस मैत्री असू शकते, तशी स्त्री आणि पुरुष ह्यांच्यांत होणं शक्य नाहीं, हें आज मला पुरतं कळून चुकलं. तुम्ही पुरुष आपसांत जशी मैत्री ठेवतां, तशी ती तुम्हांला एखाद्या स्त्रीबरोबर ठेवतां येत नाहीं हेंच खरं. ! "

मी हळूंच चोरून तिच्या तोंडाकडे पाहिलं. तिची मुद्रा आज प्रथमच मला खिन्न आणि दुःखी दिसली.

लवकरच आम्ही जावयास उठलों. तिच्या घराजवळ आम्ही आलों, तेव्हां ती म्हणाली, "हें पहा, बोलण्याच्या भरांत मी कांहीं अधिकउणं बोललें असल्यास रागावूं नका. झाल्या प्रसंगानं आपल्या मैत्रींत बाध नाहीं ना येणार ?"

मी 'नाहीं' म्हणून उत्तर दिलं खरं, पण ती केव्हां एकदां माझ्या दृष्टीसमोरून नाहींशी होते असं मला झालं होतं. मनुष्य स्वभाव किती विचित्र असतो पहा ! चूक माझीच होती. तिनं त्यावेळीं माझ्या थोबाडींत दिली असती तरी तें क्षम्य ठरलं असतं. पण तिनं मनाची शांति ढळूं न देतां मला सर्व सांगितलं होतं. आणि तरीहि मला तिचा राग आला होता. माझा तिनं कांहींतरी अक्षम्य अपराध केल्यासारखं मला वाटत होतं.

दुसऱ्या दिवशीं, सुधाबाईच्या अन्तरंगाची मला ओळख झाली असून-सुद्धां मी त्या पंचकडीला सांगितलं, "सुधाबाईचं शील चांगलं नाहीं हेंच खरं !"

लवकरच राजीनामा देऊन सुधाबाई आमची शाळा सोडून निघून गेली, आणि आम्ही सहा मास्तर पूर्वी इतक्यात खेळीमेळीनं पुन्हा एकदां राहूं लागलों.

